अखिल भारतीय प्राच्यविद्यासम्मेलन
शतवर्ष महोत्सव ग्रंथमाला – ७९

### महर्षी याज्ञवल्क्य प्रणीत

# याज्ञवल्क्यशिक्षा

## (मराठी अनुवाद)

अनुवादक
**रवींद्र अंबादास मुळे**

प्रधानसंपादक
**आचार्य श्रीनिवास वरखेडी**
कुलगुरु

संपादक
**आचार्य मधुसूदन पेन्ना**
संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग




**कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय**
रामटेक, जि. नागपूर (महाराष्ट्र)

२०२०

| | | |
|---|---|---|
| **शीर्षक** | — | **याज्ञवल्क्यशिक्षा** |
| **अनुवादक** | — | **रवींद्र अंबादास मुळे** |
| **प्रधानसंपादक** | — | **आचार्य श्रीनिवास वरखेडी**<br>कुलगुरु, क.का.सं.वि., रामटेक |
| **संपादक** | — | **आचार्य मधुसूदन पेन्ना**<br>संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग,<br>क.का.सं.वि., रामटेक |
| **अखिल भारतीय प्राच्यविद्या सम्मेलन** | — | **प्रो. गौतम पटेल,** अध्यक्ष<br>**प्रो. सरोजा भाटे,** सचिव<br>**प्रो. ग. उ. थिटे,** उपाध्यक्ष |
| **संपादक मंडळ** | — | **डॉ. दिनकर मराठे,** क.का.सं.वि., रामटेक<br>**डॉ. वीणा गानु,** नागपुर. |
| **प्रकाशन वर्ष** | — | **२०२०** |
| **आवृत्ती** | — | **प्रथम** |
| **मूल्य** | — | **रू. ४८६/—** |
| **आय.एस.बी.एन.** | — | ९७८—९३—८५७१०—३६—० |
| **मुखपृष्ठ** | — | **श्री. उमेश पाटील** |
| **मुद्रक** | — | **अवधूत ग्राफिक्स ॲण्ड प्रिन्टीग, नागपूर** |
| **प्रकाशक** | — | **कुलसचिव, क.का.सं.वि., रामटेक**<br>**प्रशासकीय भवन, मौदा रोड, रामटेक.** |

## PREFACE

It is indeed a matter of great pleasure and pride for Kavikulaguru Kalidas Sanskrit University, Ramtek to have this rarest opportunity of hosting the 50th session of All India Oriental Conference at Nagpur. This AIOC-50th session at Nagpur will be forever remembered by all as the year 2019 also happens to be the year of Centenary Celebration of AIOC. The premier objective with which the great scholars of yester years had contemplated and established this national academic event called All India Oriental Conference has been achieved through these years with scores of young scholars contributing significantly to the treasure house of knowledge through their valuable research work.

The research of yore and of the present should be properly recorded so as to make it easily available to all lovers of knowledge and wisdom in the years to come. With this objective, we have contemplated to commemorate the 100th year of this grand event of 50th session of AIOC by way of publishing 100 monographs on different subjects in four languages viz., Sanskrit, Hindi, Marathi and English. It is no doubt a herculean task but still worth of it, for the reason that these 100 monographs will inspire many young scholars to take upon a fresh study and research of the oriental subjects with more vigour and zeal.

The AIOC Centenary Publication Series includes wide variety of subjects like Literature, Language, Veda, Indian Philosophy, Sanskrit Grammar, Law, Children Literature, Yoga, Astronomy and Astrology, Ayurveda, Pali, Prakrit, Jain, Buddhism, Education, Library Science, Poetics, Aesthetics, and Indology. It also includes reprint of some rare texts of academic importance which have gone out of print are not easily available. We wish to mark this centenary celebrations with this series that connects the glory of the past and aspirations of future. I place on record my sincere gratitude to all the authors of these monographs who have kindly contributed to the richness of this

series.

I am confident that the books published in these series will definitely inspire the lovers of Oriental Learning in general and of Sanskrit Language and Literature in particular.

On this occasion, we have published a memorable book of all the speeches of Section-Presidents of all previous sessions of AIOC. It is indeed a very capacious addition to any collection. I with all respect thank two eminent scholars of our times - Prof. Gautam Patel, President and Prof. Saroja Bhate, General Secretary, the torch bearers of AIOC who have not only encouraged us in this venture but also made all efforts to provide these valuable historical speeches for us. I thank all executive members of AIOC and my colleagues of the varsity for making this event a grand success.

My words fall short in describing the painstaking efforts and scholarly commitment of my esteemed colleague Prof. Madhusudan Penna, local secretary of this session in bringing out this series.

I also take this opportunity to profusely thank Shri. Subhash Jain and Shri Dipak Jain, the proprietors of New Bharatiya Book Corporation, New Delhi for their enthusiastic approach and timely work with all precision and grace.

Let us all sanctify ourselves in the eternal flow of wisdom by reading these books and recommending these to others also!

**सरस्वती श्रुतिमहती महीयताम्**

Ramtek
10th January 2020

Prof. Shrinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU

**Kavikulaguru Kalidas Sanskrit University**
**All India Oriental Conference**

**100th Year 50th Session**
**10th-12th January, 2020**

## Chief Patron
Hon'ble Nitin Gadkari
Minister of Road, Transport & Highways of India

## Patron
Prof. Shrinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU, Ramtek

## AIOC President
Prof. Gautam Patel
Chairman, Sanskrit Seva Samiti, Ahmedabad.

## AIOC General Secretary
Prof. Saroja Bhate
Professor of Sanskrit (Retd.), Pune University, Pune

## AIOC Local Secretary
Prof. Penna Madhusudan
Dean, KKSU, Ramtek

## Additional Local Secretary
Dr. Harekrishna Agasti
Dr. Kalapini Agasti
Dr. Dinakar Marathe
Dr. Parag Joshi

## Organising Committee
Prof. C.G. Vijayakumar, Registrar (I/c) & Dean, KKSU, Ramtek
Prof. Nanda Puri, Dean, KKSU, Ramtek
Prof. Krishnakumar Pandey, Dean, KKSU, Ramtek
Prof. Laita Chandratre, Dean, KKSU, Ramtek
Dr. Ramachandra Joshi, Finance Officer, KKSU, Ramtek
Dr. Umesh Shivahare, Controller of Examination, KKSU, Ramtek
Dr. Dipak Kapade, Librarian, KKSU, Ramtek
Dr. Renuka Bokare, PRO, KKSU, Ramtek

Shri. Rajivranjan Mishra, Technical Head, KKSU, Ramtek
Shri. Pravin Kalambe, Security Officer, KKSU, Ramtek

## Reception Committee

Prof. Shrinivasa Varakhedi, Chairperson Reception Committee & VC, KKSU
Parampujya Govindagiri Swamiji, Rishikesh
Prof. P.T. Chande, Former VC, KKSU
Prof. Uma Vaidya, Former VC, KKSU
Prof. Vijendra Kumar, VC, National Law University, Nagpur
Prof. Rajnish Shukla, VC, National Hindi University, Wardha
Prof. Vinayak Kane, VC, RTM Nagpur University, Nagpur
Shri. Krupal Tumane, Member of Parliament
Shri. Girishji Vyas, Member of Legislative Council
Shri. Chandrashekhar Bawankule, Guardian Minister, Nagpur
Prof. Vishram Jamdar, Director, VNIT, Nagpur
Dr. Bhushankumar Upadhyay, Commissioner of Police, Nagpur
Shri. Vijay Phanshikar, Editor, The Hitavada, Nagpur
Shri. Rajkumar Tirpude, Tirpude Group of Insitutions, Nagpur
Shri. Mohabbat Singh, Tuli International, Nagpur.
Shri. Chandragupta Varnekar, Principal Retd., Nagpur
Shri. Suresh Sharma, Baidyanath, Nagpur
Shri. Prabhakar Rao Mundle, Dharampeth Educational Institutions, Nagpur

## Executive Committee

Prof. G. U. Thite,
Vice President

Dr. Brijeshkumar Shukla,
Treasurer

## Members

Dr. Rajni Satish Chandra Jha
Prof. Shukla Ramakant
Dr. Behera Ranjit
Dr. Meena Shukla
Dr. Nirmala Kulkarni
Dr. Roy Gauri Nath
Dr. Tripathi Uma Rani
Dr. Pushpa Jha
Dr. Basu Ratna
Dr. Mithilesh Kumar
Prof. Singh Prasoon Dutta
Shri. Mishra Arun Ranjan
Dr. Mishra Baidyanath
Dr. Tripathi Rajendra Rasraj
Shri. Harshdev Madhav
Dr. Kamdev Jha
Dr. Parinita Deshpande
Dr. Jha Udayanath (Ashok)

श्रीराम

‘शैक्षणिक क्षेत्रात अखिलभारतीय स्तरावर त्यागभावनेतून काम करणाऱ्या अखिल-भारतीय-राष्ट्रीय शैक्षणिक महासंघाने मला **“शिक्षा-भूषण”** पुरस्काराने सन्मानित केले, याचे भान ठेऊन, प्रेरणा घेऊन पुढे जायचे आहे —’

**— रवींद्र मुळे**

**९ नोव्हेंबर २०१९**

# स्वागतम्

महर्षी याज्ञवल्क्य प्रणीत याज्ञवल्क्यशिक्षेचा प्रस्तुत स्पष्टीकरणासह मराठी अनुवाद ही एक मराठीतील वैदिक साहित्याच्या संदर्भातील महत्त्वाची भर आहे. वैदिक साहित्यात शिक्षा हे एक प्रसिद्ध वेदांग असून त्या वेदांगात मुख्यत्वे करून त्या त्या वेदातील किंवा वेदशाखेतील उच्चारण्याच्या दृष्टीने आढळणाऱ्या वैशिष्ट्यांचे विवेचन केलेले असते. असे ग्रंथ रचणाऱ्या ऋषींच्या सूक्ष्म वेदाध्ययनाचे फलित म्हणजे अशाप्रकारे शिक्षाविषयक विचार होत. प्रस्तुत याज्ञवल्क्य शिक्षा शुक्लयजुर्वेदाच्या माध्यंदिन शाखेचे उच्चारण दृष्ट्या वैशिष्ट्य प्रकट करणारा असा ग्रंथआहे. अशा ग्रंथाचे स्वरूप मूलतः अवघड असल्याने त्याचे स्पष्टीकरणात्मक टीपांसह भाषांतर वाचकांच्या अध्ययनाच्या दृष्टीने अतिशय उपयोगी आहे.

त्यामुळे ग्रंथाचे सर्व अभ्यासक सहर्ष स्वागत करतील यात शंका नाही.

**प्रो. गणेश उमाकांत थिटे**

**(भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर पुणे)**

# अनुक्रमणिका

# ग्रंथसंक्षेप सूची

| | | |
|---|---|---|
| अ.प्रा. | – | अथर्ववेद प्रातिशाख्य |
| का.प्र.प. | – | कात्यायन प्रतिज्ञा परिशिष्ट |
| च.व्यू. | – | चरण व्यूह |
| तै.प्रा. | – | तैत्तिरीय प्रातिशाख्य |
| ना.शि. | – | नारदी शिक्षा |
| नि. | – | निरुक्त |
| पा.शि. | – | पाणिनीय शिक्षा |
| पा.सू. | – | पाणिनि सूत्र |
| म.श.शि. | – | मल्ल शर्म शिक्षा |
| मा.सं. | – | माध्यन्दिन संहिता |
| मा.सं.स्व.वै. | – | माध्यन्दिन संहिता स्वरोच्चारण वैशिष्ट्य |
| मां.शि. | – | माण्डूक्य शिक्षा |
| या.शि. | – | याज्ञवल्क्य शिक्षा |
| या.शि.व.प्र. | – | याज्ञवल्क्य शिक्षा वर्ण प्रकरण |
| ल.मा.शि. | – | लघु माध्यन्दिन शिक्षा |
| व.र.प्र.शि. | – | वर्ण रत्न प्रदीप शिक्षा |
| वा.प्रा. | – | वाजसनेय प्रातिशाख्य |
| वै.स्व.चि. | – | वैदिक स्वरचिह्ने |
| श.ब्रा. | – | शतपथ ब्राह्मण |
| शु.य.प्रा. | – | शुक्ल यजुर्वेद प्रातिशाख्य |

# प्रास्ताविक

प्राचीन भारतीय अध्ययन परंपरेत वेद आणि वेदांगांच्या अध्ययनाला विशेष महत्त्व आहे. पाणिनीयशिक्षेत वेदपुरुषाच्या अंगांचा उल्लेख आला आहे, त्या शिक्षेत म्हटले आहे –

छन्दः पादौ तु वेदस्य, हस्तौ कल्पोऽथ पठ्यते ।
ज्योतिषामयनं चक्षुर्निरुक्तं श्रोत्रमुच्यते ।।४१।।

**शिक्षां घ्राणं तु वेदस्य** मुखं व्याकरणं स्मृतम् ।
तस्मात् साङ्गमधीत्यैव ब्रह्मलोके महीयते ।।४२।।

शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छन्दस्, ज्योतिष वेदांच्या या सहा अंगांपैकी शिक्षा या अंगाचा वेदपुरुषाचे घ्राण (नासिका) म्हणून उल्लेख केला आहे. मंत्रांचा योग्य उच्चार झाल्यास अर्थज्ञानही सहजतेने होऊ शकते म्हणून वेदाध्ययनात शिक्षाग्रंथाच्या अभ्यासाला महत्त्व आहे.

वर्णांच्या उच्चारण प्रक्रियेचे सूक्ष्म विवेचन शिक्षाग्रंथात दिसते, त्यामुळे ध्वनिशास्त्राच्या अभ्यासातही शिक्षाग्रंथांचे मोठे योगदान आहे.

मंत्रोच्चार करताना स्वर, वर्ण यांचा निर्देश हस्तचालन करून करावा, पण असे झाले नाही तर विपरीत फळ मिळण्याची शक्यता आहे म्हणूनच याज्ञवल्क्य शिक्षेत म्हटले आहे –

हस्तहीनं तु योऽधीते स्वरवर्णविवर्जितम् ।
ऋग्यजुः सामभिर्दग्धो वियोनिमधिगच्छति ।। (याज्ञ.शि.१.४१)

हस्तचालनाशिवाय तसेच स्वर, वर्ण यांचा विचार न करता जो अध्ययन करतो तो ऋग्यजु:साम यांनी दग्ध होऊन वियोनि (अनेक कलंकित जन्म) प्राप्त करतो. स्वर,

वर्ण यांच्या अशुद्ध उच्चारणाने शब्दाचा विपरीत अर्थ होतो, हे याठिकाणी सांगावयाचे आहे.

**शिक्षा म्हणजे**– जिच्या द्वारा मंत्रांतील पद, वर्ण, मात्रा, स्वर इत्यादींचे ज्ञान होते असा ग्रंथ. वर्णांच्या उच्चारणाचे विधि कळून, स्थानादींचा परिचय ज्यामुळे होतो तो ग्रंथ शिक्षा होय. शिक्षाग्रंथात सहा बाबींचे विवेचन येते.

**''शिक्षां व्याख्यास्यामः। वर्णः स्वरः मात्रा बलं साम।**
**सन्तान इत्युक्तः शीक्षाध्यायः ।'' (तै.उ. शीक्षाध्यायः)**

**१. वर्ण–** 'अ' इत्यादी वर्ण होत. हे वर्ण शिक्षाग्रंथात सांगितले आहेत.

''त्रिषष्टिश्चतुःषष्टिर्वा वर्णाः शम्भुमते मताः।
प्राकृते संस्कृते चापि स्वयं प्रोक्ताः स्वयंभुवा।। (पा. शि. ३)

ब्रह्म्याने ६३ किंवा ६४ वर्ण प्राकृत किंवा संस्कृत मध्ये सांगितले आहेत. या वर्णांचा याचा विचार या.शि.२.१-४ मध्ये आला आहे.

**२. स्वर–**उदात्तादी स्वर होत. तेही या.शि.१.१-१८ मध्ये सांगितले आहेत.

उदात्त, अनुदात्त व स्वरित हे तीन स्वर होत. ''उदात्तानुदात्तश्च स्वरितश्च स्वरास्त्रयः ।'' तालु इत्यादी उच्चारण स्थानांच्या ऊर्ध्व भागावर आघात होऊन उदात्त स्वर निर्माण होतो (उच्चैरुदात्तः पाणि.१.२.२९) या स्थानांच्या अधो भागावर आघात होऊन अनुदात्त स्वर निर्माण होतो. (नीचैरनुदात्तः पाणि.१.२.३०) आणि उदात्त, अनुदात्त यांच्या उच्चारण स्थानांच्या मध्य भागावर आघात होऊन स्वरित स्वर निर्माण होतो (समाहारः स्वरितः पाणि.१.२.३१). या स्वरांचा संबंध सामवेदातील ऋषभ, गांधार, धैवत यांच्याशी जोडलेला आहे (या.शि.१.१-७)

**३. मात्रा–** ह्रस्व, दीर्घ व प्लुत या तीन मात्रा होत. ''ह्रस्वोदीर्घः प्लुतः''

ही विभागणी वर्णोच्चारासाठी लागणाऱ्या काळाच्या दृष्टीने केली आहे. याचे विवेचन या.शि.१.१६ मध्ये आले आहे. ह्रस्व स्वराचा उच्चारण काळ एक मात्रा असतो, दीर्घ स्वराचा उच्चारण काळ दोन मात्रा असतो, प्लुत स्वराचा उच्चारण काळ तीन मात्रा असतो, तर व्यंजनांचा उच्चारण काळ अर्ध मात्रा असतो.

४. **बल–** वर्णोच्चाराचे स्थान आणि वर्णांच्या उच्चारणाचे प्रयत्न यांना बल असे म्हटले आहे. पाणिनीय शिक्षेत वर्णोच्चाराची आठ स्थाने सांगितली आहेत.

अष्टौ स्थानानि वर्णानामुरः कण्ठः शिरस्तथा ।
जिह्वामूलं च दन्ताश्च नासिकोष्ठौ च तालु च ।।

५. **साम–** अतिद्रुत, अतिविलंबित इत्यादी दोषांनी रहित व माधुर्यादि गुणांनी युक्त असे मंत्रांचे उच्चारण म्हणजे 'साम' होय.

मंत्रोच्चारामध्ये निर्माण होणाऱ्या दोषांचा विचार पाणिनीय शिक्षेत ''गीती, शीघ्री, शिर: कम्पी....'' (पा.शि.३२,३५, या.शि.२.८२) या श्लोकांत केला आहे.

'माधुर्यमक्षरव्यक्ति:' (पा.शि.३३, या.शि.२.८३) इत्यादी गुण श्लोकांत सांगितले आहेत.

६. **सन्तान–**म्हणजे संहिता. 'वायवायाहि' या ठिकाणी आदेश होऊन संधी झाला आहे. (वायो + आयाहि). यासच संतान म्हणतात.

या सहा बाबींचा विचार केल्याने शिक्षाग्रंथ वेदाध्ययनास उपयोगी पडतात.

माध्यंदिन शाखेला पाणिनीय शिक्षा इत्यादी अनेक शिक्षाग्रंथ आहेत परंतु उपकारक अशी याज्ञवल्क्य शिक्षा सर्वांग परिपूर्ण आहे. याज्ञवल्क्यशिक्षेवर अमरनाथशास्त्रीकृत शिक्षावल्ली टीका, पं. विश्वनाथ शर्मा रचित ''शिक्षालोकटीका'' पं. ज्वालाप्रसाद मिश्र यांची ''भाषाटीका'' उपलब्ध आहेत.

याज्ञवल्क्य शिक्षेत अन्य शिक्षाग्रंथांप्रमाणे स्वर, वर्ण, मात्रांचा विचार आहे. परंतु या शिक्षेमध्ये प्राधान्याने माध्यंदिन शाखेचा अधिक विचार केला आहे. हस्तचालन प्रकार, अनुस्वार उच्चार, विसर्ग उच्चार, विवृतींचे उच्चारण, यकाराचे जकार उच्चारण, या साऱ्या वैशिष्ट्यांचा विचार या शिक्षेत आला आहे. ध्वनिविषयक विश्लेषण करताना काही विषयांचे विवेचन ध्वनिशास्त्राच्या दृष्टीने आजही महत्त्वाचे आहे. यात स्वरभक्ती, रंग, यम इ. विषय होत. शुक्ल यजुर्वेदाच्या काण्व, माध्यन्दिन या दोन शाखा आहेत. या दोन शाखांपैकी प्राधान्याने माध्यंदिन शाखेत याज्ञवल्क्य शिक्षेच्या पठनाची परंपरा आहे, तर काण्व शाखेत पाणिनीय शिक्षेच्या पठनाची परंपरा आहे.

वेदातील त्या त्या शाखांची उच्चारण वैशिष्ट्ये शाखेशी संबंधित शिक्षाग्रंथात आलेली आहेत. शिक्षाग्रंथात सांगितल्याप्रमाणे शाखेतील मंत्रांचे उच्चारण होते का? होत नसेल तर दोहोंमध्ये किती फरक पडला आहे; आणखी इतर वैशिष्ट्यांचा समावेश आला आहे का? हेही पहाणे अभ्यासाचा स्वतंत्र विषय होऊ शकतो.

वेदांग शिक्षा यामध्ये दोन प्रकारच्या वाङ्मयाचा अंतर्भाव होतो. **१. शिक्षा** – त्या त्या वेदाच्या उच्चारणाचे सामान्य नियम यात सांगितलेले असतात. उदा. याज्ञवल्क्यशिक्षा शुक्ल यजुर्वेदातील सर्व शाखांतील मंत्रांच्या उच्चारणाचे सामान्य प्रतिपादन करणारी आहे. **२. प्रातिशाख्य** – त्या वेदातील विशिष्ट शाखेतील वैशिष्ट्यांचे प्रतिपादन ज्यात केले जाते ते प्रातिशाख्यग्रंथ होत. वाजसनेय शाखेतील वैशिष्ट्ये वाजसनेय प्रातिशाख्यात सांगितलेली आहेत.

शिक्षाग्रंथांचे प्राचीन रूप म्हणजे ही प्रातिशाख्ये होत.

१. ऋग्वेद संबंधी पुढील शिक्षाग्रंथ उपलब्ध आहेत. स्वरांकुशा शिक्षा, षोडशश्लोकी शिक्षा, शैशरीय शिक्षा, पाणिनीय शिक्षा, शौनकीय शिक्षा, स्वरव्यंजन शिक्षा इत्यादी.

२. शुक्ल यजुर्वेदाचे पुढील शिक्षाग्रंथ उपलब्ध आहेत. याज्ञवल्क्य शिक्षा, वासिष्ठ शिक्षा, कात्यायनी शिक्षा, पाराशरी शिक्षा, माण्डव्य शिक्षा, अमोघानन्दिनी शिक्षा, लघु अमोघानन्दिनी शिक्षा, माध्यन्दिनी शिक्षा, वर्णरत्नपदीपिका शिक्षा, केशवी शिक्षा,

हस्तस्वर प्रक्रिया, अवसाननिर्णय शिक्षा, स्वरभक्तिलक्षणपरिशिष्ट शिक्षा, क्रमकारिका शिक्षा.

३. सामवेदसंबंधी पुढील शिक्षाग्रंथ उपलब्ध आहेत. गौतमी शिक्षा, लोमशी शिक्षा, नारदीय शिक्षा.

४. कृष्ण यजुर्वेदाचे पुढील शिक्षाग्रंथ उपलब्ध आहेत. भारद्वाज शिक्षा, व्यास शिक्षा, शम्भु शिक्षा, कौहलीय शिक्षा, सर्वसम्मत शिक्षा, आरण्य शिक्षा, सिद्धांत शिक्षा.

५. अथर्ववेदाचा माण्डूकी शिक्षा हा एकमेव शिक्षाग्रंथ उपलब्ध आहे.

या सर्व शिक्षाग्रंथाचे त्यावरील टीकांचे विवेचन 'संस्कृत वाङ्मयका बृहद् इतिहास' (द्वितीय खंड), प्रधान संपादक श्री बलदेव उपाध्याय, उत्तरप्रदेश संस्कृत संस्थान, लखनऊ तसेच वैदिक वाङ्मयका बृहद् इतिहास (वेदाङ्ग), कुन्दनलाल शर्मा, विश्वेश्वरानंद वैदिक शोध संस्थान, होश्यारपुर (१९८३) या ग्रंथांत आले आहे. त्या त्या शिक्षाग्रंथांचे स्वरूप, त्यातील विवेचन, संस्करण, त्यावरील टीका यांचे विवेचन या ग्रंथात विस्तृत प्रमाणात आहे.

याज्ञवल्क्य शिक्षेचा प्रस्तुत अनुवाद करताना प्राधान्याने डॉ. हरिराम मिश्र यांनी केलेल्या हिंदी अनुवादाचा आधार घेतला आहे. अनुवाद करताना शिक्षाग्रंथात सांगितलेली वैशिष्ट्ये उच्चारण पद्धतीत कसे दिसतात, काही ठिकाणी दिसत नसतील तर त्याची कारणे काय? याचाही काही प्रमाणात विचार केला आहे.

हा अनुवाद अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदेच्या (AIOC) पन्नासाव्या अधिवेशनाच्या निमित्ताने कविकुलगुरुकालिदास विश्वविद्यालय, रामटेक यांच्याद्वारा प्रकाशित होत आहे, याचा मला निश्चितच आनंद आहे. विद्यापीठाचे कुलगुरू **प्रा. श्रीनिवास वरखेडी** यांच्या दूरदृष्टीने आणि प्रतिभेने विद्यापीठाचा विकास होत आहे. पन्नासाव्या अधिवेशनाच्या निमित्ताने १०० ग्रंथांचे प्रकाशन हाही महत्त्वाकांक्षी प्रकल्प आहे. या प्रकल्पात सहभागी होण्याची संधी मला मिळत आहे. याबद्दल

मा. कुलगुरूंचा मी अत्यंत आभारी आहे. अधिवेशनाचा प्रचंड व्याप सहजपणे सांभाळणारे **डॉ. मधुसूदन पेन्ना, डॉ. वीणा गानू** यांचाही मी आभारी आहे. प्रस्तुत ग्रंथास ज्यांनी आपल्या अधिकार वाणीने प्रस्तावना दिली आहे ते माझे गुरुवर्य **डॉ. गणेश थिटे** यांच्याविषयी कृतज्ञता व्यक्त करतो. संपादन कार्यात **सौ. मुक्ता हृषीकेश सराफ, सौ. कांचन घाटे** यांचे बरेच सहकार्य झाले याची जाणीव ठेऊन शिक्षाग्रंथांच्या अधिक अभ्यासासाठी प्रस्तुत ग्रंथ विमल सरस्वतीच्या चरणी अर्पण करतो.

**– रवींद्र मुळे**

# याज्ञवल्क्य शिक्षा – भाग १

## स्वरप्रकरण (पूर्वार्ध) (कारिका १ ते ९२)

## १. मात्राधिकार–स्वरमात्रांविषयी विचार (कारिका १ ते १८)

**अथाऽतस्त्रैस्वर्यलक्षणं व्याख्यास्यामः।**

**अथ। अतः। त्रैस्वर्यलक्षणम्। व्याख्यास्यामः।**

**अथ–** आनन्तर्य या अर्थी अथ हे पद आलेले असले तरी स्वरूपतः मंगल प्रयोजन असणारे आहे. स्मृतींमध्ये म्हटले आहे –

''ओङ्कारश्चाथशब्दश्च द्वावेतौ ब्रह्मणः पुरा ।
कण्ठं भित्वा विनिर्यातौ तेन माङ्गलिकावुभौ ।।

ओंकार आणि अथ हे दोन शब्द पूर्वी ब्रह्मदेवाच्या कंठातून बाहेर पडलेले असल्याने दोन्ही शब्द मंगलवाचक आहेत. म्हणूनच कात्यायनांनी म्हटले आहे – 'ओङ्कारं वेदेषु । अथकारं भाष्येषु ।' (शु.य.प्रा.१.१८–१९) वेदांमध्ये मंगलवाचक **ओं** चा प्रयोग केला जातो तर भाष्यामध्ये **अथ** शब्द वापरला जातो. ज्यामध्ये पदांचे भाष्य केलेले असते त्यास भाष्य म्हणतात. या व्युत्पत्तिनुसार शिक्षाग्रंथही भाष्य होत. म्हणून अथ शब्द मंगलवाचक असल्याने शिक्षाग्रंथाच्या प्रारंभी अथ शब्द आला आहे.

**अथ–** गुरु परंपरेने वेदग्रहण केल्यानंतर (तुलना पा.गृ.सू. २.६.१/८) असा या '**अथ**' चा अर्थ आहे.

अतः – अतः हे पद हेत्वर्थक आहे. अर्थात या पदाने शास्त्राचा हेतु सांगितला आहे.

**''मन्त्रो हीनः स्वरतो वर्णतो वा, मिथ्याप्रयुक्तो न तमर्थमाह।**
**स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्रशत्रुः स्वरतोऽपराधात् ।।'' (पा.शि.५२)**

स्वर, वर्ण यांच्या चुकीच्या उच्चाराने वैगुण्य निर्माण होते इतकेच नाही तर अनिष्टफल प्राप्ती होते. ''म्हणून'' असा अतः चा अर्थ आहे.

**त्रैस्वर्यलक्षणम्–** आवांतर भेदासहित उदात्त, अनुदात्त व स्वरित या स्वरांच्या समूहास त्रिस्वरी म्हटले आहे. या त्रिस्वरींचे लक्षण म्हणजेच स्वरूपत्रैस्वर्यलक्षण होय. ते या शिक्षाग्रंथात सांगतो अशी प्रतिज्ञा महर्षि याज्ञवल्क्यांनी केली आहे.

**अध्ययनविध्यधिकारः (या. शि. १–५० कारिका)**

**१. उदात्तश्चानुदात्तश्च स्वरितश्च तथैव तत्।**
**लक्षणं वर्णयिष्यामि दैवतं स्थानमेव च।।१।।**

उदात्त, अनुदात्त, स्वरित यांचे प्राधान्याने वर्णन करायचे आहे. तसेच त्यांचे लक्षण, दैवत, स्थान यांचेही वर्णन करायचे आहे.

या कारिकेत पहिल्या व दुसऱ्या ओळीत दोन्ही ठिकाणी 'च' आलेला आहे. या चकाराने व तीन स्वरांखेरीज त्यांचे अवांतर भेद वर्णायचे आहेत. तसेच लक्षण, दैवत यांबरोबरच त्या वर्णांचे गोत्र इत्यादी सांगायचे असे सूचित केले आहे.

**२. शुक्लमुच्चं विजानीयान्नीचं लोहितमेव च।**
**श्यामन्तु स्वरितं विद्यादग्निमुच्चस्य दैवतम्।।२।।**

**वर्ण–** (उच्च =) उदात्तस्वराचा वर्ण शुक्ल असा जाणावा, (नीच =) अनुदात्तस्वराचा वर्ण लाल आहे. तर स्वरिताचा श्याम (कृष्ण) वर्ण जाणावा.

**३. नीचे सोमं विजानीयात् स्वरिते सविता भवेत्।**
**उदात्तं ब्राह्मणं विद्यान्नीचं क्षत्रियमेव च।।३।।**

**स्वरांच्या देवता–** उदात्तस्वराची देवता अग्नि ही आहे. अनुदात्तस्वराची देवता सोम आहे तर स्वरिताची देवता सविता आहे. **स्वरांच्या जाती–** उदात्तस्वर ब्राह्मण असल्याचे जाणावे, अनुदात्तास क्षत्रिय जाणावे,तर स्वरितास वैश्य जाणावे.

**४. वैश्यन्तु स्वरितं विद्याद् भारद्वाजमुदात्तकम्।**

**नीचं गौतममित्याहुर्गार्ग्यं च स्वरितं विदुः।।४।।**

**स्वरांची गोत्रे–** उदात्तस्वराचे गोत्र भारद्वाज आहे. अनुदात्तस्वराचे गोत्र गौतम असल्याचे म्हटले जाते. तर स्वरितांचे गोत्र गार्ग्य असे जाणले जाते.

**५. विद्यादुदात्तं गायत्रं नीचं त्रैष्टुभमेव च।**
**जागतं स्वरितं विद्यादेवमेवं नियोगतः।।५।।**

**स्वरांचे छंद–** वेदांच्या सस्वरपाठानुसार/ अध्ययनानुसार उदात्तस्वराचा छंद गायत्री जाणावा, अनुदात्ताचा छंद त्रिष्टुभ जाणावा तर स्वरिताचा जगती छंद जाणावा.

२ ते ५ कारिकांसाठी खाली तक्ता दिला आहे.

| | **उदात्त** | **अनुदात्त** | **स्वरित** |
|---|---|---|---|
| वर्ण | शुक्ल | लाल | कृष्ण |
| देवता | अग्नि | सोम | सविता |
| जाति | ब्राह्मण | क्षत्रिय | वैश्य |
| गोत्र | भारद्वाज | गौतम | गार्ग्य |
| छंद | गायत्री | त्रिष्टुभ | जगती |

**६. गान्धर्ववेदे ये प्रोक्ताः सप्त षड्जादयः स्वराः।**
**त एव वेदे विज्ञेयास्त्रय उच्चादयः स्वराः।।६।।**

गांधर्ववेदात (सामवेदात) षड्ज इत्यादी सात स्वर सांगितले आहेत. तेच उदात्तादी तीन स्वर वेदामध्ये (यजुर्वेदात) जाणावेत.

षड्ज इत्यादी स्वरांच्या उत्पत्तीबद्दल नारदीय शिक्षेत सांगितले आहे.

नासां कण्ठमुरस्तालुं जिह्वां दन्ताश्च संश्रितः।
षड्भिः सञ्जायते यस्मात्तस्मात् षड्ज इति स्मृतः।।१।।

नासिका, कंठ, छाती, तालु, जिह्वा, दंत या सहा स्थानांच्या आधारे निर्माण होत असल्याने यास **षड्ज** म्हटले जाते ।।१।।

वायुः समुपस्थितो नाभेः कण्ठशीर्षसमाहतः।
नर्द्दत्यृषभवद्यस्मात्तस्माद्**वृषभ** उच्यते।।२।।

नाभी पासून आलेल्या वायूचा आघात कंठशीर्षावर आदळतो आणि ऋषभाप्रमाणे आवाज होतो म्हणून त्यास **ऋषभ** असे म्हणावे. ।।२।।

वायुः समुपस्थितो नाभेः कण्ठशीर्षसमाहतः।
नानागन्धवहः पुण्यो **गान्धार**स्तेन हेतुना।।३।।

नाभी पासून उत्पन्न झालेला वायू कंठशीर्षावर आदळून नाना गन्धांना वाहणारा असल्याने त्यास **गान्धार** म्हणतात. ।।३।।

वायुः समुपस्थितो नाभेरुरो हृदि समाहतः।
नाभिम्प्राप्तो महानादं **मध्यमत्वं** समश्नुते।।४।।

नाभी पासून उत्पन्न झालेला वायू उरस् व हृदय यांच्यावर आघात करून नाभी जवळ आला असता महानाद निर्माण होतो तो नाद **मध्यमत्व** प्राप्त करतो.।।४।।

वायुः समुपस्थितो नाभेर्हृतकण्ठोरःशिरोहतः।
पञ्चमस्थानस्थितस्यास्य **पञ्चमत्वं** विधीयते।।५।।

नाभी पासून उत्पन्न झालेला वायू, नाभी, हृदय, कंठ, उरस्, शिर यांवर आघात करतो. पाच स्थानांवर असणाऱ्या यांस **पञ्चम** म्हणतात.।।५।।

अतिसन्धीयते यस्मादेतान् पूर्वोच्छ्रितान् स्वरान्।
तस्मादस्य स्वरस्यापि **धैवतत्वं** विधीयते।।६।।

या स्वरापूर्वी निर्माण झालेल्या स्वरांचे अतिक्रमण (अतिसंधान) जो स्वर करतो तो **धैवत** होय. ।।६।।

निषीदन्ति स्वरा अस्मिन् **निषाद**स्तेन हेतुना।।७।।

या स्वरामध्ये सर्व स्वर अंतर्भूत होतात त्यामुळे त्या स्वरास **निषाद** असे म्हणतात. ।।७।।

**७. उच्चौ निषादगान्धारौ नीचावृषभधैवतौ।**
**शेषास्तु स्वरिता ज्ञेयाः षड्ज-मध्यम-पञ्चमाः।।७।।**

या सातही स्वरांचा अंतर्भाव उदात्तादी तीन स्वरांमध्ये होतो. **उदात्तस्वरात** निषाद गंधार, **अनुदात्तस्वरात** ऋषभ धैवत यांचा अंतर्भाव होतो व शिल्लक राहिलेल्या (षड्ज, पंचम, मध्यम) स्वरांचा **स्वरितामध्ये** अंतर्भाव होतो.

**८. षड्जो वेदे शिखण्ड्यास्य ऋषभः स्यादजामुखे।**
**गावो रम्भन्ति गान्धारं क्रौञ्चाश्चैव तु मध्यमम्।।८।।**

षड्ज, ऋषभ यांच्या उच्चाराचा निर्देश या कारिकेत केला आहे.

वेदामध्ये षड्ज मोराच्या मुखातील ध्वनीप्रमाणे जाणवतो, ऋषभ बोकडाच्या मुखातील ध्वनीप्रमाणे जाणावा. गाईच्या हंबरण्यामध्ये गांधाराची जाणीव होते तर क्रौंच पक्षाच्या आवाजात मध्यमाची जाणीव होते.

**९. कोकिलः पञ्चमं ब्रूते निषादं तु वदेद् गजः।**
**आश्वश्च धैवतो ज्ञेयः स्वराः सप्तेति गीयते।।९।।**

कोकीळ पंचम स्वरात ओरडत असतो. हत्ती निषाद स्वरात चीत्कार करतो. घोड्याच्या आवाजात धैवत जाणावा, अशाप्रकारे सात स्वर ध्वनित होतात.

ज्याप्रमाणे मयूर इत्यादींच्या आवाजातून षड्ज इत्यादी स्वर जाणवतात त्याप्रमाणे वेदामध्येही ध्वनित होतात.

कात्यायनांनी प्रातिशाख्यामध्ये ''सामसु गाने'' सामवेदातील गानांमध्ये सात, यजुर्मात्रांमध्ये तीन, यजुर्ब्राह्मणात दोन, शिक्षादि ग्रंथात यज्ञकर्मात एक स्वर असतो हे

सांगितले आहे. (१.१२७-१३०) याज्ञवल्क्य शिक्षाग्रंथातील उदात्तादि तीन स्वर सांगितले आहेत. **जात्यादि** अष्टविध स्वरांच्या स्वतंत्र सांगण्याने त्यांच्याशी तीन स्वरांचा विरोध समजू नये कारण ते स्वरिताचेच भेद आहेत. तसेच 'प्रचय' सुद्धा स्वरितातच अन्तर्भूत होतो.

पुढील कारिकेपासून मात्रांचा विचार केलेला आहे.

**१०. निमेषो मात्राकाल: स्याद्विद्युत्कालस्तथा परे।**
**अक्षरात्तुल्ययोगाच्च मति: स्यात्सोमशर्मण:।।१०।।**

डोळ्याच्या उघडझापेसाठी लागणारा **निमेष** काल हा १ मात्रा काल होय. तसेच अन्य आचार्यांच्या मते वीज चमकण्याच्या काळाला १ मात्रा काळ म्हणतात. सोमशर्मा आचार्यांच्या मतानुसार स्थान प्रयत्न यांनी सदृश वर्णाचा असताना एका वर्णाचा उच्चार केल्यानंतर दुसरा वर्ण उच्चारताना दोन वर्णांच्या मधील जो काळ तो एकमात्रा काळ होय.

सोमशर्मा आचार्यांचे मत -
अक्षरात् + तुल्ययोगात्+ च





स्थान प्रयत्न यांनी समान असणाऱ्या
वर्णांमध्ये जो काळ तो एकमात्रा काळ होय.

माण्डूक्य शिक्षेमध्ये मात्राकालाबद्दल स्पष्टपणे म्हटले आहे. अक्ष्णो निमेषमात्रेण यो वर्ण: समुदीर्यते स एकमात्रो द्विस्तावान् दीर्घस्त्रिः प्लुत उच्यते। (मां. शि. १३७)

**११. सूर्यरश्मिप्रतीकाशात्कणिका यत्र दृश्यते।**
**अणुत्वस्य तु सा मात्रा मात्रा च चतुराणवा।।११।।**

सूर्यकिरणाच्या कवडशामध्ये जे सूक्ष्म धूलिकण दिसतात, त्या एका धूलिकणाच्या स्पंदनास जो वेळ लागतो तो काळ **आणव** काळ होय.चार आणव काळ म्हणजे एकमात्रा काळ होय.

**स्पष्टीकरण–** अणुत्वाची मात्रा म्हणजे सर्वात लघु परिमाण होय, आणव म्हणजे सूक्ष्म धूलिकण होय – त्याच प्रमाणे एक आणव काळ म्हणजे एक निमेष, म्हणजे डोळ्याच्या उघडझापेस लागणारा काळ होय. त्याच प्रमाणे एक आणव काळ म्हणजे एका सूक्ष्म धूलिकणाच्या स्पंदनास लागणारा काळ होय. या ठिकाणी वैशेषिकांनी मानलेल्या 'अणु' या अर्थाने हा शब्द वापरलेला नाही. (अणोः इमानि परिमाणानि आणवानि) मात्रा म्हणजे चार अणुपरिमित काळ असा अर्थ घ्यावा लागतो. शु.य.प्रा.५९.१, ६०, ६१ मध्ये म्हटले आहे. व्यञ्जनमर्धमात्रा। तदर्धमणु। परमाण्वर्धाऽणुमात्रेति।।

**१२. मानसे चाणवं विद्यात्कण्ठे विद्याद् द्विरावणम्।**
**त्रिराणवं तु जिह्वाग्रे निःसृतं मात्रिकं विदुः।।१२।।**

**मात्रेच्या संबंधातील चार आणव काळ कशाप्रकारे सांगता येईल.** मनामध्ये जो वर्ण आला असताना त्या वर्णाचा काळ एक आणव काळ होय. तो वर्ण कंठात आल्यानंतर तो दोन आणव काळ आहे. वर्ण जिह्वेवर आल्यानंतर तीन आणव काळ होतो तर तो वर्ण मुखातून बाहेर पडतो त्यावेळी तो पूर्ण एक मात्रा काळ असतो.

**स्पष्टीकरण** – परा, पश्यन्ती, मध्यमा, वैखरी या चार प्रकारच्या वाणी सांगितल्या आहेत. त्याच अनुक्रमाने एकाणव, द्वावण, त्र्याणव आणि चतुराणव काळ असणाऱ्या सांगता येतील. पाणिनीय शिक्षेत ''आत्मा बुद्ध्या समेत्याऽर्थान्मनो युङ्क्ते विवक्षया।। (०१.६)'' असे म्हटले आहे. वर्णानुच्चारासाठी मनप्रेरित होते असे यात म्हटले आहे.

**१३. अवग्रहे तु कालः स्यादर्धमात्रात्मको हि सः।**
**पदयोरन्तरे काल एकमात्रा विधीयते।।१३।।**

**मंत्रोच्चारण करताना कोणत्या ठिकाणी किती मात्रा काळ अंतर ठेवावे.** अवग्रहाचे वेळी अर्धमात्रा काळ असावा आणि दोन पदांमध्ये जो काळ तो एकमात्रा काळ असावा.

**स्पष्टीकरण** – अवग्रह या शब्दाचे अनेक अर्थ आहेत परंतु या ठिकाणी सामासिक पदातील घटक पदांचे पृथक्करण किंवा संधिविच्छेद असतो त्यास अवग्रह असे म्हटले आहे. ज्यामुळे पदाची प्रकृति (मूळपद) स्पष्टपणे कळते.

उदा. स॒हस्र॑शीर्षे॒ति॑ स॒हस्र॑ शीर्षा। (शु. य. पद ३१.१)

या ठिकाणी **स्र** या वर्णाच्या उच्चारणानंतर शी उच्चार करेपर्यंत अर्धमात्रा काळ व्यवधान असावे.

तिष्ठ॑ऽद्भ्य॒ऽइति तिष्ठ॑त् भ्यः॑ (शु. य. पद १६.२३)

या ठिकाणी **त्** नंतर अर्धमात्रा काळ विलंब करून पुढील वर्ण उच्चारावयाचा आहे. कात्यायनाने प्रातिशाख्यात ''समासेऽवग्रहो ह्रस्वसमकाल:''। (शु.य.प्रा. ६.१) असे म्हटले आहे. समासातील अवग्रहाच्या ठिकाणी ह्रस्वसम काळ म्हणजेच एकमात्रा काळ असावा परंतु याज्ञवल्क्यशिक्षेत वरील ठिकाणी अर्धमात्रा काळ सांगितला आहे. या ठिकाणी परस्पर विरोधीपणा दिसतो का? तर असा विरोध नाही कारण प्रातिशाख्यात सामान्य विधान केले आहे तर शिक्षेत पारिभाषिक संज्ञेच्या आधारे विधान केले आहे. (द्वयो: स्वाभाविकपारिभाषिकमात्राविधानत्वेनाविरोध:)

**१४. ऋचोऽर्धे तु द्विमात्रः स्यात्त्रिमात्रः स्यादृगन्तके।**
**रिक्तन्तु पाणिमुत्क्षिप्य द्वे मात्रे धारयेद् बुधः।।१४।।**

**मंत्रावसानाचे वेळी काळासंबंधीचे नियम** – ऋचेच्या किंवा कंडिकेच्या अर्धभागी किंवा अवसानी पुढील भाग सुरू करण्यापूर्वी द्विमात्रा काळ विराम ठेवावा. आणि ऋचेच्या शेवटी तीन मात्रा काळ विराम ठेवावा.



उदा. ग॒णाना॑न्त्वा ग॒णप॑तिठ॑... व्वसो मम । आहम॑जानि... (वा.सं. २३.१९)

या ठिकाणी मम म्हटल्यानंतर दोन मात्रा काळ थांबून आहमजानि... या पुढील अर्ध्या भागाचे पठण करावे.

**१५. विवृत्तौ वावसाने च ऋचोऽर्द्धे च तथा परे।**
**पदे च पादसंस्थाने शून्यहस्तं विधीयते।।१५।।**

विवृत्ती मध्ये, अवसानी, ऋचेच्या अर्ध्या भागात तसेच अन्य विरामांमध्ये पदपाठाचे वेळी तसेच पादपूर्तीच्या वेळी शून्यहस्ताचे विधान केले आहे. (याप्रसंगी हस्तचालन होत नाही.) (विवृत्तींचे वर्णन पुढे आले आहे २.९-१२.)

**१६. एकमात्रो भवेद्ध्रस्वो द्विमात्रो दीर्घ उच्यते।**
**त्रिमात्रस्तु प्लुतो ज्ञेयो व्यञ्जनं चाऽर्धमात्रिकम्।।१६।।**

ह्रस्व वर्ण (अ,इ,उ) एक मात्रा काळ असणारे जाणावेत. दीर्घ वर्ण (आ,ई,ऊ) दोन मात्रा काळ असणारे, प्लुतवर्ण तीन मात्रा काळ असणारे तर व्यंजन अर्ध मात्रा काळ असणारे जाणावे.

**स्पष्टीकरण** - ह्रस्व, दीर्घ, प्लुत हे वर्ण उच्चारण्यासाठी अनुक्रमे एक, दोन, तीन मात्रा काळ आवश्यक आहे, हे याठिकाणी सांगितलेले आहे. व्यंजनांच्या उच्चारणाला अर्ध मात्रा काळ सांगितला आहे. अर्ध मात्रा म्हणजे दोन आणव काळ होय. पूर्वीच्या कारिकेत (कारिका १२ मध्ये) ''कण्ठे विद्यात् द्विराणवम्''। असे म्हटले आहे. अर्थात हा काळ कंठामध्ये असलेल्या वर्णास लागतो. मग त्याचे उच्चारण कसे समजावे यावर असे म्हणता येईल की व्यंजनाचे उच्चारण स्वराच्या साहाय्यानेच होत असते. पतंजलीने म्हटले आहे ''न ह्यचामन्तराव्यञ्जनस्योच्चारणमपि सम्भवति।'' स्वरा शिवाय व्यंजनाचे उच्चारण शक्य नाही. 'जगत्' या शब्दात 'त्' चे उच्चारण जाणवते पण 'त्' पूर्वी असणाऱ्या गकारातील 'अ' मुळे त्याचे उच्चारण शक्य झाले आहे.

## १७अ. प्रणवं तु प्लुतं कुर्याद् व्याहृतीर्म्मात्रिका विदु:।

**ॐकारादींच्या मात्रांविषयी**

प्रणवाचे (ओंकाराचे) उच्चारण प्लुत (त्रिमात्राकाळ) करावे. (भूर्भुव: स्व: इत्यादि) व्याहृतींचे उच्चारण प्रत्येकी एक मात्रा काळ जाणावे. (भू: या व्याहृतीचे उच्चारण करून एकमात्रा काळ थांबून दुसरी भुव: ही व्याहृती म्हणावी. तसेच भुव: म्हणून एकमात्रा काळ थांबून स्वर् ही व्याहृती म्हणावी).

भूर्भुव: स्व: या तीन व्याहृतींचे उच्चारण एक मात्रा काळ असू शकत नाही हेच या ठिकाणी सांगायचे आहे.

## १७ब+१८अ. चाषस्तु वदते मात्रां द्विमात्रं वायसोऽब्रवीत्।।१७।। शिखी वदति द्विमात्रं मात्राणामिति संस्थिति:।

चाष नावाचा पक्षी जो ध्वनि काढतो त्या ध्वनीच्या उच्चारणाचा काळ एक मात्रा असतो. कावळ्याचा आवाज हा द्विमात्रिक असतो, मोराचा आवाज त्रिमात्रिक असतो. अशाप्रकारे मात्रां संबंधी व्यवस्था केलेली आहे.

**स्पष्टीकरण** – कारिकेत वदते असे म्हटले आहे. वदते हा आर्ष प्रयोग होय. वायस: अब्रवीत् या ठिकाणी भूतकाळाचे रूप वापरले आहे. परंतु वर्तमानकाळाच्या सामीप्याने याचा अर्थ वर्तमानकाळीच घ्यावा लागतो. चाष याबद्दल टीकाकारांनी नीलकण्ठ नावाचा पक्षी म्हटले आहे. एक मात्रा काळ म्हणजे चाष पक्ष्याच्या आवाजासाठी जो काळ लागतो तो. कावळ्याच्या आवाजासाठी दोन मात्रा काळ लागतो.उदा. 'काऽऽवँ'. मोराचा आवाज 'पियाँऽऽऽव' हा आहे आणि या उच्चारणासाठी लागणारा काळ तीन मात्रा आहे.

## १८ब+१९अ. वर्णो जातिश्च मात्रा च गोत्रं छन्दश्च दैवतम्।।१८।। एतत्सर्वं समाख्यातं याज्ञवल्क्येन धीमता ।

स्वरांचे (शुक्ल इ.) वर्ण, (ब्राह्मण इ.) जाति (ह्रस्व इ.)मात्रा (त्यांचे भारद्वाज इ.) गोत्र (गायत्री इ.) छंद (अग्नी इ.) देवता हे सर्व बुद्धिमान याज्ञवल्क्यांनी पूर्वीच सांगितले आहे. (कारिका १.२-५).

## २. अध्ययनविधि (कारिका १९ ते ५१)

**१९ब. हस्तौ सुसंयतौ धार्यौ जानुनोरुपरि स्थितौ ।।१९।।**

हात चांगल्या प्रकारे गुडघ्यांवर ठेवावेत.

**स्पष्टीकरण** – प्रारंभी मांडी घालून बसावे. तैत्तिरियारण्यकात बसण्या संदर्भात म्हटले आहे. ''दर्भाणां महदुपस्तीर्य उपस्थं कृत्वा प्राङासीन:' (तै.आ.२.११) अर्थात दर्भाचे आसन पसरवून त्यावर बसणे आणि ''दक्षिणोत्तरौ पाणीपादौ कृत्वा'' अर्थात उपस्थ हे एक आसन असल्याचे सायणाचार्यांनी म्हटले आहे. जवळ केलेल्या डाव्या पायाच्या गुडघ्यावर उजवा पाय ठेवणे जी सुखस्थिती प्राप्त होते ते उपस्थ होय (अर्धपद्मासन?) उजवा पाय देखील डाव्या पायावर ठेवणे (पाद म्हणजे पायाच्या मनगटापासून पिंढऱ्यापर्यंतचा भाग होय). पायाच्या नखांपासून घोट्यापर्यंतचा पायाचा भाग डाव्या मांडीच्या खाली घेणे. हात पुढीलप्रमाणे व्यवस्थित ठेवावेत. डाव्या मांडीवर डाव्या हाताचा कोपरा आणि उजव्या मांडीवर डाव्या हाताची मूठ ठेऊन त्या मुठीवर उजव्या हाताचा कोपरा ठेवावा. दोन्ही गुडघ्यांवर येणाऱ्या मुठीवर उजव्या हाताचा कोपरा ठेवल्याने उजवा हात दोन्ही गुडघ्यांवर ठेवल्याप्रमाणे होईल. अर्थात दोन्हीही हात गुडघ्यांवर ठेवल्याप्रमाणे होईल.

**२०अ. गुरोरनुमतिं कुर्याद् पठन्नाऽन्यमतिर्भवेत्।**
**उरुभागे तृतीये तु कूर्परं न्यस्य दक्षिणम्।।२०।।**

(अध्ययनासाठी) गुरूंच्या आज्ञेची प्रतीक्षा करावी आणि अनुज्ञा मिळाल्यानंतर अध्ययन करताना (अध्ययनाव्यतिरिक्त)अन्य कोणताही विषय मनात आणू नये.

मांडीच्या तिसऱ्या भागावर उजव्या हाताचे कोपर ठेऊन (वेदपठण सुरूकरावे.)

**२१. सुप्रसन्नमना भूत्वा किञ्चिन्नम्रस्त्वधोमुखः।**
**निवेश्य दृष्टिं हस्ताग्रे शास्त्रार्थमनुचिन्तयेत्।।२१।।**

प्रसन्न मनाने नम्रतेने, मुख किंचित खाली करून, हस्ताग्रांवर दृष्टी ठेऊन (वेदवेदांगादि) शास्त्रार्थांचे चिंतन करावे.

**स्पष्टीकरण** – पठनाचे वेळी हात, पाय पसरणे, सहाध्यायी बरोबर गप्पा मारणे इत्यादी गोष्टी करू नयेत. अध्ययनाचे वेळी गुरूंची अनुमती घ्यावी आणि आता अध्ययन थांबव म्हटल्यानंतर थांबावे असे मनुस्मृतीत (२.१.१६) सांगितले आहे.

''अध्येष्यमाणं तु गुरुर्नित्यकालमतन्द्रितः।
अधीष्य भो इति ब्रूयात् विरामोऽस्त्विति चारमेत।।''

मल्लशर्मशिक्षेमध्ये गुडघ्यावर हात ठेवण्या संदर्भात म्हटले आहे ''उत्तानपाणिं फणवत् कृत्वा सह शलाकया'' (म.श.शि ४)

**२२. प्रणवं प्राक् प्रयुञ्जीत व्याहृतीस्तदनन्तरम्।**
**सावित्रीं चानुपूर्व्येण ततो वेदान् समारभेत्।।२२।।**

वेदपठनाच्या प्रारंभी प्रणवोच्चार (ओंकारोच्चार) करावा. त्यानंतर व्याहृतींचा उच्चार करावा. (सात व्याहृती असल्या तरी ''भूर्भुवःस्वः'' या तीन व्याहृतींचेच उच्चारण या ठिकाणी करावयाचे सांगितले आहे.) त्यानंतर सवितृदेवते संबंधीचा सावित्री मंत्र म्हणावा आणि वेदांच्या पठनाला प्रारंभकरावा.

**स्पष्टीकरण**– हरिवंशपुराणानुसार

''वेदे रामायणे चैव पुराणेषु च भारते।
आदिमध्याऽवसानेषु हरिः सर्वत्र गीयते।।''

असे म्हटले जाते. त्यामुळे प्रणवोच्चार हा देखील वेदावयव असल्याने ॐकारापूर्वी ''हरि'' या पदाचा प्रयोग सूचित केला आहे.

उदा.- हरि: ॐ३ भू-र्भुव: स्व: तत्सवितुर्वरेण्यं असे म्हणून इषेत्त्वोर्ज्जेत्वा पाठामध्ये अर्थात प्रत्येक अध्यायाच्या प्रारंभी पाठाच्या शेवटी हरि: ॐ म्हणून पाठ संपवावा. पाठाच्या प्रारंभी व्याहृती, गायत्री मंत्र एकत्रितपणे म्हणायला हवे. मध्ये किंवा शेवटी तसा नियम नाही कारण या संबंधात मनुस्मृतीमध्ये म्हटले आहे.

ब्रह्मण: प्रणवं कुर्यादादावन्ते च सर्वदा।
स्रवत्यनोङ्कृतं पूर्वं परस्ताच्च विशीर्यति।। (मनु. २.७४)

अर्थात वेदपठनाच्या अगोदर व शेवटी ओंकारोच्चार करावा. तसे न केल्यास पठन विफल होते. (ओंकाराचे वेदपठनाच्या प्रारंभी उच्चारण केले जाते त्यावेळी त्याला 'प्रणव' असे म्हटले जाते. ''प्रणवं प्राक्प्रयुञ्जीत'' या विधानावरून लक्षात येते. पाणिनीने वेदपठनाच्या अगोदर 'ओम्' ला प्लुत उच्चारणाचे विधान केले आहे. यातील 'टि' ला प्रणव हा आदेश करून त्यास प्लुत करण्याचे विधान केले आहे. पतंजलींनी सुद्धा प्रणव याची परिभाषा करताना पादाच्या किंवा अर्धर्चेच्या शेवटी अक्षराचा उपसंहार करून त्याच्या अगोदरचे अक्षरा (टि) च्या जागी ३ मात्रायुक्त ओंकाराचे उच्चारण केले जाते. त्यासच प्रणव म्हणतात. व्याहृती सात आहेत परंतु तीन व्याहृतींचेच ग्रहण करायचे आहे. इतर काही शाखांमध्ये अधिक व्याहृतींचे विधान केलेले आहे. वाजसनेयी संहिता ३३.३ व्या अध्यायातील तिसऱ्या कंडिकेत तीन व्याहृतींचे विधान आहे. गौतमाने पाच किंवा सात व्याहृतींचे विधान केले आहे.''व्याहृतय:पञ्च सप्तान्ता:'' (गौ.स्मृ.१) पद्यात 'समारभेत्' असे परस्मैपदी क्रियापद वापरले आहे.मुळात हे आत्मनेपदी असणे आवश्यक आहे, हा आर्षप्रयोग मानणे आवश्यक.

**२३. कूर्मोऽङ्गानीव संहृत्य चेष्टां दृष्टिं दृढं मनः।**
**स्वस्थः प्रशान्तो निर्भीतो वर्णानुच्चारयेत् बुधः।।२३।।**

ज्याप्रमाणे कासव आपल्या अंगांचा संकोच करते त्याप्रमाणे आपल्या शारीरिक हालचाली, दृष्टि तसेच मन यांना धैर्याने नियंत्रित करून स्वस्थ, प्रशांत, भयरहित होऊन (अध्ययनविधि जाणणाऱ्या) विद्वानाने वर्णांचे उच्चारण करावे.

**स्पष्टीकरण**– बुद्धीला स्थिर करण्यासाठी भगवद्गीतेत कासवाचेच उदाहरण दिले आहे.

यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः।
इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता।। (२.५८)

**२४. नाऽभ्याहन्यान् न निर्हन्यान् न गायेन् नैव कम्पयेत्।**
**यथाऽऽदावुच्चरेद्वर्णांस्तथैवैनान् समापयेत्।।२४।।**

(वर्णोच्चारणात होणारे दोष टाळण्या संबंधातील सूचना) वर्णांच्या जागी अन्य वर्णांचे उच्चारण होऊ नये. स्थान, प्रयत्नरहित उच्चारण करू नये, गाऊ नये, वर्णांचा कंप करू नये. प्रारंभी ज्याप्रमाणे वर्णांच्या उच्चारणाचा प्रारंभ केला त्याच पद्धतीने शेवट करावा. (शेवटपर्यंत एकाच स्वरात उच्चारण व्हावे.)

**स्पष्टीकरण**– **अभ्याहनन** – वर्णव्यत्यय – उदा. ऋचं व्वाचम्... (शु.य. ३६.१) या ठिकाणी 'ऋ' चा उच्चार हनुमूलाने अर्थात 'रे' असा आवश्यक आहे. परंतु तसा तो न होता जिह्वाग्राने (ऋ) उच्चारण केले जाते. रेचं व्वाचं असे उच्चारण न करणे हा अभ्याहननदोष होय.

**निर्हनन**– स्थान, अनुप्रदान आणि प्रयत्नांचे राहित्य म्हणजे निर्हनन होय.

**अ. स्थान**– तालव्यादि स्थानीय वर्णांच्या जागी दन्त्यादींचा उच्चार आणि दन्त्यादींच्या जागी तालव्यांचा उच्चार– उदा. सहस्रशीर्षा... (मा.सं. ३१.१) ऐवजी शहस्रसीर्षा म्हणणे.

**आ. अनुप्रदान**– महाप्राणाचे जागी अल्पप्राणाचा उच्चार करणे म्हणजे अनुप्रदान होय. समिधाग्निं... (मा.सं. ३.१) ऐवजी समिदाग्निं...

**इ. प्रयत्न–** व्वाचस्प्पत**ये** (मा.सं. ७.१) ऐवजी व्वाचस्प्पत**ए** असा उच्चार होणे. ये च्या जागी ए चा उच्चार.

**गायन–** स्वस्थानावर उच्चारण करून त्याच अन्य स्थानावर वाग् इन्द्रियाचे संचालन करून उच्चारण करणे यामुळे ह्रस्वादि मात्रांचे आधिक्य किंवा न्यूनता असे स्वरविषयक दोष निर्माण होतात. या दोषांपासून दूर रहायला हवे.

**कम्प**– तेजोऽसि (शु.य.२२.१) या मंत्राचे उच्चारणाप्रसंगी ''त् त् त् त्तेजोऽसि'' अशाप्रकारे उच्चारण होणे हा कम्प नामक दोष होय. गानामध्ये केवळ स्वरांमध्ये कम्प होतो तर कंपाचा व्यंजनाशी संबध आहे हा गान आणि कम्प मधील भेद आहे.

**परिमाणराहित्य–** कृष्णोंसि... (मा.सं २.१) कृष्ण्णोऽसि – ककारानंतर आलेल्या ऋकाराचे उच्चारण स्वरिताप्रमाणे केल्यास दोष निर्माण होईल.

**२५. सममुच्चारयेद्वर्णान् हस्तेन च मुखेन च।**
**स्वरश्चैव तु हस्तश्च द्वावेतौ युगपत्स्थितौ।।२५।।**

हस्तचालन आणि मुखाने होणारे उच्चारण हे दोन्हीही (परस्परांना जुळणारे) एकाच वेळी करणे आवश्यक आहे. स्वर आणि हस्तचालन एकाच वेळी थांबायला हवेत.

**स्पष्टीकरण**– मुखाने ज्या स्वराचे उच्चारण होत आहे तोच स्वर हाताने दाखविला जायला हवा. जिथे उच्चारण थांबेल तिथे हस्त चालन थांबायला हवे.

**२६अ. हस्तभ्रष्टः स्वरभ्रष्टो न वेदफलमश्नुते।**

(स्वर आणि हाताची स्थिती भिन्न असल्यास वेदाध्ययनाचे फळ मिळत नाही म्हणून हस्तचालन आणि योग्य स्वरोच्चारण आवश्यक आहे.)

वेदाध्ययन करणारा विहित हस्तचालनापासून च्युत झाल्यास आणि (उदात्तादि स्वर) चुकल्यास वेदाध्ययनाचे चतुर्वर्गात्मक (धर्म, अर्थ, काम, मोक्ष) फळ प्राप्त होत नाही.

## २६ब+२७अ. न करालो न लम्बोष्ठो नाऽव्यक्तो नाऽनुनासिकः।।२६।।
## गद्गदो बद्धजिह्वश्च न वर्णान् वक्तुमर्हति।

मोठे दात असणारा, लांब ओठ असणारा, मूर्ख, नेहमी अनुनासिकात उच्चारण करणारा (नासिकेत दोष असणारा) सामर्थ्य नसल्याने वर्णांचे चुकीचे उच्चारण करणारा (तोतरा), थांबून थांबून बोलणारा हे सर्वजण वर्णांचे योग्य उच्चारण करू शकत नाही.

**स्पष्टीकरण**– **गद्गद**– याचे स्पष्टीकरण टीकेमध्ये केले आहे. कण्ठ्य, तालव्य इत्यादी वर्णांचे त्या त्या स्थानाद्वारा जो उच्चारण करू शकत नाही. जो महाप्राणसंज्ञक वर्णांचे उच्चार, अल्पप्राणसंज्ञक करतो. त्यासाठी 'गद्गद' हे विशेषण वापरले आहे.

**बद्धजिह्व**– जिह्वा अधिक खुली होऊ न शकणारा, थांबून थांबून उच्चारण करणारा. कराल, लम्बोष्ठ, अनुनासिक यापासून गद्गद, बद्धजिह्व यांना वेगळे दाखवले आहे कारण गद्गद आणि बद्धजिह्व दोष असणारा औषधोपचाराने सुधारू शकतो परंतु कराल इत्यादी दोष सुधारु शकत नाही.

## २७ब+२८अ. प्रकृतिर्यस्य कल्याणी दन्तोष्ठौ यस्य शोभनौ।।२७।।
## प्रगल्भश्च विनीतश्च स वर्णान् वक्तुमर्हति।

जो दिसण्यास सुंदर आहे (प्रसन्न मुद्रा असणारा आहे), ज्याचे दात, ओठ सुंदर आहेत, जो उत्साही आणि नम्र आहे तो वर्णांचे उच्चारण करण्यास समर्थ आहे.

**स्पष्टीकरण**– शास्त्रात सांगितल्याप्रमाणे 'यत्राकृतिस्तत्र गुणा वसन्ति'– ज्याची प्रकृति चांगली आहे तेथे गुण वास करतात. ही प्रकृति दोन प्रकारची असू शकते. १. ज्याचे शरीर चांगले आहे. जो दिसण्यास सुंदर आहे. २. ज्याचा स्वभाव, चारित्र्य चांगले आहे असा.

## २८ब+२९+३०अ. शङ्कितं भीतमुद्धुष्टमव्यक्तमनुनासिकम्।।२८।।
## काकस्वरं मूर्द्धिगतं तथा स्नानविवर्जितम्।
## विस्वरं विरसं चैव विश्लिष्टं विषमाहतम्।।२९।।

## व्याकुलं तालहीनं च पाठदोषाश्चतुर्दश।

(पठनातील/ अध्ययनातील) एकूण १४ दोष यात सांगितले आहेत. या दोषांचा त्याग करायला हवा. अन्य काही दोष या १४ दोषांतच अंतर्भूत होतील.

**स्पष्टीकरण-**

१. **शमित**- पठण करताना संदेह निर्माण होतो. या ठिकाणी उकार आहे की ओकार आहे अशी शंका निर्माण होत असल्याने हा शंकित दोष आहे.

२. **भीत**- अशुद्ध उच्चारण होईल की काय या भीतीने व्यक्त असूनही ज्यावेळी तोंडातल्या तोंडातच उच्चारण केले जाते त्यावेळी भीत हा दोष होतो.

३. **उद्धुष्ट**- दात ओठखाऊन ज्यावेळी वर्णांचे उच्चारण केले जाते त्यावेळी उद्धृष्टदोष येतो. क्रोधाने अशाप्रकारचे पठन केले जाते, परंपरेत याला दोष मानले आहे.

४. **अव्यक्त**- स्पष्टपणे न उच्चारणे या ठिकाणी अव्यक्त हा दोष येतो.

५. **अनुनासिक**- अनुनासिक नसतानाही नासिकेसह ज्याचे उच्चारण केले जाते तो अनुनासिक दोष होय.

६. **काकस्वर**- 'त्वँष्यविष्ठदाशुषे नृँः पाहि' (मा.सं.१३.५२) याठिकाणी विसर्गाच्या आधी कण्ठ संकोच करून उच्च आवाजात उच्चारण करणे आवश्यक आहे. तसे न होणे हाच काकस्वर दोष होय. कण्ठ दाबून उच्च स्वरात कावळ्याप्रमाणे उच्च उच्चारण होणे म्हणजे काकस्वर दोष होय.

७. **मूर्द्धिनगत**- सर्व वर्णांचा उच्च स्वरात उच्चार करणे म्हणजे मूर्द्धिनगत दोष होय.

८. **स्थानविवर्जित**- ज्या स्थानाचा वर्ण त्या स्थानापासून उच्चार न होणे या ठिकाणी स्थानविवर्जित दोष येतो.



९. **विस्वर**- उदात्त इत्यादी, षड्ज इत्यादी,मन्द्रादि स्वरांनी रहित उच्चारण.

१०. **विरस**– माधुर्यादि गुणांनी रहित, रुक्ष असे उच्चारण.

११. **विश्लिष्ट**– वर्णांच्या संहितांचा (संधींचा) त्याग करून संधी रहित उच्चारण हा विश्लिष्ट दोष होय.

१२. **विषमाहत**– स्वर, वर्णांच्या उच्चारणाच्या निर्धारित मात्रांचे अयोग्य उच्चारण म्हणजे हा दोष होय. ह्रस्व मात्रेच्या ठिकाणी दीर्घ मात्रांचे उच्चारण आणि दीर्घ मात्रांचे ह्रस्व उच्च्चारण यासारखे दोष यात येतात.

१३. **व्याकुल**– चित्तविक्षेपामुळे वर्ण स्वरांचे विषम उच्चारण.

१४. **तालहीन**– मंत्रोच्चारणामध्ये विशिष्ट लय न ठेवणे. योग्य ठिकाणी विराम न घेता तालाचे वैषम्य म्हणजे तालहीन हा दोष होय.

हे चौदा पाठदोष होत. यातील मूर्ध्निगत किंवा मूर्धगत हा दोष सांगितला असला तरी यज्ञातील तृतीय सवनात हा गुण आहे. पाणिनीय शिक्षेत (३७) तृतीय सवनातील मूर्ध्नगत (उच्चस्वरात) मंत्र म्हणण्यास सांगितले आहे.

**३०ब+३१अ संहितासारबहुलः पदसंज्ञासमाकुलः।।३०।।**
**क्रमसन्धिसमाकीर्णो दुस्तरो मन्त्रसागरः।**

(ऋक्, यजुस्, सामांनी युक्त अशा आर्ष) संहितारूप रत्नांचे बाहुल्य असणारा, पदरूप संज्ञेने (अर्थज्ञान साधनांनी) व्याप्त आणि (पदपाठाने युक्त) क्रमरूप संधीने युक्त (क्रमपाठाने युक्त) हा मंत्रसागर पार करणे अत्यंत कठीण आहे.

**स्पष्टीकरण**– 'पदसंज्ञासमाकुलः' या पदाचे दोन अर्थ–

**अ**. पदरूप संज्ञांनी व्याप्त – पदपाठाने पदज्ञान होते.

**आ**. पदरूप अर्थज्ञानाच्या साधनांनी व्याप्त.

पदपाठ हाच अर्थज्ञानाचे साधन बनतो. वेदातील संहितापाठ, पदपाठ, क्रमपाठ यांचे प्रतिपादन अनुक्रमे सार, संज्ञा, संधी या पदांनी केले आहे. ही सारी

विशेषणे सागरालाही लागू पडतात. सागरपक्षी सार म्हणजे रत्न, संज्ञा म्हणजे जलचर (मगर इत्यादी), संधी म्हणजे आवर्त असे अर्थ करता येतात.

## ३१ब+३२अ. ऋक्संहितां त्रिरभ्यस्य यजुषां वा समाहितः।।३१।।
## सामनां वा सरहस्यां च सर्वपापैः प्रमुच्यते।

**अध्ययनाचे फल**- रहस्यांसह ऋक्, यजुस्, साम संहितांचे एकाग्र होऊन तीन वेळा पाठ केल्यानंतर मानव सर्व पापां पासून मुक्त होतो.

**स्पष्टीकरण**- वेदांचे रहस्यांसह पठन करण्याचे सांगितले आहे. वेदांचा गूढ अर्थ समजून घ्यायला हवा तरच सर्व पापां पासून मुक्ती मिळणार आहे. वेदांचा गूढ अर्थ उपनिषदांमध्ये सांगितला आहे. वेदाभ्यास पाच प्रकारचा असल्याचे दक्षस्मृतीत (२.३४) सांगितले आहे.

वेदस्वीकरणं पूर्वं विचारोऽभ्यसनं जपः।
तद्दानं चैव शिष्येभ्यो वेदाभ्यासो हि पञ्चधा।।

'वेदस्वीकार, त्याचा विचार, त्याचा अभ्यास, त्याचा जप आणि त्याचे दान' अशाप्रकारे वेदाभ्यास पाच प्रकारचा आहे.

## ३२ब+३३अ. संहिता नयते सूर्यं पदं च शशिनः पदम्।।३२।।
## क्रमश्च नयते सूक्ष्मं यत् तत् पदमनामयम्।

(संहिता पद क्रम यांच्या पाठांच्या धारणेने प्राप्त होणारी फळे.) संहितापाठ सूर्यलोकाकडे घेऊन जातो. पदपाठ चंद्रलोकाकडे घेऊन जातो. तर क्रमपाठाने विकाररहित सूक्ष्म स्थान प्राप्त होते.

## ३३ब+३४अ. कालिन्दी संहिता ज्ञेया पदमुक्ता सरस्वती।।३३।।
## क्रमेणाऽऽवर्तिता गङ्गा शम्भोर्वाणी तु नान्यथा।

संहिता ही कालिंदी जाणावी, पदपाठास सरस्वती म्हणले जाते आणि क्रमपाठास पूर्णपणे अवगाहान केलेली गंगा म्हटले जाते. ईश्वराची ही वाणी (वेद) कधीच व्यर्थ असत नाही.

**स्पष्टीकरण**- संहिता पाठाने यमुनास्नानाचे फळ मिळते, पदपाठाने सरस्वती नदीत अवगाहन केल्याचे फळ मिळते आणि क्रमपाठाने गंगास्नानाने निर्माण होणारे मुक्ति हे फळ प्राप्त होते. हे याठिकाणी सांगायचे आहे. संहिता, पद, क्रम यांनी युक्त वेद जणुकाही प्रयागतीर्थ होय असे या ठिकाणी सूचित केले आहे.

## ३४ब+३५अ. यथा महाह्लदं प्राप्य क्षिप्तो लोष्टो विनश्यति।।३४।। एवं दुश्चरितं सर्वं वेदे त्रिवृति मज्जति।

ज्याप्रमाणे मोठ्या तलावात फेकलेले मातीचे ढेकूळ (तलावात) नाहीसे होते (विलीन होते.) त्याचप्रमाणे सारे दुष्ट आचरण (संहिता, पद, क्रम या तीन युक्त) वेदामध्ये विलीन होते. (नष्ट होते)

**स्पष्टीकरण**- वेदाध्ययन करताना पवित्र आचाराचे मोठे महत्त्व आहे. षडंगांसह वेदांचे अध्ययन केले परंतु आचारहीन असेल तर पंख फुटलेले पक्षी घरटे सोडून जातात त्याप्रमाणे वेद त्याला सोडून जातात. असे एका श्लोकात म्हणले आहे.

आचारहीनं न पुनन्ति वेदा: अथाप्यधीत: सह षड्भिरङ्गै:।
छन्दांस्येनं मृत्युकाले त्यजन्ति नीडं शकुन्ता इव जातपक्षा:।।

## ३५ब+३६अ. आम्रपालाशबिल्वानामपामार्गशिरीषयो:।।३५।। वाग्यत: प्रातरुत्थाय भक्षयेद्दन्तधावनम्।

वर्णोच्चारणास साहाय्यकारक कामे- प्रात:काली उठून मौनपणे आम्र, पलाश, बेल, अपामार्ग (आघाडा) शिरीष यांपैकी एका वृक्षाची काडी (दंतकूर्च) विधिपूर्वक चावावी.

**स्पष्टीकरण**- प्रात:काली उठून नित्यकर्म करण्याचे प्रतिपादन स्मृतींमध्ये केले आहे.

ब्राह्मे मुहूर्ते चोत्थाय चिन्तयेदात्मनो हितम्। या.स्मृ.१.१२५

प्रात:कालीन कर्मांचा उल्लेख लघुहारित स्मृतीत (४.४,५) पुढीलप्रमाणे केला आहे.

स्नानं कार्यं ततो नित्यं दन्तधावनपूर्वकम्।
उष:काले समुत्थाय कृतशौचो यथाविधि।।

**दन्तधावनम्**– दन्ता: धाव्यन्ते अनेन। अर्थात दात स्वच्छ करण्याच्या काडीस दन्तधावन असे म्हणले आहे. दन्तधावनाचा मंत्र मिताक्षरा टीकेत (या.स्मृ. १.९८) दिला आहे.

आयुर्बलं यशो वर्च: प्रजा: पशुर्वसूनि च।
ब्रह्म प्रज्ञां च मेधां च त्वं नो देहि वनस्पते।।

असा मंत्र म्हणून 'औदुम्बरेण दन्तान् धावेत्' पारस्करगृह्यसूत्रात (२.६.१७) दन्तधावनासाठी पुढील मंत्र आला आहे.

ॐअन्नाद्याय व्यूहध्वं सोमो राजायमागतम्।
समे मुखं प्रमाक्ष्यते यशसा च भगेन च।।

**३६ब+३७. खदिरश्च कदम्बश्च करवीरकरञ्जकौ।।३६।।**
**सर्वे कण्टकिन: पुण्या: क्षीरिणश्च यशस्विन:।**
**तेनास्य करणे सौक्ष्म्यं माधुर्यं चैव जायते।।३७।।**

(वरील वृक्षांप्रमाणेच खदिर इत्यादी वृक्ष देखील दन्तधावनासाठी घ्यावेत हे या श्लोकात सांगितले आहे.) खैर, कदम्ब, कह्रेर, करंज इत्यादी वृक्ष दन्तधावन म्हणून स्वीकारण्यास योग्य आहेत. सर्व काटे असणारे वृक्ष आणि दुग्धयुक्त (तोडल्यावर दूध येणारे) वृक्ष यशप्रद होत. या दन्तधावनांमुळे वर्णोच्चारणाच्या साधनांमध्ये सूक्ष्मता आणि माधुर्य निर्माण होते.

**स्पष्टीकरण**– वर्णोच्चारांची करणे अनेक आहेत. परंतु 'जातौ एकवचनम्' यानुसार 'करणम्' शब्द एकवचनी वापरला आहे. (करण याचा अर्थ वर्णोच्चाराच्या निर्मितीस कारण असणारी वागेंद्रियांतील नेमके स्थान.)

३८. त्रिफलां लवणाक्तां वै भक्षयेच्छिष्यकः सदा।
क्षीणमेधाजनन्येषा स्वरवर्णकरी तथा।।३८।।

शिष्याने मीठ मिश्रित त्रिफळाचे नियमित भक्षण करावे. कारण (अशी त्रिफळा) क्षीण झालेली मेधा शक्ती वाढवणारी आणि स्वर, वर्ण यांना स्पष्टता आणणारी असते.

**स्पष्टीकरण**– त्रिफळा म्हणजे हिरडा, बेहडा आणि आवळा होय. यांचे भक्षण नियमित करावे.

'**स्वर**' याचा आशय असा आहे की, दीर्घकाळ प्राणवायूचा निरोध. यामुळे प्लुतादि स्वरांचे उच्चारण करताना सामगानाचे वेळी श्वास मधेच सुटण्याच्या दोषाचे निराकरण होते. **वर्ण** म्हणजे वर्णोच्चारचे सामर्थ्य, या सामर्थ्यानेच वर्णोच्चारात स्थैर्य येते.

३९. हस्तहीनं तु योऽधीते मन्त्रं वेदविदो विदुः।
न साधयेद्याजुषाणि भुक्तमव्यञ्जनं यथा।।३९।।

व्यंजनाशिवाय (दही, जिरे इत्यादींशिवाय) खाल्लेले अन्न ज्याप्रमाणे रस, पाक इत्यादी रूपातील फळ निर्माण करत नाही त्याप्रमाणे हाताशिवाय केवळ मुखाने स्वर देण्याने केले जाणारे याजुष मंत्राच्या अध्ययनाचे फळ देत नाही असे वेदवेत्ते मानतात.

४०. ऋचो यजूँषि सामानि हस्तहीनानि यः पठेत्।
अनृचो ब्राह्मणस्तावद् यावत्स्वारं न विन्दति।।४०।।

(हस्तचालनाशिवाय वेदपठन करीत असेल तर त्याला वैदिकही मानले जात नाही.) ऋक्, यजुस् त्याचप्रमाणे साम संज्ञक मंत्रांचे पठन हाताने स्वर न देता होत असेल तर तो (मंत्रपाठ करणारा) ब्राह्मण, वेदपठन करणारा जो पर्यंत हाताने स्वर देत नाही तोपर्यंत अवैदिक ठरतो.

**स्पष्टीकरण**– सर्व वेदांचेच स्वर हातानेही द्यायला हवेत. हे या कारिकेतून सूचित केले आहे.

**अनृच**– हे ब्राह्मणाचे विशेषण होय. हाताने स्वर दाखविले गेले नाहीत तर तो ब्राह्मण अनृच ठरतो म्हणजे अवैदिक ठरतो. ऋच् हा शब्द ऋक्, यजुस्, साम या तीनही मंत्रसमुदायाचा बोधक आहे.

**ब्राह्मण**– याचे दोन अर्थ होतात.ब्रह्म जाणणारा, वेदपठन करणारा.संदर्भानुसार दुसरा अर्थ घेणेच योग्य होय.

## ४१. हस्तहीनं तु योऽधीते स्वर–वर्णविवर्जितम्।
## ऋग्यजु:सामभिर्दग्धो वियोनिमधिगच्छति।।४१।।

(हस्तस्वर न दिल्यास अदृष्ट फल मिळत नाही. हे या श्लोकात सांगितले आहे.)

जो वेदपाठक स्वर, वर्ण यांनी रहित आणि हाताने स्वर न दाखवता वेदाध्ययन करतो तो ऋग्, यजुस्, साम यांजकडून दग्ध होऊन त्यावर अनर्थ ओढवतो आणि तो मानवेतर योनीत जन्माला जातो.

**स्पष्टीकरण**– पठनाचे तीन मुख्य घटक आहेत– स्वर, वर्ण आणि हस्तद्वारा स्वरप्रदर्शन.

**अ**. उदात्तादि स्वरांचे ह्रस्व, दीर्घ, प्लुत इत्यादींचे योग्य ज्ञान आणि उच्चारण व्हायला हवे.

**आ**. वर्णांचे देखील उच्चारण स्थान, प्रयत्न या द्वारा योग्य व्हायला हवे.

**इ**. स्वराप्रमाणे हाताची हालचाल योग्यप्रकारे व्हायला हवी.

या तीनही अंगांपैकी एकाही अंगाच्या हीन पाठाने अनर्थ ओढवणार आहे हे या ठिकाणी सांगितले आहे.

## ४२. ज्ञातव्यश्च तथैवार्थो वेदानां कर्मसिद्धये।
## पठन् मात्रापपाठात्तु पङ्के गौरिव सीदति।।४२।।

अर्थज्ञानही होणे आवश्यक आहे.

वैदिक कर्मांसाठी वेदांचा अर्थ जाणणेही आवश्यक आहे. मात्रेच्या अशुद्ध पठनाने पठन कर्त्यास चिखलात अडकलेल्या गायीप्रमाणे दु:ख होते.

**स्पष्टीकरण**- अर्थज्ञानाशिवाय मंत्रांचे यथार्थ ज्ञान होणार नाही. मात्रांचे योग्य ज्ञान न झाल्यास अशुद्ध पठन होईल आणि परिणामी दु:ख भोगावे लागेल असे यात सांगितले आहे. 'पठन् मात्रा पाठात् तु' या ऐवजी 'पाठमात्रावसानस्तु' असाही पाठभेद दिसून येतो. 'केवळ पठन यातच इतिकर्तव्यता मानणारा' दु:खी होतो असा या पाठाचा आशय आहे आणि संदर्भानुसार तो अधिक योग्य वाटतो. उच्चारणशास्त्र असणाऱ्या शिक्षा ग्रंथामध्ये देखील वेदाचा अर्थ जाणून घ्यायला सांगितले आहे.

निरुक्तातही- स्थाणुरयं भारहार: किलाभूत्...(नि.१.१८) इत्यादी मंत्रात वेदांच्या अर्थज्ञानाचे महत्त्व सांगितले आहे.

## ४३अ. आगमं कुरु यत्नेन कारणं हि तदात्मकम्।

(मागील अर्थच पुढेही स्पष्ट केला आहे.) आगमांचे (वेदाङ्गांचे) प्रयत्नपूर्वक अध्ययन करणे आवश्यक आहे. कारण कर्मसिद्धीसाठी मात्रादि ज्ञान महत्त्वाचे आहे.

**स्पष्टीकरण**- फलसिद्धिसाठी मात्राविज्ञान महत्त्वाचे आहे. हे ज्ञान तदात्मक (अर्थज्ञानात्मक)आहे. म्हणून अर्थबोधक अशा षडंगांचे अध्ययन व्हायला हवे.

## ४३ब+४४अ. आस्येन च शयं कुर्यात् पठन् नान्यमतिर्भवेत्।।४३।।
## न चाऽस्य मुष्टिबन्धी स्यान्न चाऽत्युत्तममाचरेत्।

मुखाने उत्पन्न होणाऱ्या वर्णांबरोबरच हस्तप्रदर्शन होणे आवश्यकच आहे. पठन करताना विचलितबुद्धीचे होऊ नये. हाताची मूठ वळू नये. तसेच हात अगदी मोकळाही असणे योग्य नाही.

**स्पष्टीकरण**- 'न चासौ मुष्टिबन्धी स्यात्' असाही पाठभेद आहे. हा पाठही योग्य आहे. कारण न चास्य... या पाठात 'अस्य' याचा अर्थ 'हस्तस्य' असा घ्यावा लागतो आणि त्याचा अर्थ मुष्टिबन्धीशी जुळत नाही. परंतु हा अर्थात वेदपाठक मूठ वळणारा नसावा हा अर्थ योग्य ठरतो. 'शय' चा अर्थ हस्त असा आहे.

**४४ब+४५अ. चुलुनौंका स्फुटो दण्डी स्वस्तिको मुष्टिकाकृतिः।।४४।।**
**एते वै हस्तदोषाः स्युः परशुश्चैव सप्तमः।**

(हाताच्या ठेवणीनुसार होणारे सात दोष) चुलु (चूळ भरण्यासाठी ज्याप्रमाणे हात केला जातो), नौका (नावे प्रमाणे हाताची ठेवण), स्फुट (मोकळी बोटे असणे) दण्डाची आकृती असणारा, स्वस्तिक आकृति असणारा, मुठीचा आकार असणारा आणि सातवा परशूचा आकार असणारा हात असणे हे अध्ययनाचे वेळी निश्चितच हस्तदोष होत. (हे सात हस्तदोष टाळायला हवेत हे या ठिकाणी सांगितले आहे.)

**४५ब+४६अ. स्वर-वर्णान् प्रयुञ्जानो हस्तेनाऽधीतमाचरन्।।४५।।**
**ऋग्यजु:सामभिः पूतो ब्रह्मलोकमवाप्नुयात्।**

(यथाविधि) स्वर वर्णांचा प्रयोग करणारा आणि त्याच प्रमाणे हस्तस्वर दाखवून अध्ययन करणारा (वेदपाठक) ऋग्यजु:सामांनी (या त्रिविध मंत्रांनी) पवित्र होऊन ब्रह्मलोक प्राप्त करतो.

**४६ब+४७अ. न कुर्वीत पदं दीर्घं न चाऽत्यन्तविलम्बितम्।।४६।।**
**पदस्य ग्रहमोक्षौ च यथा शीघ्रगतिर्हयः।**

(पदोच्चारणाविषयी नियम या श्लोकात दिला आहे.)

(वेदपाठकाने) पदोच्चारण दीर्घ करू नये तसेच अत्यंत विलंबित करू नये तर शीघ्रगती असणाऱ्या अश्वाप्रमाणे पदाचे उच्चारण आणि मोक्ष (उच्चारणानंतर त्याग) विलंब न करता करावे.

**स्पष्टीकरण**- ज्याप्रमाणे शीघ्रगती असणारा घोडा पाऊल उचलताना आणि ठेवताना उशीर करत नाही तसेच या गतीत एक सातत्य असते त्याचप्रमाणे एका पदाच्या उच्चारणानंतर ते पद सोडून पुढील पदाचे उच्चारण करावे.

**४७ब+४८अ. यथा वाणी तथा पाणी रिक्तं तु परिवर्जयेत्।।४७।।**
**यत्र यत्र स्थिता वाणी पाणिस्तत्रैव तिष्ठति।**

शून्यहस्तस्थळास सोडून ज्याप्रमाणे पदांचे उच्चारण चालू आहे त्याप्रमाणे हाताची (पाणि) स्थिती असायला हवी. ज्या ठिकाणी वाणी स्थित होते त्या ठिकाणीच हात थांबायला हवा.

**स्पष्टीकरण**– 'रिक्तं तु परिवर्जयेत्' शून्य हस्तस्थळास सोडून– शून्य हस्तस्थळाचे ठिकाणी पूर्व स्वर दाखवण्यासाठी हात ज्या ठिकाणी असेल त्या ठिकाणीच स्थिर ठेवावा, परंतु मुखस्वराचा अभाव असेल तर त्यावेळी 'वाणी' आणि 'पाणि' यांची समस्थिती भग्न होते. या दोन मात्रा असणारा काळ संपल्यानंतर लगेच वाणीनुसार पुढील स्वर दाखवण्यासाठी शीघ्रगतीने हस्तसंचालन करणे आवश्यक आहे. ज्यामुळे वाणी आणि पाणि यांची समानता निर्माण होईल.

## ४८ब+४९अ. यथा धनुष्याऽऽवितते शरे क्षिप्ते पुनर्गुणः।।४८।। स्वस्थानं परिपद्येत तद्वद्धस्तगतः स्वरः।

(यासाठी दिलेला दृष्टांत) ज्याप्रमाणे धनुष्याला ओढून त्याला जोडलेला बाण सोडल्यानंतर धनुष्याला जोडलेली दोरी परत आपल्या स्थानी येते त्याप्रमाणे हस्तस्वर दाखवून हात आपल्या जागी यायला हवा.

## ४९ब+५०अ. अभ्यासार्थे द्रुतां वृत्तिं प्रयोगार्थे तु मध्यमाम्।।४९।। शिष्याणामुपदेशार्थे कुर्याद् वृत्तिं विलम्बिताम्।

(वर्णांच्या उच्चारणाच्या लयीसंबंधात या कारिकेत सांगितले आहे.) अभ्यास करताना द्रुत वृत्तीचा (शीघ्र वृत्तीचा) (अर्धमात्रा वृत्तीचा) आधार घ्यावा. मंत्र प्रयोग करीत असताना (विधीच्या वेळी) मध्यम वृत्तीचा आधार घ्यावा तर अध्यापन करताना विलम्बित वृत्तीचा आधार घ्यावा.

**स्पष्टीकरण**– मंत्रपाठ करताना तीन वृत्तींचा निर्देश या ठिकाणी केला आहे. ग्रंथाचा स्वाध्याय करताना शीघ्रोच्चारण आवश्यक आहे. यज्ञानुष्ठान किंवा इतर विधींच्या प्रसंगी अतिशीघ्र किंवा अतिसंथ न म्हणता मध्यमवृत्तीचा अवलंब करावा तर शिष्यांना शिकविताना संथगतीचा (विलंबित वृत्तीचा) आधार घ्यावा.

**द्रुतवृत्ती**– अक्षरांच्या उच्चारणास जो काळ सांगितला आहे त्याच्या निम्म्याकाळाने उच्चारल्याजाण्याच्या वृत्तीस द्रुतवृत्ती म्हणले जाते. म्हणून ह्रस्व स्वरास अर्ध मात्रा काळ, दीर्घ स्वरास एक मात्रा काळ, प्लुत स्वरास दीड मात्रा काळ घेऊन उच्चारण करणे हीच द्रुतवृत्ती होय. 'अर्धमात्रं द्रुतं ज्ञेयं द्रुतार्धश्चाप्यनुद्रुतम्।' अर्थात उच्चारणाच्या निर्धारित मात्रेच्या अर्धमात्रेच्या काळात उच्चारण करणे यास द्रुतवृत्ती म्हणतात व त्याहीपेक्षा निम्मामात्रा काळ म्हणजे अनुद्रुत होय. या अनुद्रुत वृत्तीचा उल्लेख मात्र याठिकाणी आलेला नाही. या संदर्भानुसार द्रुतवृत्तीच्या तुलनेत मध्यम वृत्तीत किती अधिक काळ द्यावा लागतो हे मात्र लक्षात येत नाही. महाभाष्यकार पतंजलींनी (तपरस्तत्कालस्य – पा. १.१.७० वरील पातंजल भाष्य) या संबंधात अधिक प्रकाश टाकला आहे.

## ५०ब+५१अ. ऐन्द्री तु मध्यमा वृत्तिः प्राजापत्या विलम्बिता।।५०।।
## अग्निमारुतयोवृत्तिः सर्वशास्त्रेषु निन्दिता।

(द्रुतवृत्ती सर्वत्र योग्य नव्हे, हे देवतांचा उल्लेख करून सांगितले आहे.)

मध्यमावृत्ती ही इंद्र देवता असणारी आहे तर विलंबित वृत्ती प्रजापति देवता असणारी आहे. द्रुत ही वृत्ती अग्नि आणि वायु देवता असणारी आहे. तसेच ही वृत्ती सर्व शास्त्रांमध्ये निंदित आहे.

**स्पष्टीकरण**– अग्नि आणि वायूचा दावानलाशी योग असताना ज्याप्रमाणे हानी होते त्याप्रमाणे उभयदेवतात्मक वृत्तीने सुद्धा हानी होते. नारदीय शिक्षेत म्हणले आहे–

मन्द्रेणोत्क्रमेत्पूर्वं सर्वशाखास्वयं विधिः।
सप्तमन्त्रानतिक्रम्य यथेष्टां वाचमुत्सृजेत्।।

न तां समीरयेद्वाचं या प्राणमुपरोधयेत्।
प्राणानामुपरोधेन वैस्वर्यं चोपजायते।।

स्वरव्यञ्जनमाधुर्यं लुप्यते नात्र संशयः।। (ना.शि. ८–१०)

## ३. हस्तचालनविधिः (कारिका ५१ ते ७५)

## ५१ब+५२अ. उत्तानं सोन्नतं किञ्चित् सुव्यक्ताङ्गुलिरञ्जितम्।।५१।।
## स्वरविच्च करं कुर्यात् प्रादेशोद्देशगामिनम्।

स्वर जाणणाऱ्या (वेदपाठकाने) प्रादेशामध्ये संचालन करताना (हात) निश्चित स्थानी जाण्याच्या उद्देशाने स्पष्ट बोटांनी दाखविता येईल असा काही उंचीवर तळवा वर असलेला हात ठेवावा.

**स्पष्टीकरण**– प्रादेशाचे स्पष्टीकरण पुढील ५२ व्या कारिकेत दिले आहे. 'उत्तानं सोन्नतं किञ्चित्।' याचे तात्पर्य– बोटांचा अग्रभाग हे काही उंच अशा स्थानी असणे आणि वर तळवा असलेले असा आहे. मल्लशर्म शिक्षेत सर्पफणाकार हात वेदपठनाच्यावेळी असावा असे सांगितले आहे. बोटांच्या अग्रभागांना सरळ ठेवल्याने, व काहीसे उंच केल्याने इतर बोटांचा आकार सर्पफण्याप्रमाणे होतो.

उत्तानपाणिं फणवत्कृत्वा सह शलाकया।
गुरुं प्रणम्य मनसा ततः स्वाध्यायवान्भवेत्।। (म.श.शि.४)

## ५२ब+५३अ. अङ्गुष्ठस्योत्तरं पर्व तर्जन्योपरि यद्भवेत्।।५२।।
## प्रादेशस्य तु सोद्देशस्तन्मात्रं चालयेत् करम्।

(वरील कारिकेत प्रादेश अंतरावर हाताची हालचाल सांगितली आहे.) अंगठ्याचे वरचे पर्व आणि तर्जनीचा वरचा भाग यामध्ये जे (अंतराल) अंतर हेच प्रादेशाचे माप होय. याच (दशांगुलमात्रा) अंतरात हस्तचालन करावे.

**स्पष्टीकरण**– ताणलेल्या हातामध्ये अंगठा आणि तर्जनीच्या अग्रबिंदूच्या मध्ये जे अंतराल तयार होते ते अङ्गुलप्रमाण होय. अमरकोशात म्हणले आहे–

प्रादेश–ताल–गोकर्णास्तर्जन्यादियुते तते। अङ्गुष्ठे सकनिष्ठे स्याद्... (अमर २.६.८४)

कनिष्ठेसह अंगठा विस्तारित केला असता अंगठ्यापासून तर्जनीपर्यंतचा '**प्रादेश**' होय. अंगठ्यापासून मध्यमेपर्यंतचा '**ताल**' होय. अंगठ्यापासून अनामिकेपर्यंतचा '**गोकर्ण**' होय.

५४ व्या कारिकेत अनुदात्तापासून उदात्तस्थानापर्यंत हात नेण्याचे अंतराल नवांगुल (९ अंगुल) परिमाण सांगितले आहे. काही संस्कृत टीकाकारांनी दशांगुल परिमाण मानले आहे.

अनुदात्तापासून उदात्तस्थानाकडे हात नेणे यातच सर्वाधिक हस्तचालन होणार आहे. यापेक्षा अधिक हस्तचालन अन्य कोठेही होणार नाही.

## ५३ब+५४अ. मनुष्य-तीर्थोच्चं कृत्वा पितृ-तीर्थोदकं व्रजेत्।।५३।। नामितं करपृष्ठन्तु सुव्यक्ताङ्गुलिमोक्षणम्।

(हस्तचालनासंबंधात 'प्रादेश' परिमाण सांगून हस्तचालनातील हाताच्या भागांचा विचार येथे केला आहे. मनुष्यतीर्थोच्चम् = मनुष्यतीर्थम् उच्चं यथा स्यात् तथा कृत्वा)

मनुष्यतीर्थास उंच करून, पितृतीर्थातून पाणी पडेल अशाप्रकारे हात वाकवून तसेच अङ्गुलिमोक्ष करून हाताची स्थिती करावी.

(मनुष्यतीर्थ, पितृतीर्थ या हाताच्या भागातील पारिभाषिक संज्ञा होत.)




**मनुष्यतीर्थ**- कनिष्ठेच्या मूळ भागास मनुष्यतीर्थ म्हणले जाते.

**पितृतीर्थ**- अंगुष्ठ आणि तर्जनीच्या मध्यवर्ती प्रदेशास पितृतीर्थ म्हणले जाते.



**देवतीर्थ**- बोटे सरळ ठेऊन बोटांचा अग्रभाग हा देवतीर्थ होय.

बोटे सरळ ठेऊन पितृतर्पणाच्यावेळी जलदान करताना जशी हस्तमुद्रा करतात तशी हस्तमुद्रा करावी हे यात सांगितले आहे.

मनुष्यतीर्थासच नृतीर्थ,मानुषतीर्थ, कायतीर्थ, प्रजापतितीर्थ म्हणले जाते. अमरकोशात म्हटले आहे- अङ्गुल्यग्रे तीर्थं दैवं स्वल्पाङ्गुल्योर्मूले कायम्। मध्येऽङ्गुष्ठाङ्गुल्यो: पित्रं मूले त्वङ्गुष्ठस्य ब्राह्मम् (अमर.२.७...) याज्ञवल्क्यस्मृतीतच मनुष्यतीर्थास प्रजापतितीर्थ म्हटले आहे. (याज्ञ.स्मृ. १.१९)

## ५४ब+५५अ. स्वरिते त्र्यङ्गुलं विद्यान्निपाते तु षडङ्गुलम्।।५४।।
## उत्थाने तु नवाङ्गुल्यमेतत्स्वारस्य लक्षणम्।

(उदात्तस्थानावरून)स्वरित स्थानापर्यंत (हात नेत असता) तीन अंगुल परिमित (अन्तराल) असावे. (अर्थात स्वरितापासून डाव्या बाजूला दाखविल्या जाणाऱ्या उदात्ताचे अंतरही त्र्यंगुल असावे.) स्वरितस्थानावरून अनुदात्तस्थानाकडे हात नेला असता सहा अंगुले परिमित (अन्तराल) असावे तसेच (अनुदात्तापासून) उदात्त स्थानाकडे (हात नेला असता) नऊ अंगुले परिमित अन्तराल असावे. स्वरसंबंधी (हस्तचालनाचे) हे लक्षण होय.

**स्पष्टीकरण**- उदात्त → स्वरित → तीन अंगुले अंतराल.
स्वरित → अनुदात्त → सहा अंगुले अंतराल.
अनुदात्त → उदात्त → नऊ अंगुले अंतराल.

याज्ञवल्क्यशिक्षेच्या १९ व्या कारिकेत वेदपठन करताना हाताने स्वर दाखविण्याचे सांगितले आहे. (शु.य.प्रा.१/१२१) सूत्रातही 'हस्तेन ते...' असे म्हटले आहे. सामान्यत: उदात्त स्वर दाखविताना हात वर नेला जातो, अनुदात्ताचे वेळी खाली नेला जातो व स्वरिताचेवेळी मध्यभागी राहतो.

स्वर दाखविताना त्र्यंगुल/ षडङ्गुल/ नवङ्गुल हे परिमाण सांगितले आहे ते परिमाण किंचित खाली मुख करून अध्ययन करणाऱ्याच्या बाबतीत संभवते. अनुदात्त

स्वर प्रदर्शित करताना हात खाली नेला जातो (निपातन केले जाते.) म्हणून निपातनाचा अर्थ अनुदात्ताचे स्थान हे आहे.

## ५५ब+५६अ. उदात्तं तु भ्रुव: प्रान्ते प्रचयं नासिकाग्रत:।।५५।। हृत्प्रदेशऽनुदात्तं तु तिर्यग् जात्यादिरीरित:।

(**उदत्तादींची स्थाने**)

उदात्त स्वर भुवईजवळ, प्रचय स्वर नासिकेच्या अग्रभागी आणि अनुदात्त स्वर हृदयाच्या जवळ हात आणून प्रदर्शित करावा. जात्य इत्यादी स्वरित स्वर हात तिरपा नेऊन दाखवावा.

**स्पष्टीकरण**– उदात्त स्वर भुवईजवळ अर्थात उजव्या कानाच्या जवळ (कर्णमूल) दाखवावा. प्रचय आणि स्वरित हे नासिकेच्यासमोर दाखवावेत. **का**त्यायन **प**रिशिष्ट **प्र**वर सूत्र १.४–६ यामध्ये म्हटले आहे, हृद्यनुदात्त: । मूर्धन्युदात्त: । श्रुतिमूले स्वरित: ।

उदा.– **उदात्त**– अग्ना३इ – (मा.सं.८.१०)

**अनुदात्त**– त्वा (मा.सं.१.१)

अवग्रहानंतर स्वरित/प्रचय– प्रजावतीरिति प्रजा। व्वती (मा.सां.१.१) **व्वती** हे अनुक्रमे स्वरित आणि प्रचय होत.

| | |
|---|---|
| **जात्य, अभिहित, क्षैप्र, प्रश्लिष्ट** | अनुदात्तानंतर येणारे स्वरित– पुढे उदात्त नसताना तिरकेच दाखवले जातात. त्यावेळी हे पितृपिण्ड देण्याच्या मुद्रेप्रमाणे डाव्या बाजूस अर्धन्युब्ज हात करून दाखवतात. |

जात्यादींनंतर उदात्त स्वर असताना– मनुष्यतीर्थ मुद्रेप्रमाणे डाव्या बाजूस पूर्ण न्यूब्ज हात करून दाखवितात.

'चत्वारस्तिर्यक् स्वरिता:। अनुदात्तं चेत्पूर्वं तिर्यङ्निहत्य काण्वस्य ऋजुं निहत्य प्रणिहन्यत उदात्ते (शु.य.प्रा. १.१२२–१२४)

**जात्य**– व्वैष्णव्यौ– (मा.सं.१.१२)

**अभिनिहित**– व्वेदोसि – (मा.सं.२.२१)

**अभिनिहित**– अब्भ्यर्षत – (मा.सं.१७.९८)

**क्षैप्र**–अभीन्धतामुखे – (मा.सं.११.६१)

वरील सर्व ठिकाणी जात्यादीं पूर्वी अनुदात्त आहे आणि पुढे उदात्त आलेला नाही.

म्हणून हे **अर्धन्युब्ज** आहेत.

**जात्य**– भूर्भुवस्स्वर्द्यौरिव – (मा.सं.३.५)

**अभिनिहित**– प्रसवेश्विनोर्बाहुभ्याम् – (मा.सं.१.१०)

**क्षैप्र**– विश्श्वन्न्युत्रिणम् – (मा.सं.१७.७६)

**प्रश्लिष्ट**– स्रुचीवेर्ति – (मा.सं.२०.६९)

वरील उदाहरणात जात्यादींनंतर उदात्त स्वर आल्याने हे **पूर्णन्युष्ण** होत.

## ५६ब+५७अ. षडङ्गुलं तु जात्यस्य हस्तस्याऽनुपथस्य च।।५६।। तच्चतुर्भागमात्रं तु हस्तं तेनैव वर्त्तयेत्।

जात्यस्वर दाखविताना पूर्णन्युब्ज/ दाखविणाऱ्या हाताचे ६ अंगुलांचे अंतराल असते. त्याचप्रमाणे त्याच मार्गाचे अवलंबन करून परत फिरणाऱ्या हाताचेही ६ अंगुले अंतराल असते. परंतु अर्धन्युब्जाच्या ठिकाणी ६ अंगुलांचे चतुर्थांश (१ $^{1}/_{2}$ अंगुल पितृतीर्थास वाकवून) ठेऊन हाताने पुढील स्वर देण्याची प्रक्रिया करावी.

**स्पष्टीकरण**– शुक्लयजुर्वेदीय प्रातिशाख्याच्या आधारावरच 'अर्धन्युब्ज' या पदाचा अध्याहार कारिकेच्या दुसऱ्या पादाचा अर्थ घेताना करावा लागलेला आहे. 'ऋजुं निहत्य प्रणिहन्यत उदात्ते– (शु.य.प्रा. १/२२४)

**अ.** 'स्वरितस्वर' दाखविताना हात हा मध्यभागी आहे. (खांद्याजवळ)



**आ.** या स्थानावरून अनुदात्त स्थानाकडे जाताना **सहा** अंगुलांचे अंतराला आहे.

**इ.** त्याचप्रमाणे अनुदात्त स्थानावरून स्वरित स्थानापर्यंत हात आणण्यासाठी **सहा** अंगुले अंतराल आहे.

उदात्त स्थानापासून स्वरित स्थानाकडे येण्याचे अंतराल तीन अंगुले आहे.

उदात्त ——→ स्वरित = ३ अंगुले

म्हणून उदात्त ⇄ स्वरित - ६ अंगुले

आणि परत स्वस्थानी येताना ३ अंगुले अंतराल म्हणून एकूण ६ अंगुले अंतराल होते.

**पूर्णन्युब्ज**

जात्य- अनुदात्त+(जात्य)स्वरित+उदात्त

अभिनिहित- अनुदात्त+(अभिनिहित)स्वरित+उदात्त

क्षैप्र- अनुदात्त+(क्षैप्र)स्वरित+उदात्त

प्रश्लिष्ट- अनुदात्त+(प्रश्लिष्ट)स्वरित+उदात्त

अर्धन्युब्ज ——→ स्वरित. स्वरानंतर अनुदात्त

अर्धन्युब्ज दाखवताना हात पितृतीर्थ स्थानावरून दीड अंगुल वाकवून स्वरप्रदर्शन करणे आवश्यक आहे. याचेच वर्णन कारिकेच्या उत्तरार्धात केले आहे.

उदात्त स्वराचे उच्चारण करताना शरीर ताणले जाते.स्वर उच्चारणाच्या वेळी वायू ऊर्ध्वगमन करतो त्यामुळे छाती, कंठ, भ्रूमध्य यांचेही ऊर्ध्वगामी आयाम होतो. या आयामामुळे उत्पन्न झालेला स्वर **उदात्त** असतो. (सूर्यनमस्कारात आणि आसनांमध्येही अवयव वर घेताना श्वास घेतला जातो (पूरक घडतो) आणि अवयव खाली आणताना रेचक घडतो.) (शु.य.प्रा. सूत्रे १.३०,३१,३२,१०८,१०९ पाहणे.)

त्याचप्रमाणे **अनुदात्ताच्या** उच्चारणाने अवयव शिथिल पडतात आणि हे शैथिल्य वायू बाहेर पडल्याने (रेचक) घडतो.

स्वरिताच्या उच्चारणात **अभिघात** होतो. अभिघाताचा अर्थ तिरपे जाणे असा आहे. शुक्लयजु:प्रातिशाख्यात यासच 'उच्चनीचविशेष:' (१.३२) म्हणले आहे.

**स्वरितात** उदात्तांशाचे उच्चारण होताना वायूचे ऊर्ध्वगमन होते.तसेच अनुदात्त अंश दाखवताना वायूचे अधोगमन होते.

उर:स्थल ———► कण्ठ ———► भ्रूमध्य यांचे **ऊर्ध्वगमन**



आणि अधोगमन उलट क्रमाने होत असल्याने '**अभिघात**' होतो.

**उदात्त स्वराच्या** उच्चारणात वायूच्या –

उर:स्थल ———► कण्ठ ———► भ्रूमध्य यांच्यापर्यंत जाण्याने हाताचेही प्रदर्शन त्यानुसारच दाखविले जाते.

अनुदात्त स्वराच्या उच्चारणात

भ्रूमध्य ———► कण्ठ ———► याप्रमाणे वायू जात असल्याने त्याचे अनुसरण करीत हात खाली येतो.

**स्वरिताच्या** उच्चारणाचे वेळी दोन्ही स्वरांचा समाहार असल्याने भ्रूमध्य आणि कंठ या दोन्ही स्थानांवर स्थित होतो.

**प्रचय** हा स्वरिताप्रमाणेच असल्याने त्याचीही हस्तस्थिती स्वरिताप्रमाणेच राहते.

१. **अनुदात्त**– वर्णाखाली रेघ – प्र॒जाव॑ती

२. **उदात्त**– स्वरिता अगोदर, दोन अनुदात्तांमध्ये, अनुदात्तानंतर चिह्न नसलेला वर्ण – प्र॒**जा**व॑ती

३. **प्रचय**– स्वरितानंतर येणारे चिह्नरहित वर्ण – प्र॒जाव॑**ती** ग॒णाना॑न्त्वा – (मा.सं.२३.१९)

४. **स्वरित**– उदात्तस्वरानंतर येणारा अनुदात्त स्वरित होतो – प्र॒जाव॑ती

परंतु उदात्त + अनुदात्त + अनुदात्त

↓

स्वरित

**पूर्णन्युब्ज**– प्र॑स॒वे॒श्वि॒नौ॑: (मा.सं. १.१०) अनुदात्तानंतर येणारा स्वरित पण त्या स्वरिता पुढे उदात्त असणे.

**अर्धन्युब्ज** – अनुदात्तानंतर येणारा स्वरित पण पुढे उदात्त नसणे. अर्थात पुढे प्रचय किंवा अनुदात्त असणे तो अर्ध न्युब्ज होय. वे॒दो॑सि (मा.सं.२.२१)

## ५७ब. उदात्तादनुदात्ते तु वामाया भ्रुव आरभेत।।५७।।

उदात्तानंतर अनुदात्त आल्यास उदात्ताच्या उच्चारणासोबत डाव्या भुवईपासून हस्तचालनास आरंभ करावा– (डाव्या भुवईपासून म्हणजेच त्या रेषेत हाताची स्थिती ठेऊन)

**स्पष्टीकरण**– आरभे**त्** – आ+ √रभ् धातु आत्मनेपदी आहे म्हणून आरभे**त** प्रयोग योग्य ठरला असता. परंतु छंदाच्या दृष्टीने आरभे**त्** असा प्रयोग केला आहे. हा **आर्षप्रयोग** आहे. डाव्या बाजूला हात धरून उदात्त स्वर दाखवावा.

उदा. ततो॑ वि॒राड॑जायत॒ ... **स** जा॒तोऽत्य॑रिच्यत (मा.सं. ३१.५)

याठिकाणी स हा उदात्त दाखविताना हात डाव्या बाजूस स्थिर केलेला आहे.उजव्या भुवईच्या रेषेत याची स्थिती असत नाही. कारण त्यापुढे 'जा' मधील 'आ' अनुदात्त आहे.

## ५८. उदात्तस्वरितोदात्ता: क्रमाद्दक्षिणतो न्यसेत्।

(डाव्या बाजूस उदात्त दाखवल्यानंतर उजव्या बाजूस अनुदात्त दाखवावा.)




असा क्रम असताना अनुदात्त उजवीकडे दाखविला जाईल.

**स्पष्टीकरण**– वरील उदाहरणात इषे त्वा+ऊर्जे यांचा संधी त्वो=ओ असा होतो.

इषे मधील एकार उदात्त आहे. या उदात्तानंतर त्वा मधील आकार स्वरित बनतो व अनुदात्त 'ऊ' शी संधी केल्यानंतर तो नियमाने स्वरित बनतो. 'स्वरितवान् स्वरित: (प्राति. ४.१३१) परंतु यापुढे 'र्जे' हा उदात्त असल्याने 'ओ' स्वरास अनुदात्ताचेच चिह्न आले आहे.

निहितमुदात्तस्वरितपरम्(कात्या.प्रा. ४.१३१)– स्वरिताच्या पुढे उदात्त आणि स्वरित आल्यास आगोदरचा स्वरित अनुदात्त होतो. याठिकाणी 'त्वा' ला स्वरित म्हटले आहे. याचा अर्थ अनुदात्तीभूत स्वरित असा घेणे आवश्यक आहे.

उदात्तादनुदात्तस्य स्वरित: (पाणिनी.८.४.६६)

स जातो अत्यंरिच्यत (मा.सं.३१.५)

'स'मधील **अ** हा स्वर दाखवताना डाव्या बाजूकडून प्रारंभ करायला हवा. कारण 'स' हा उदात्त आहे. त्यापुढे येणारा ज्कारानंतरचा 'आ' कार हा अनुदात्त आहे आणि त्कारानंतर येणारा ओकार उदात्त आहे. त्या उदात्तामुळे त्याचा पूर्ववर्ती अनुदात्त हा अनुदात्तच राहिला आहे. 'स्वरितोदात्ता: क्रमाद्' या वचनाने 'स्वरित हा अनुदात्त झाला असताना' असा अर्थघ्यावा लागतो.

खस्मिन्नृचं साम यजूंषि। (मा.सं.३.४–५)

या मंत्रात खकारानंतरच्या 'अ' ह्या उदात्तानंतर स्मि मधील इ अनुदात्त असल्याने पूर्वीचा अ डावीकडे दाखविला जातो.

## ५८ब+५९अ. उच्चादुच्चतरं नास्ति नीचान्नीचतरं तथा।।५८।।
## अक्षरात्तुल्ययोगाच्च नीचे नीचगतानि च।

(**अनुदात्ताच्या पुढे अनुदात्त आला असताना हाताने स्वर दाखवणे.**) खरे तर उदात्तापेक्षा अधिक उन्नत (उदात्तेतर) स्वर असत नाही. त्याच प्रकारे अनुदात्तापेक्षा अधिक नीच असा (अनुदात्तेतर) स्वर असत नाही. समान गुणधर्म असणाऱ्या अक्षरापुढे (अनुदात्तापुढे) अनुदात्त आला असता (पूर्वी आलेल्या अनुदात्तावर अनुदात्त अनुगत होतो. अर्थात अन्तिम अनुदात्ताची प्रतीक्षा करीत हाताच्या द्वारा मध्यभागीच दाखविला जातो.)

**स्पष्टीकरण**- अर्थात अन्तिम अनुदात्तापूर्वी आलेले सारे अनुदात्त प्रचया प्रमाणे मध्यभागीच दाखविले जातात. शेवटचा अनुदात्त नियमा प्रमाणे खाली नेऊन दाखविला जातो.

उदा. गा॒य॒त्री (मा.सं.२३.३३) यातील 'गा' मधील आ हा दाखविला जाणारा अनुदात्त हाताने दाखविताना मध्यभागीच राहतो. 'य' नंतरचा 'अ' अनुदात्त उजव्या बाजूला हात नेऊन दाखविला जातो.

सु॒षा॒र॒थिरश्वा॑ (मा.सं. ३४.६) याठिकाणीही सु॒, षा॒, र॒ हे अनुदात्त स्वर हात समोर ठेऊनच दाखविले जातात. 'थि॒' हा अनुदात्त हात खाली नेऊन दाखविला जाईल कारण पुढे उदात्त स्वर आला आहे. उदात्त स्वर हात भ्रूप्रदेशाकडे नेऊन दाखवला जातो.

## ५९ब+६०अ. स्वरितादनुदात्ता ये प्रचयांस्तान् प्रचक्षते।।५९।।
## एकस्वरानपि च तानाहुस्तत्त्वार्थचिन्तकाः।

स्वरितानंतर जे अनुदात्त येतात त्यांना प्रचय असे म्हटले जाते. तत्त्ववेत्ते या (प्रचयस्वरांना) एकस्वर असे (एकश्रुती) म्हणतात. (एकश्रुती, प्रचित, प्रचय, प्रचः, निचितः,निचयः, तानः हे पर्यायवाची शब्द होत.)



उदा. ग॒णाना॑न्त्वा (मा.सं. २३.१९ )

या ठिकाणी ‘ना’ या स्वरितानंतर आलेला ‘न्त्वा’ हा प्रचय होय. स्वरिता प्रमाणेच प्रचय स्वर दाखवतानाही ‘प्रचयं नासिकाग्रत:’ (याज्ञ.५५) नासिकेच्या समोर दाखवावा.

## ६०ब. प्रचयो यत्र दृश्येत तत्र हन्यात् स्वरं बुध:।।६०।।

(स्वरितानंतर) ज्या ठिकाणी प्रचय दिसतो त्या ठिकाणी वैदिकाने प्रचयापूर्वी असणारा (स्वरित) स्वरास निपातित करावे अर्थात मुख आणि हस्त दोन्हीं द्वारा स्वरित स्वराचे निम्न उच्चारण आणि प्रदर्शन करावे.

उदा. ग॒णाना॑न्त्वा (मा.सं.२३.१९)

‘ना’ मधील स्वरित स्वर वेगाने खाली घेतला जातो कारण पुढे न्त्वा ह प्रचय आला आहे.

## ६१अ. स्वरित: केवलो यत्र मृदुं तत्र निपातयेत्।

ज्या ठिकाणी केवळ स्वरित असतो त्या ठिकाणी सावकश निपातन करावे. अर्थात स्वरितापुढे प्रचय असेल तर वेगाने निपातन करावे. प्रचय नसेल तर मात्र सावकाश निपातन करावे.

उदा. पुरु॑ष॒ः... (मा.सं.३१.४) रेफामधील स्वरिताचे निपातन सावकाश करावयाचे आहे. कारण पुढे प्रचय आलेला नाही.

## ६१ब. मुष्ट्याकृतिर्मकारे स्यान्नकारे तु नखग्रह:।।६१।।

(**अवसानगत व्यंजने कशी दाखविली जावीत याचे विवेचन**)

अवसानी **म्** कार आल्यास हाताची मूठ वळावी त्याच प्रमाणे अवसानी **न्** कार आल्यास अंगठा व तर्जनीच्या दोन बोटांच्या नखांचा परस्पर स्पर्श करावा.

उदा. आहम॑जानिगर्भ॒धमात्वम॑जासि गर्भ॒ध**म्** (मा.सं.२३.१९)

म् काराचे उच्चारण करताना मूठ वळवली जाते. कोणतेही व्यंजन अवसानी असेल तर अनचि च। (पाणि.८.४.४७) या सूत्रानुसार अच् (स्वरापुढे) व्यंजन असेल आणि त्यापुढे स्वर नसेल तर त्या व्यंजनाचे द्वित्व उच्चारण होते. म्हणूनच गर्भध**म्** या ठिकाणी अवसानी असणाऱ्या **म्** चे द्वित्व उच्चारण होते. या दोन्ही मकारांचा उच्चार करून दोन्ही ओठांचा विश्लेष (विलग) करून दोन मात्रा काळ विराम आवश्यक आहे. या मकाराच्या उच्चाराच्यावेळी हाताच्या मुठीची आकृती होणे आवश्यक आहे. अवसानी **न्** असल्यास तर्जनीच्या नखाचा स्पर्श अंगठ्याला करणे अपेक्षित आहे.

उदा. रत्थ्योनरश्मी**न्** (मा.सं.३४.४९)

## ६१ब+६२अ. ककारान्ते टकारान्ते ङणे तर्जनिकां नमेत्। पश्चाङ्गुल्यं पकारे च तकारे कुण्डलाकृतिः।।६२।।

१. क्, ट्, ङ्, ण् ही व्यंजने अवसानी असतील तर तर्जनी वाकवावी.

२. पकार अवसानी असल्यास पाचही बोटे एकत्र करून तो दाखवला जावा.

३. अवसानी तकार आल्यास कुण्डलाकार मुद्रा करून ते व्यंजन दाखवावे.

उदाहरणे १) दैव्योभिष**क्** (मा.सं. १६.५)

स्वाहाव्वा**ट्** (मा.सं. २.१८)

ङ्, ण् अवसानी असण्याचा प्रसंग पदपाठात दिसून येतो.

दध्यङ् (मा.सं. ११.३०)

वृषण्वसू इति वृष**ण्** (मा.सं. ११.११)

या उदाहरणांमध्ये क्, ट्, ङ्, ण अवसानी असल्याने ती व्यंजने दाखविताना **तर्जनी** वाकविली जाते.

२) गा॒य॒त्री त्रि॒ष्टुप् (मा.सं. २३.३३) याठिकाणी पकार दाखविताना पाचही बोटे एकत्र आणली जातात.

अवसानी तकार असल्यास– स॒ह॒स्रा॒क्षः स॒हस्र॑पात् (मा.सं.३१.१) याठिकाणी त् कार दाखविताना तर्जनी, अंगठा यांचा परस्पर स्पर्श करून कुंडलाकृतीने **त्** दाखविला आहे.

या उदाहरणात त्रिष्टुप् , दध्यङ्, व्वृषण्वसू ही संहितेतील प्रतीक उदाहरणे आहेत, कारण संहितेत प् चा ब् होतो अशावेळी पदान्ती प् असणार नाही. परंतु प्रतीक उदाहरण दिल्याने समस्येचे समाधान होते. संप्रदायबोधिनी शिक्षेनुसार 'पदद्वयात्मा प्रतीकः स्यात्' या पदानुसार दोन पदांचे एक प्रतीक मानल्याने 'त्रिष्टुप्' मधील प् कार पकारच राहील.

या सर्व उदाहरणांवरून लक्षात येते की म्, न्, क्, ट्, ङ्, ण्, त्, प् हे वर्ण पदाच्या अंती, पादाच्या अंती, मंत्राच्या अंती येऊ शकतात आणि ती कोणत्या मुद्रेने दाखवावीत हे सांगितले आहे. अनुनासिक पैकी ञ् हे अनुनासिक आणि क्, च्, ट्, त्, प् पैकी च् व्यंजन आणि इतर वर्गीय व्यंजने अवसानी दिसत नाहीत.

**६३. ऊर्ध्वक्षेपाच्च योष्मा स्यादधःक्षेपाच्च या भवेत्।**
**एकैकामुत्सृजेद्धीरः स्वरिते तूभयं क्षिपेत्।।६३।।**

**(व्यंजने अवसानी असताना कोणत्या मुद्रा कराव्यात हे सांगितल्यानंतर विसर्गाच्या उच्चारणाचे वेळी होणाऱ्या मुद्रा सांगितल्या आहेत.)** एकत्र आलेल्या बोटांमधून एकेक बोट बाहेर काढून उदात्त स्वरानंतर आलेला ऊष्मा (विसर्ग ः) एका अंगुलीने (तर्जनीने) दाखवावा, अधःक्षेप म्हणजे अनुदात्त. या अनुदात्तानंतर आलेला विसर्ग (ः) एका अंगुलीने (करंगळीने) दाखवावा. स्वरितानंतर आलेला विसर्ग (÷) दोन बोटे (तर्जनी आणि कनिष्ठका) बाहेर काढून दाखवावा.

**स्पष्टीकरण–**

१. भूमि॒मथो॑पु॒रः (मा.सं.३१.५) उदात्तानंतर आलेला विसर्ग तर्जनीने दाखविला जातो.

२. नम॒ᳶ कूप्या॑य च (१६.३८) याठिकाणी ᳶ हा स्वर देताना करंगळीने दाखविला जावा कारण अगोदर अनुदात्त आहे.

यज्जाग्र॑तᳶ (१६.३८) विसर्गा आधीचा स्वर (त मधेल अ) प्रचय आहे म्हणून तोही करंगळीनेच दाखविला जातो. (अधिक स्पष्टीकरण वैदिक स्वरचिह्ने पृष्ठ ९१, ९२, ९३)

३. स्वरितानंतर दाखविला जाणारा विसर्ग कनिष्ठिका आणि तर्जनी यांचे क्षेपण करून दाखविला जातो. उदा. सू॒चीभि॑ᳵ (मा.सं.२३.३६)

(अनुस्वार आला असता तो कशाप्रकारे दाखवावा हे पुढे सांगितले आहे. )

**६४. अङ्गुष्ठाकुञ्चनं लघावनुस्वारे त्वपाꣳरसम्।**
**दीर्घे रङ्गे च तर्जन्याः प्रसारः परिकीर्तितः।।६४।।**

लघु अनुस्वार असता अंगठ्याचे आकुंचन सांगितले आहे. जसे अपाꣳरसम्। याठिकाणी (अंगठ्याचे आकुंचन केले आहे.) तसेच दीर्घ अनुस्वार आणि रंग (अर्ध अनुस्वार)असताना तर्जनीचा प्रसार (तर्जनी दाखवणे) सांगितले आहे.

अंगुष्ठाकुंचन म्हणजे तर्जनीच्या मागे अंगठ्याच्या अग्राचा स्पर्श. 'तर्जन्याः पृष्ठसंश्लिष्टमङ्गुष्ठं चाग्रनामितम्।' (मल्लशिक्षा २७.२८) या वचनानुसार लघु तसेच दीर्घ दोनही प्रकारच्या अनुस्वारांच्या उच्चारणाच्यावेळी वेगात अंगुष्ठाकुंचन सांगितले आहे.

**ह्रस्व अनुस्वार–** ज्या अनुस्वाराच्या अगोदर दीर्घस्वर असतो तो ह्रस्व अनुस्वार होय. उदा. अपाꣳरसम्।

**दीर्घ अनुस्वार**- अनुस्वाराच्या अगोदर ह्रस्व स्वर असल्यास तो अनुस्वार दीर्घ अनुस्वार होय. उदा. सभूमिं६ (मा.सं.३१.१)

**गुरु अनुस्वार**- ज्या अनुस्वाराच्या पुढे संयुक्त व्यंजन असेल तो गुरु अनुस्वार होय. उदा. सँस्थानम्। (मा.सं. १३.१०)

अनुस्वाराचे गुरुत्व पुढील संयुक्त व्यंजनावर अवलंबून आहे. पूर्ववर्ती ह्रस्व दीर्घ स्वरावर अनुस्वाराचे गुरुत्व अवलंबून नाही. कात्यायनाच्या प्रतिज्ञा परिशिष्टात हा भेद स्पष्टपणे सांगितला आहे.

'तस्य त्रैविध्यमाख्यातं ह्रस्व-दीर्घ-गुरुभेदैः दीर्घात् परः, ह्रस्वः, ह्रस्वात् परः दीर्घः गुरौ परे गुरुः' (का.प्र.प. ३२)




दीर्घात्परः ह्रस्वात् परः गुरौ परः गुरुः

गुरौ परे गुरुः- याचे विवेचन पुढे (याज्ञ.शि. वर्णप्रकरण ६९-७८) मध्ये आले आहे.

**रङ्ग**- स्वरानंतर येणारा पदान्ती न् नकाराचा लोप होणे किंवा त्या स्थानी अन्य विकार होणे असे घडत असताना पूर्ववर्ती वर्ण अनुनासिक बनत असेल तर 'रङ्गाची उत्पत्ती' होते. उदा. लोकाँ२ऽअकल्पयत्। (मा.सं.३१.१३)

**६५. तर्जन्यङ्गुष्ठयोः स्पर्श उदात्तम्प्रतिपद्यते।**
**नीचन्तु मध्यमां कुर्याच्छेषं नीचतरं क्रमात्।।६५।।**

**सामवेदातील स्वरांबद्दल या कारिकेत सांगितले आहे.**

(‘नान्योऽध्वर्योर्गायेदिष्टका वा एता विहितचितो ह  स्याद्यदन्योऽध्वर्योर्गायेद्’ (श.ब्रा. ९ वे कांड) या वचनानुसार यजुर्वेदीय अध्वर्यूला सुद्धा सामगान सांगितले आहे म्हणून यजुर्वेदीय शिक्षेमध्ये देखील सामवेदीय स्वरप्रदर्शनासाठी अङ्गुलिचालन सांगितले आहे.)

**उदात्त**दाखविताना तर्जनी आणि अंगठा यांचा स्पर्श होतो, **नीच** (अनुदात्त) दाखविताना मध्यमा आणि अंगठा यांचा स्पर्श होतो. इतर  स्वर  दाखविताना (स्वरित) क्रमाने **नीचतर**  स्पर्श करावा.

**स्पष्टीकरण**- सामवेदामध्ये क्रुष्ट, प्रथम, द्वितीय, चतुर्थ, मन्द्र-अतिस्वार्य (तै.प्रा.२३.१२) हे प्रसिद्ध स्वर आहेत. यांचा उदात्तादीं मध्ये अन्तर्भाव (याज्ञ.शि.१.७) कारिकेत केला आहे.

१. उदात्त - निषाद - गांधार - तर्जनी-अंगठा स्पर्श.

२. नीच (अनुदात्त) - ऋषभ - धैवत - मध्यमा-अंगठा स्पर्श.

३. स्वरित - षड्ज, मध्यम, पंचम - (नीचतर करावे.) अंगठ्याने अनामिका-कनिष्ठका-कनिष्ठकामूल याक्रमाने स्पर्श करावा.

नारदीयशिक्षेमध्ये (१७.३-४) ‘‘अङ्गुष्ठस्योत्तमे क्रुष्टो ह्यङ्गुष्ठे प्रथमः स्वरः। प्रदेशिन्यां तु गान्धार ऋषभस्तदनन्तरम्। अनामिकायां षड्जस्तु कनिष्ठिकायां च धैवतः। तस्याधस्ताच्च योन्यास्तु निषादं तत्र विन्यसेत्।।’’ असे म्हटले आहे.

**नारदीयशिक्षेनुसार (१७.३-४)**

अंगठ्याच्या **उत्तम पेऱ्या**वर क्रुष्ट, **अंगठ्यावर, तर्जनी** (प्रदेशिनी) गान्धार, ऋषभ, **अनामिका**- षड्ज, **कनिष्ठिका**- धैवत, **कनिष्ठिकामूल**- निषाद या क्रमाने स्वर दाखविले जातात.

**नारदीयशिक्षेत सामवेदातील स्वर व बासरीमधील स्वर यांच्यातील संबंध पुढीलप्रमाणे सांगितला आहे.**

| सामग | बासरीवरील स्वर |
|---|---|
| प्रथम: | मध्यम: |
| द्वितीय: | गान्धार: |
| तृतीय: | ऋषभ: |
| चतुर्थ: | षड्ज: |
| पञ्चम: | धैवत: |
| षष्ठ: | निषाद: |
| सप्तम: | पञ्चम: |

(ना.शि.१.४.१-२)

**६६. स्वरितं यद्द्रवेत्किञ्चित् सवकारोष्मकं ततः।**
**ह्रस्वं वा यदि वा दीर्घं निक्षेप उभयोरपि।।६६।।**

(सामवेदातील स्वर संबंधात सांगून पूर्वीचा विषय चालू केला. स्वरिते तूभयं क्षिपेत् (या.शि.१.६३) यामध्ये स्वरित स्वर दाखविताना पाच बोटांतून दोन बोटे बाहेर काढण्यास सांगितले आहे.)

स्वरित स्वरासमोर विसर्ग असल्यास (उभक्षेप) करावा. (हे सामन्यपणे सांगितले) पण वकारानंतर विसर्गयुक्त ह्रस्व किंवा दीर्घ स्वरित असेल तर त्या अक्षरांच्या प्रदर्शनाला तर्जनी आणि कनिष्ठिका बाहेर काढाव्यात.

उदा. ह्रस्वस्वरानंतर– १.दे॒वो व॑÷ सवि॒ता (मा.सं.१.१)

दीर्घस्वरानंतर – २. अति॒विश्र्वा॑÷ परावत÷ (मा.सं.१२.८४)

**६७. स्वरिते यत्र निक्षिप्ते संयोगो वापि दृश्यते।**

**द्विमात्रिके क्षिपेदेकां मात्रिकं तूभयं क्षिपेत्।।६७।।**

वकाराशिवाय इतर अक्षरानंतर ह्रस्व, दीर्घ स्वरित आल्यास तो कसा दाखवावा याचा विशेषत्वाने विचार या ठिकाणी केला आहे.

दीर्घ स्वर दाखविताना (वकार रहित असा विसर्ग युक्त) स्वरित असताना पुढे जर संयोग असेल तर किंवा संयोग नसताना सुद्धा एका अंगुलीचा अर्थात कनिष्ठिकेचा निर्देश करावा. परंतु ह्रस्व अक्षर असेल तर दोनही बोटे (तर्जनी/कनिष्ठिका) दाखवावीत.

**स्पष्टीकरण**- या कारिकेमध्ये काही विशेष सांगितले आहे. पूर्वकारिकेत वकार युक्त विसर्गासहित स्वरिताचा उल्लेख केलेला होता परंतु या पद्यात त्या व्यतिरिक्त स्वरिताचे ग्रहण केलेले आहे. स्वरितामधील अन्तिम अवयव **अनुदात्त** असतो. अनुदात्ताचे प्रदर्शन हाताच्या अध:क्षेपाने केले जाते. अध:क्षेपाने **कनिष्ठिका** दाखविणे योग्य आहे.

दीर्घ स्वराचे वेळी कनिष्ठिकेचे दाखविणे लघुमाध्यन्दिनीशिक्षेतही सांगितले आहे. (ल.मा.शि.२५)

**वकाररहित विसर्गयुक्त स्वरित स्वराची चार उदाहरणे दिसतात. ती पुढीलप्रमाणे –**

१. द्विमात्रिक (अर्थात दीर्घ) स्वरिताच्या पुढे संयोग असणे.

स्तो॒त्रिया॑ः प्रत्याश्राव: (मा.सं.१.२)

२. द्विमात्रिक (अर्थात दीर्घ) स्वरिताच्या पुढे संयोग नसणे.

वसो॑ः प॒वित्रम् (मा.सं.१.२)

३. ह्रस्व स्वरापुढे संयोग असणे.

मूर्द्धाव्वय॑ः प्र॒जाप॑ति: (मा.सं. १४.९)

४. ह्रस्व स्वरापुढे संयोग नसणे.

तन्मे॒ मन॑ः शि॒वसं॑कल्पमस्तु (मा.सं.१४.९)

अशा प्रसंगी एक करंगळी बाहेर काढून स्वर दाखवावा.

**६८. जात्ये च स्वरिते चैव वकारो यत्र दृश्यते।**
**कर्त्तव्यस्तूभयोः क्षेपो व्वायव्व्या इति दर्शनम्।।६८।।**

ज्या ठिकाणी जात्यस्वरितात वकार दिसत असेल त्याठिकाणी (तर्जनी आणि कनिष्ठिका) दोहोंचा क्षेप (उभक्षेप) करायला सांगितले आहे याचे उदाहरण व्वायव्या... हे होय.

**स्पष्टीकरण**– जात्यस्वरितात य् आणि व् हे अक्षर असणे अनिवार्य आहे. या दोहोंपैकी वकाराचा योग असताना, जात्य स्वरिताचा योग असताना दोन बोटांचे निःसारण हवे. यकाराचा योग असताना असे दोन बोटांचे निःसारण होत नाही.

१. वायव्यैर्वायव्यान्याप्नोति ... (मा.सं.१९.२७) वायव्यापदापूर्वी अनुदात्त आहे.

२. वायव्याः श्वेताः सौर्याः (मा.सं.२४.१९) या ठिकाणी वा पूर्वी कोणताही स्वर नाही.

जात्यस्वरित एकाच पदामध्ये नीचपूर्व (ज्यापूर्वी अनुदात्त आहे) किंवा अपूर्व (ज्यापूर्वी कोणताही स्वर नाही.) अशी स्थिती या दोन उदाहरणात दिसते.

**६९. शृङ्गवद् बालवत्सस्य कुमारीकुचयुग्मवत्।**
**उभक्षेपः स्वरो यत्र सविसर्ग उदाहृतः।।६९।।**

(हा उभक्षेप कसा असावा?)

ज्या ठिकाणी विसर्गयुक्त स्वर आला असता दोन बोटांचे (तर्जनी आणि कनिष्ठिका) यांचे निःसारण (उभक्षेप), लहान वासराच्या शिंगाप्रमाणे किंवा कुमारीच्या दोन स्तनांप्रमाणे असावा.

**स्पष्टीकरण**– लहान वासराच्या शिंगामध्ये आणि कुमारीच्या दोन स्तनांमध्ये ज्या प्रमाणे

स्पष्टपणे अंतर असते त्याच प्रमाणे उभक्षेपांमध्ये अंतराल असावे हे या ठिकाणी

सांगितले आहे. असे अंतराल तर्जनी आणि कनिष्ठिकेच्या बहिर्नि:सारणानेच शक्य आहे.

विसर्ग कसा दाखवावा (लिपिबद्ध) करावा हे ही या उदाहरणातून सूचित होते. ज्या ठिकाणी स्वराच्या पुढे दोन बिंदू (:) दिले जातात ते विसर्गाचे बोधक आहेत. यांद्वारा दोन बिंदूतील अंतराल दिसून येते.

**७०. विसर्गान्तः स्वरो ह्रस्वः स्वरितो यत्र दृश्यते।**
**दीर्घस्तु सवकारश्च तत्रोभक्षेप उच्यते।।७०।।**

(कारिका ६३ आणि ६६ मध्ये 'ऊष्मा' हा शब्द विसर्ग या अर्थानेच वापरला आहे. तसेच उभक्षेपाचा विचार याठिकाणी केला आहे.)

विसर्ग ह्रस्व स्वरित रूपात ज्या ठिकाणी दिसतो त्या ठिकाणी उभक्षेप होतो. त्याच प्रमाणे विसर्गान्त वकाराने युक्त दीर्घस्वरित ज्या ठिकाणी दिसून येतो त्या ठिकाणी उभक्षेप होतो.

**उभक्षेप दोन ठिकाणी होतो.**

१. ह्रस्व स्वरित स्वर+विसर्गान्तः।

२. दीर्घ स्वरित स्वर, वकारयुक्त+विसर्गान्त

**७१+७२. त्रिविधं तु भवेदूष्मा प्रचिता बलका तरा।**
**स्वरिते प्रचितां विद्यान् निपाते बलकां विदु:।।७१।।**
**उत्थाने तु तथा तारामेताभिस्त्रिभिरूष्मभिः।**
**मात्रामादौ विदित्वा तु ततः क्षेपं प्रयोजयेत्।।७२।।**

प्रचिता, बलका, तरा अशा प्रकारे **विसर्ग** हा तीन प्रकारचा असतो. स्वरित स्वरानंतर आलेला विसर्ग **प्रचिता** असतो. (अव्यवहितपूर्व) तर निपातानंतर (अनुदात्तानंतर)

आलेला विसर्ग **बलका** होय. उत्थानांच्या वेळी (उदात्त) **तरा** असे म्हणतात. या तीन ऊष्म्यांनी त्याची मात्रा (ह्रस्व दीर्घ) पाहून उभक्षेप करावा.

**स्पष्टीकरण**– त्रिभिः असे पुंलिंगी रूप कारिकेत वापरले आहे. हे रूप 'त्रिभिरिति पुंस्त्वमार्षम्।' आर्ष होय.

१. अ. ह्रस्वस्वरित

आ. वकार युक्त दीर्घ स्वरित + : ऊष्मा = प्रचिता याठिकाणी– **उभक्षेप**

२. अनुदात्त वकार रहित दीर्घस्वरित + : ऊष्मा = बलका याठिकाणी– कनिष्ठिकाक्षेप

३. उदात्त+ ऊष्मा= तारा किंवा तरा= कनिष्ठिका

(छंदोभंग होऊ नये म्हणून 'तरा' ला 'तारा' म्हटले आहे.) अगोदर मात्रा ओळखून नंतर अंगुलिक्षेप करावा. विसर्गापूर्वी कोणताही स्वरित स्वर असताना उभक्षेप करावा.

**७३. अक्षरं भजते काचित् काचिद् द्वित्वे प्रतिष्ठिता।**
**समानजातिका काचित् काचिदूष्मप्रदायिनी।।७३।।**

(हस्तचालनाचा विचार थांबवून **ऊष्मा** संबंधात याचे स्वरूप आणि भेद थोडक्यात सांगतात.)

१. एखादा विसर्ग **अक्षरत्व** प्राप्त करतो.

२. एखादा विसर्ग **द्वित्व** प्राप्त करतो.

३. एखादा विसर्ग **समान जातीचा** होतो.

४. एखादा ऊष्मा ऊष्माच देणारा होतो.

**स्पष्टीकरण-**

१. **एखादा विसर्ग अक्षरत्व प्राप्त करतो.** - विसर्गाचा 'ओ', 'श्', 'ष्', 'स्' बनतात. उदा. **अ.**- कुक्कुटोसि- (मा.सं.१.१६)

कुक्कुट: + असि=



उ = ओ= कुक्कुटोऽसि।

(अतो रोरप्लुतादप्लुते। (पा.६.१.११३) या सूत्रात विसर्गाचा 'उ' आणि आद्‌गुण: ने (पा.६.१.८७) गुण बनला. गुण होऊन 'ओ' बनतो. - पाणिनीय सूत्रानुसार)

**देवो व॑: - (मा.सं.१.१)**

(देव: व: असे असताना हशि च। (पाणि.६.१.११४) या सूत्राने गुण होऊन 'ओ' भाव झाला.)

**आ.**प्रजापतिश्च्छन्द: (मा.सं.१४.९) याठिकाणी विसर्गाचा **श्** झालेला आहे.

**इ.** अग्नेष्ट्वा (मा.सं.१२.१३) अग्ने: त्वा याठिकाणी विसर्गाचा **ष्** झाला आहे.

**ई.**अग्नेस्तनूरसि ... (मा.सं.१.१५) याठिकाणी विसर्गाचा **स्** झाला आहे.

**उ.**प्रातरग्निम् (मा.सं.१.१५) प्रात: अग्निम् - विसर्गाचा **र्** झाला.

२. **एखादा विसर्ग द्वित्व प्राप्त करतो.**- या ठिकाणी द्वित्त्व हा शब्द द्विगुणकालतः या साठी आहे. जिह्वामूलीय आणि उपध्मानीय विसर्गापुढे असताना विसर्ग उच्चारणासाठी दुप्पट काळ लागतो म्हणून विसर्गाचे द्वित्त्व होते अर्थात दुप्पट काळ लागतो असे म्हटले आहे. विसर्गा नंतर क्, ख्, असताना विसर्गाला जिह्वामूलीय आदेश होतो. तसेच प्, फ् असताना विसर्गाला उपध्मानीय आदेश होतो. हे दोन्हीही वर्ण माध्यन्दिन संहितेत नाहीत. ('विसर्गाऽपेक्षया अनयोरुच्चारणकालस्य द्वैगुण्यात् द्वित्वोपपत्ति:।') तरी यांचा उल्लेख केला आहे. टीकेत म्हटले आहे की फुले आणताना फळेही घेऊन यावे त्या

प्रमाणे संदर्भानुसार याचीही गणना या ठिकाणी केली आहे. 'पुष्पाहारस्य फलाहरणमिव अविरुद्धम्।'

३. **काहीठिकाणी ऊष्मा समान जातीय बनतो.** - अ. विवृत्ति उच्चारणामध्ये लागणारा काळ विसर्गोच्चारणास लागणाऱ्या काळाप्रमाणेच असतो. जरी विसर्गाच्या उच्चारणाचा काळ **अर्धमात्रा** प्रसिद्ध आहे आणि विवृत्तीचा काळ एक मात्रा सांगितला असला तरी शाखाभेदानुसार **विवृत्तीचा** काळ देखील अर्धमात्रा मानलेला आहे. म्हणून काळाच्या दृष्टीने ही **सजातीयता** होऊ शकते.

आ. **दुसऱ्या पक्षानुसार** - दोन्हीचा काळ समान नसला तरी दोन वर्णांच्या मध्ये विसर्ग असताना काही **अंतराल** (विलंब) होतो. त्याच प्रमाणे दोन स्वरांमध्ये संधीचा अभाव असताना (प्रकृतिभाव असताना) विवृत्ति होते. १.विसर्ग उच्चार २.विवृत्ती या दोनही ठिकाणी दोन वर्णांच्या उच्चारणाला माध्यमिकान्तराल - मध्यवर्ती काही विलंब उपस्थित होतो. म्हणूनच मध्यवर्ती अंतरालाच्या दृष्टीने सजातीयता स्पष्ट आहे.

**विवृत्ती चार प्रकारची आहे.** याज्ञवल्क्यशिक्षेच्या विवरणावरून प्रतीत होते की विवृत्तीचा काळ मात्रिक आहे. कारण याच्या उदाहरणासाठी केसांमध्ये फिरणाऱ्या कात्रीच्या ध्वनीने तो सांगितला आहे.

'द्वयोऽस्तु स्वरयोर्मध्ये सन्धिर्यत्र न दृश्यते।
विवृत्तिस्तत्र विज्ञेया यऽईशे तु निदर्शनम्।' (या.शि.२.९)

नारदीय शिक्षेमध्ये विवृत्तीचा काळ मात्रिक, अर्धमात्रिक, अणुमात्रिक असा सांगितला आहे. हे तीनही भेद शाखाभेदाने स्वीकारणे योग्य आहे.

चतसृणां विवृत्तीनामनन्तरं मात्रिकं भवेत्।
अर्धमात्रिकमन्येषामन्येषामणुमात्रिकम्।। (नारदीयशिक्षा.२.४.३)

यस् (:) ईशे
↓
र् – ससजुषो रुः। (पाणि.८.२.६६)
↓
य् – भो भगो अघो अपूर्वस्य योऽशि। (पाणि.८.३.१७)
↓
य् – लोपः शाकल्यस्य। (पाणि.८.३.१९)
↓
य् – पूर्वत्रासिद्धम्। (पाणि.८.२.१) य् लोपाची असिद्धी.

य + ईशे याठिकाणी परत संधी होणार नाही. हे विवृत्तीचे उदाहरण आहे.

**७४. यथा बालस्य सर्पस्य निःश्वासो लघुचेतसः।**
**एवमूष्मा प्रयोक्तव्या हकारपरिवर्जिता।।७४।।**

(**विसर्गाचा उच्चार कसा करावा.**) कमी सामर्थ्य असणाऱ्या बालसर्पाच्या निःश्वासाप्रमाणे (बाहेर पडणाऱ्या श्वासाप्रमाणे) हकार वर्जित ऊष्म्याचा प्रयोग करावा. (तो उच्चार हकार सदृश आहे तो हकार आहे असे मानू नये.)

**स्पष्टीकरण–**

दे॒वो वः॑ सविता (मा.सं.१.१) हकार सदृश उच्चार.

दे॒वीः। ति॒स्रो (मा.सं.२१.५०) हिकार सदृश उच्चार.

आ॒खुस्ते प॒शुः (मा.सं.३.५०) हुकार सदृश उच्चार.

अग्नेः (मा.सं.७.४२) हेकार सदृश उच्चार.

बाह्वोः (मा.सं.१४.३) होकार सदृश उच्चार.



स्वैः (मा.सं.१४.३) हिकार सदृश उच्चार.

द्यौ३। पिता (मा.सं.२.११) हुकार सदृश उच्चार.

हकारो नैव मन्तव्यः इति शास्त्रव्यवस्थितिः।
फणिनिःश्वाससदृशो विसर्गो भवति ध्रुवम्।। (ल.मा.शि.१८-२२)

पाणिनीयशिक्षेत 'अयोगवाहा विज्ञेया आश्रयस्थानभागिनः।' (पा.शि.२२) असे म्हटले आहे. विसर्ग हा अयोगवाह होय. याचा आशय असा की ज्या स्वराच्या पुढे विसर्ग येईल तत्श्रुतिगर्भितहकाराने तो सूचित होतो. 'तच्छ्रुतिगर्भितहकारत्वेनेव श्रूयते इति नियमः।' परंतु ऐकारानंतर किंवा औकारानंतर येणाऱ्या विसर्गाचा उच्चार हैकाराप्रमाणे किंवा हौकाराप्रमाणे होत नाही. कारणे ऐ आणि औ मध्ये अनुक्रम अन्ती इ, उ श्रुती असल्याने विसर्गाचा उच्चार हि किंवा हु असाच होतो. हा उच्चार हकार आहे असे मानू नये असे म्हटले आहे. **'विसर्गाऽव्यवहितस्वरोच्चारणप्रयत्ने एव किञ्चिदाधिक्येन ऊष्मा प्रयोक्तव्या न तु तत्र प्रयत्नान्तरमपेक्षितमिति सूचितम्।'**

विसर्गाच्या अत्यंत जवळ असणाऱ्या स्वराच्या उच्चारणाचा प्रयत्न करताच काहीशा आधिक्याने विसर्गाचा प्रयोग करावा त्या ठिकाणी अन्य कोणतेही प्रयत्न अपेक्षित नाहीत असे सूचित केले आहे. म्हणूनच हिकारादी आद्य अक्षराच्या उच्चारण काळापेक्षा ऊष्म्याच्या उच्चारणात अर्धकाळ परिवर्तित होतो. लघुचेतसः, बालस्य इति विशेषणद्वयेन महासत्त्वस्य तरुणसर्पस्य तारगभीरं ह ह ... हकारसदृश श्रुतेर्निषेधः सूचितः।

**७५. विवृत्तिप्रत्ययामूष्मां प्रवदन्ति मनीषिणः।**
**तामेव प्रतिषेधन्ति आ-ई-ऊ-ए-निदर्शनम्।।७५।।**

### समानजातिक ऊष्मा (विसर्ग)

ऊष्मा हा विवृत्तीने जाणण्या सारखा आहे असे विद्वान लोक मानतात. (परंतु) तो ऊष्मा तसा नाही असाही प्रतिषेध करतात याला आ, ई, ऊ, ए या संबंधांनी उदाहरणे देता येतील.

**स्पष्टीकरण**– ऊष्मा आणि विवृत्ती यांच्यात साम्य आहे. दोन वर्णांमधील अंतराल हे दोहों मधील साम्य आहे. परंतु हकार सदृश उच्चारण विवृत्तीमध्ये होत नाही हा या दोहों मध्ये भेदही आहे. या साठी कारिकेत उदाहरण दीर्घ स्वरांचे दिले आहे, हे वर्ण उदाहरण स्वरूपातील आहेत, हे केवल स्वरांचे उपलक्षण आहेत.

षऽआ॑त्क्मदा (मा.सं.२५.१३)

षऽईशे॑ (मा.सं.२३.३)

कयात्वन्नऽऊ॒त्या (मा.सं.३६.७)

पुरुष एव (मा.सं.३१.२)

या ठिकाणी सन्ध्यभाव आहे आणि पूर्वी ह्रस्वस्वर आलेले आहेत. इतर उदाहरणे–

इमाऽउत्वा (मा.सं.३३.८१)

षऽओजसा (मा.सं.७.४०)

ताऽअस्य (मा.सं.१२.५५)

गो॒जाऽऋ॑त॒जा (मा.सं.१०.२४)

## ४. स्वरसंहिता विधि (कारिका ७६–९२)

**७६+७७. अष्टौ स्वरान् प्रवक्ष्यामि तेषामेव तु लक्षणम्।**
**जात्योऽभिनिहितः क्षैप्रः प्रश्लिष्टश्च तथाऽपरः।।७६।।**

**तैरोव्यञ्जनसंज्ञश्च तथा तैरोविरामकः।**
**पादवृत्तो भवेत्तद्वत् ताथाभाव्य इति स्वराः।।७७।।**

**स्वरिताचे आठ भेद** – (मी याज्ञवल्क्य) आता आठ (**स्वरित**) स्वर आणि त्यांची लक्षणे सांगतो. जात्य, अभिनिहित, क्षैप्र, प्रश्लिष्ट, तैरोव्यंजन, तैरोविराम, पादवृत्त, ताथाभाव्य हे स्वरिताचे आठ प्रकार आहेत.

**७८. एकपदे नीचपूर्वः सयवो जात्य इष्यते।**
**अपूर्वोऽपि परस्तद्वत् धा॒न्यं॑–सु॒प्प्वा॒–स्वं॑रित्यपि।।७८।।**

**(स्वरितभेदांची लक्षणे आणि उदाहरणे क्रमाने सांगितली आहेत.)**

**१.जात्य**– एकाच पदामध्ये अनुदात्त पूर्वी असताना 'य्' आणि 'व्' या व्यंजनाने युक्त असा स्वरित पुढे येतो तो **जात्या**साठी इष्ट होय. (तो जात्यस्वरित होय.) त्याचप्रमाणे एकाच पदामध्ये य् कार किंवा व् काराने युक्त स्वरितापूर्वी कोणताच स्वर नसेल (स्वराभाव) तो देखील जात्यस्वरित होय.

उदाहरण –

**अ**. धा॒न्य॑मसि (मा.सं.१.२०)

याठिकाणी 'धा॒' या अनुदात्तानंतर 'न्य॑' हा य् कारयुक्त स्वरित असल्याने तो न्य॑ या स्वराने दाखविला आहे.

**आ**.सु॒प्प्वा॒ का॑मं धुक्ष्व (मा.सं.१.२)

याठिकाणी 'व'कारयुक्त स्वरितापूर्वी **सु** मधील **उ** अनुदात्त असल्याने हा स्वरित देखील जात्यस्वरित होय.

**इ**.अपूर्व अर्थात ज्यापूर्वी कोणताही स्वर आलेला नाही असा स्वरित जात्यस्वरित होय.

उदा. स्वं॑र्दे॒वेषु (मा.सं.१८.६४) याठिकाणी स्वं॑ हा जात्यस्वरित असल्याचे म्हटले आहे.

शिक्षाकार आणि टीकाकार या दोहोंनीही यकार युक्त अपूर्व जात्यस्वरिताचे कोणतेही उदाहरण दिलेले नाही. शुक्लयजुर्वेद प्रातिशाख्याच्या ज्योत्स्नानुवृत्तीत देखील

उदाहरण दिलेले नाही. याचे कोणतेच उदाहरण माध्यंदिन शाखेत उपलब्ध नसावे. ऋक्प्रातिशाख्याच्या उवटभाष्यात याचे उदाहरण न्यंक् हे दिले आहे. याचासंदर्भ पहावा लागणार आहे. असेही टीकेत म्हटले आहे. ('यण्' संधीने निर्माण होणारा स्वरित जात्यस्वरित असावा.)

**७९. ए–ओ आभ्यामुदात्ताभ्यामकारो निहितश्च यः।**
**स च यत्र प्रलुप्येत तं चाभिनिहितं विदुः।।७९।।**

**२. अभिनिहित**– उदात्त 'ए' आणि 'ओ' यांच्यापुढे अनुदात्त अकार (ह्रस्व 'अ') आला असता (पूर्वरूपसंधी) होऊन तो प्लुत होत असेल तर त्या एकार आणि ओकार यांना **अभिनिहित** म्हणतात.

**स्पष्टीकरण**– एङः पदान्तादति। (पा.६.१.१०९) सूत्राने झालेला पूर्वरूपसंधी या ठिकाणी सूचित केला आहे. शुक्लयजुर्वेदाच्या प्रातिशाख्यात 'अकारे च।' (४.४३) यासूत्राने उपधा अकारासोबत विसर्ग आल्यास त्याला 'ओ'त्व येते. एदोद्भ्यां पूर्वमकारः। (शु.य.प्रा.४.६१) या सूत्राने पूर्वरूपत्व सांगितले आहे. ते अ॒प्स॒रसाम् (मा.सं.२४.३७) या ठिकाणी एकारामध्ये 'अ' चे पूर्वरूप सांगितले आहे. 'तेऽप्सरसाम् ...।' असा संधी होईल. या ठिकाणी तकारानंतर येणारा 'एकार' हा अभिनिहित नावाचा स्वरित आहे. वे॒दः॒ असि –व्वे॒दोऽसि (मा.सं.२.२१) 'दो' हा स्वरित अभिनिहित होय. पूर्वरूप एकादेशासच प्रातिशाख्यात अभिनिहित संधी म्हटले आहे. ऋग्वेद प्रातिशाख्यामध्ये (२.३४)

१. संधीने **न** निर्माण झालेला एकार किंवा ओकार+पादादि **अ**कार

२. संधीने निर्माण झालेला ओकार (विसर्गस्थानी प्राप्त झालेला ओकार) या दोन्हीचा एकीभाव म्हणजे **अभिनिहित** होय.

अथाभिनिहितः सन्धिरेतैः प्राकृतवैकृतैः।

एकीभवति पादादिरकारस्तेऽत्र सन्धिजाः।। (ऋ.प्रा.२.३४)

अभिनिहित संधीने निष्पन्न झालेला स्वरित स्वर अभिनिहित होय. शुक्लयजुर्वेद प्रातिशाख्यात अभिनिहित हे नाव न घेता पूर्वरूप होण्याचा निर्देश केला आहे. पादादि 'अ'काराची अटही लावलेली नाही. शुक्लयजुर्वेदप्रातिशाख्यामध्ये अभिनिहित संधीचा एक अपवादही सांगितला आहे. न देशेऽभवत् (शु.य.प्रा.४.६३) देशेऽभंवत् (मा.सं.३४.११) याठिकाणी 'ए' या उदात्तानंतर अनुदात्त 'अकार' लुप्त झाला असतानाही एकार अभिनिहित स्वरित झालेला नाही.

**८०. इ–उवर्णौ यदोदात्तावापद्येते यवौ क्वचित्।**
**अनुदात्ते परे नित्यं विद्यात् क्षैप्रस्य लक्षणम्।।८०।।**

**३. क्षैप्र– स्वरित**– उदात्त इकार आणि उकार यांचे पुढे ज्या वेळी अनुदात्त (असवर्ण) असेल आणि त्यांचा अनुक्रमे य्कार व व्कार होत असेल तर ते नित्य (नियमपूर्वक) क्षैप्राचे लक्षण जाणावे.

**स्पष्टीकरण**– उदाहरण–

**अ.** त्रि + अम्बकम्

इ + अ = य्

= त्र्यंम्बकम् (मा.सं.३.६०)

**आ.** द्रु + अ॒न्नं

उ + अ॒

↓

व् = द्रून्नं (मा.सं.११.७०)

इ, उ हे उदात्त वर्ण दीर्घ असले तरी त्यांचा अनुक्रमे 'य्' व 'व्' होतात. पाणिनीयसूत्रात म्हटले आहे. उदात्तस्वरितयोर्यण: स्वरितोऽनुदात्तस्य। (पा.८.२.४) उदात्त +अनुदात्त यांचा संधी स्वरित होतो.

## ८१. इकारो यत्र दृश्येत इकारेणैव संयुतः।
## उदात्तश्चानुदात्तेन प्रश्लिष्टो भवति स्वरः।।८१।।

४. **प्रश्लिष्टस्वरित**– ज्याठिकाणी उदात्त ह्रस्व इकार आणि अनुदात्त ह्रस्व इकार हे संयुक्त दिसत असतील तर तो स्वर प्रश्लिष्ट स्वरित होय.

उदाहरण–

अभि + इन्धताम्
↓ ↓
इ इ
| |
उदात्त + अनुदात्त = अभीन्धताम्

याठिकाणी सवर्णदीर्घीभूत ईकार प्रश्लिष्टस्वरूपाचे उदाहरण होय. दोन्ही इकार ह्रस्व असतील आणि त्यांचा संधी होत असेल तरच तो प्रश्लिष्टस्वरित होय. शुक्लयजुर्वेदप्रातिशाख्यात (१.११६) हे अधिक स्पष्ट केले आहे. इवर्ण उभयतो ह्रस्वः प्रश्लिष्टः। याचा एक अपवादही प्रातिशाख्यात दाखविला आहे. वीक्षितायेति च (शु.य.प्रा.४.१३५)

उदाहरण–

वि + ईक्षिताय
↓ ↓
इ ई
| |
उदात्त + अनुदात्त = वीक्षिताय

हाही प्रश्लिष्ट संधी होय.

वीक्षिताय स्वाहा। (मा.सं.२२.७)

काशिकेमध्ये 'स्वरितो वानुदात्ते पदादौ' (पा.८.२.६) यासूत्रावरील वृत्तीमध्ये **वीक्षते** हे उदाहरण दिले आहे. परंतु हा अपवाद आहे असे कुठेही सूचित केलेले नाही.

## ८२. उदात्तपूर्वः स्वरितो व्यञ्जनेन युतो यदि।
## एष सर्वो बहुस्वारस्तैरोव्यञ्जन उच्यते।।८२।।

**५. तैरोव्यंजनस्वरित**– उदात्त ज्याच्या पूर्वी आहे अर्थात् उदात्ताच्या पुढे असणारा व व्यंजनाने युक्त तसेच अनेक (स्वरित) स्वरांनी युक्त असणारा स्वरित (हा संपूर्ण पदसमूहांनी युक्त) तैरोव्यंजन होय.

**स्पष्टीकरण**– तैरोव्यंजनाचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे. असा पदसमूह की ज्याच्या उदात्तानंतर आलेला स्वरित अनुदात्ताच्या रूपात व्यंजित होतो. ज्या ठिकाणी निघातामुळे अनुदात्तीकरणाने स्वरित लपतो (तिरोभूत होतो) त्या ठिकाणी तैरोव्यंजनता होते.उदा.– इडे॒ रन्ते॒ हव्ये॒ काम्म्ये॒ चन्द्रे॒ ... (मा.सं.८.४३)

इत्यादी पदांमध्ये एकार हा स्वरित आहे.

**अ**. तो उदात्त पर आहे.

**आ**. संहितापाठात अनुदात्तीकरण झाले आहे त्यामुळे तो लपला आहे.

**इ**.आणि तो अनुदात्ताने व्यंजित होत आहे.

उदात्त+ अनुदात्त +अनुदात्त
↓
स्वरित होतो

अशी स्थिती असतानाच अनुदात्ताचा स्वरित होतो अन्यथा अनुदात्तानेच तो व्यंजित होतो. उदात्तानुदात्तस्य स्वरितः। निहितमुदात्तस्वरितपरम्। (वा.प्रा.४.१३६) ज्या शाखांमध्ये प्रचय आणि उदात्त अनङ्कित आहेत त्या शाखांमध्ये उदात्ताचे उदात्तत्व दाखविण्यासाठी उदात्ताच्या पुढे लपलेला असणारा स्वरित किंवा प्रचयास

अनुदात्ताप्रमाणे अंकित केले जाते. इडैं। रन्तैं हे स्वरित असतानाही संहितापाठात अनुदात्ताच्यारूपात अंकित करतात.

**८३. अवग्रहात् परो यस्तु स्वरित: स्यादनन्तर:।**
**तैरोविरामं तं विद्यादुदात्तो यद्यवग्रह:।।८३।।**

**६. तैरोविराम–** उदात्त स्वरानंतर येणाऱ्या अवग्रहानंतर लगेच येणारा स्वरित तैरोविराम (स्वरित) होय.

**स्पष्टीकरण–** पदपाठामध्ये विभिन्न प्रकृति प्रत्ययांचा पारस्परिक विभाग, समासातील घटक पदांचा विभाग, अशा ठिकाणी उच्चारणात कालव्यवधान दाखविण्यासाठी जो विराम घेतला जातो त्यास अवग्रह[१] असे म्हणतात. तो अवग्रह अर्थात विरामयुक्त वर्ण जर उदात्त असेल तर त्याला लागून लगेच येणारा स्वरित तैरोविराम होय. उदा. गोपंताविति गो । पंतौ (मा.सं.१.१)

अशाप्रकारे पदपाठामध्ये इति नंतर येणाऱ्या 'गो' शब्दातील 'ओ'कार हा उदात्त होय आणि विराम असल्याने अवग्रहही होय. म्हणून त्यानंतर येणारा अव्यवहित उत्तरवर्ती 'प'कारातील अ हा स्वरित आहे. हा तैरोविराम होय. याचप्रमाणे बाहुऽभ्यांम् (मा.सं.१-१०) हु या अवग्रह असणाऱ्या उदात्तानंतर येणारा भ्यां हा स्वरित तैरोविरामस्वरित होय. **तिर: तिर्यग् विरम्यते उदात्त: अनेन इति तिरोविराम:**, स एव तैरोविराम:।

**प्रातिशाख्य–** समासेऽवग्रहो ह्रस्वसमकाल:। (शु.प्रा.५.१) गोपताविति... समासेऽवग्रहो ह्रस्वसमकाल:। (शु.प्रा.५.१) यानुसार समस्तपदाला अवग्रह संज्ञा आली असता क्रमोस्तावृत्ति: पदेषु (शु.प्रा.४.२१) (४.१८८, ४.१८, ४.२० अधिक माहितीसाठी ही सूत्रे पहावीत.)



[१] अवग्रहात् पञ्चविध कृत्तद्धितादिवृत्ति प्रदर्शनाय कृतात् विच्छेदात्।

## ८४.	स्वरे च स्वरिते चैव विवृत्तिर्यत्र दृश्यते।
## पादवृत्तो भवेत् स्वारः 'श्वि॒त्रऽआ॑दि॒त्य' दर्शनम्।।८४।।

७. **पादवृत्तस्वरित** – ज्यावेळी स्वरित स्वर अकारादी वर्णांच्या पुढे असतो तसेच त्यापूर्वी विवृत्ति दिसून येते. त्या ठिकाणी पादवृत्त नावाचा स्वरित असतो. उदा. श्वि॒त्रऽआ॑दि॒त्यानाम् (मा.सं.२४.३९) स्वरांमध्ये संधीचा अभाव असेल तर जो विराम असतो त्यास **विवृत्ति** म्हणतात. वरील मंत्रात

श्वि॒ + आदित्यानाम्
↓ ↓
अत्र + आ = याठिकाणी विवृत्ती होते
म्हणून आ॑ पादवृत्त स्वरित होतो.

उन्नतऽऋ॑ष॒भो (मा.सं.२४.७)या पदातील ऋ॑ हा पादवृत्तस्वरित आहे कारण यापूर्वी विवृत्ती आहे.

श्वित्रःआदित्यानाम्
↓
रु
↓
य् – भो भगो अघो अपूर्वस्य योऽशि। (पाणि.८.३.१७)
↓
य् – लोपः शाकल्यस्य। (पाणि.८.३.१९)
श्वित्र आदित्यानाम् – सन्ध्यभाव 'पूर्वत्रासिद्धम्' सूत्रानुसार.

पदस्यायं विरामो विवृत्तिलक्षणः, पादः तेन सह वृत्यते विभज्यते। संहिता इति पादवृत्तः।

स्वरे चेत् स्वरितं यत्र विवृत्ता यत्र संहिता। एतत्पादान्तवृत्तस्य लक्षणं शास्त्रचोदितम्।। (नार.शि.२.१.७)

**८५. उदात्ताक्षरयोर्मध्ये भवेन्नीचस्त्ववग्रहः।**
**ताथाभाव्यो भवेत् स्वारस् ‘तनू–नप्त्रे’ निदर्शनम्।।८५।।**

८. **ताथाभाव्यस्वरित** – दोन उदात्त अक्षरांमध्ये अनुदात्त अवग्रह असेल तर तो ताथाभाव्यस्वरित होय. यासाठी तनूनप्त्रे हा मंत्र उदाहरण होय.

तनूनप्त्रे (मा.सं.५.५) तनू नप्त्रऽइति तनू। नप्त्रे

**स्पष्टीकरण**– तकारामधील ‘अ’कार उदात्त आहे. तसेच न मधील ‘अ’ हाही उदात्त आहे या मध्ये आलेला नू मधील ‘ऊ’ हा अनुदात्त अवग्रह असल्याने पदपाठातील तो ताथाभाव्यस्वरित होय. हा स्वरित पदपाठात दिसून येते.

उदात्त + अनुदात्त + उदात्त
↓
अवग्रह
म्हणून ताथाभाव्यस्वरित

**१.** उदात्तानंतर येणारा अनुदात्त स्वरित बनतो. उदात्ताच्चानुदात्तं स्वरितम्। (शु.प्रा.४.१३५)

**२.**परंतु त्या अनुदात्ताच्या पुढे उदात्त असेल तर स्वरित होत नाही.

उदात्त + अनुदात्त + उदात्त
↓
स्वरित होणार नाही. (निषेध) – परंतु

निहितमुदात्तस्वरितपरम् । (शु.प्रा.४.१३६)

**३.**(निषेधाचा निषेध)– अनवग्रहे। (शु.प्रा.४.१३७)

उदात्त + अनुदात्त + उदात्त



स्वरित होईल (अवग्रह असताना)



**ताथाभाव्यस्वरित**

उदा. तनू नप्त्रऽइति तनू। नप्त्रे इत्यत्र 'द्विरावृत्तस्य तनू शब्दस्थस्य अवगृहीतस्य नू कारस्य उदात्तात्परत्वेन प्राप्तं स्वरितमपोद्य उदात्ते परे निहितमेव'

तनू नप्त्रे हे जे उदाहरण दिले आहे यावर आक्षेप ! माध्यन्दिनशाखे मध्ये उदात्त आणि अनुदात्त हे स्वतंत्रपणे उपलब्ध होतात, स्वरित हा स्वर या दोहोंचा एकीभाव होय. अशा वेळी अवयवांचे (हाताचे) तिरपे जाणे होते (त्याद्वारा स्वर दाखविला जातो) असे तर या ठिकाणी काहीच दिसत नाही. म्हणून हा स्वर माध्यन्दिन विरोधी असल्याने **माध्यन्दिनमतानुसार ताथाभाव्य हा स्वर असत नाही**.

**८६. माध्यन्दिनविरोधी स्यात् ताथाभाव्यस्तु यः स्वरः।**
**स्वरौ चैवात्र दृश्येते भिन्नोदात्तानुदात्तकौ।।८६।।**

जो ताथाभाव्यस्वर (स्वरित आहे) तो माध्यन्दिन विरोधी ठरतो कारण या ठिकाणी उदात्त आणि अनुदात्त स्वर भिन्न दिसून येतात. ताथाभाव्य स्वर जर स्वरिताचा एकभेद मानला तर माध्यन्दिनशाखेच्या उदाहरणांशी त्याचा विरोध दिसतो, कारण माध्यन्दिनसंहितेत उदात्त आणि अनुदात्त स्वतंत्र उपलब्ध होतात.

**स्पष्टीकरण**– खरेतर दोन्ही स्वरांचा एकीभाव म्हणजे स्वरित होय. स्वरिताचे उच्चारण करताना हात तिरपा नेला जातो. परंतु तनू नप्त्रे।या उदाहरणात उदात्त, अनुदात्त स्वतंत्र दिसत आहेत. म्हणून त्यांचा एकीभाव नसल्याने 'नू' स्वरित स्वर होणार नाही. अशा ठिकाणी माध्यन्दिन शाखेत कम्प होतो याचा उल्लेख वर्णरत्नप्रदीपशिक्षेत आला आहे. वर्णरत्नप्रदीपशिक्षेत म्हटले आहे '**माध्यन्दिनविरोधी स्यात् ताथाभाव्यस्तु यः**

**स्वर:। भिन्नौ यतोऽत्र दृश्येते तावुदात्ताऽनुदात्तकौ।।**' याचा निष्कर्ष असा की तनू नप्त्रे या मंत्राच्या पदपाठात तनू नप्त्रइति तनू। नप्त्रे (पदपाठ) असे दिले आहे. या स्थितीत द्विरावृत्त 'तनू' शब्दाच्या अनुदात्त ऊकाराबाबत माध्यन्दिनशाखेत 'कम्प' स्वराचे उच्चारण होईल. अशा प्रकारे ज्या शाखेमध्ये ताथाभाव्यस्वरित सांगितला आहे. त्या ठिकाणी स्वरित उच्चारण होईल. अशाप्रकारे ताथाभाव्यस्वरित माध्यन्दिनशाखेच्या विरोधी आहे हे स्पष्ट होते. माध्यन्दिनाचेच अनुयायी असणाऱ्या औज्जिहायनक यांनी म्हटले आहे.

अवग्रहो यदा नीच: प्रोच्चयोर्मध्यत: क्वचित्।
ताथाभाव्यो भवेत्कम्पस् 'तनूनप्त्रे' निदर्शनम्।। (वर्णरत्नप्रदीपशिक्षा.६९-७१)

**८७. उदात्तान्निहित: स्वार: स्वरितात् प्रचयो भवेत्।**
**उदात्तात्स्वरितात्पूर्वो नान्यमापद्यते स्वरम्।।८७।।**

(एखाद्या प्रसंगी एखाद्या व्यंजनाचे व्यवधान असताना सुद्धा संहितेमध्ये स्वरितविधि आणि त्याचा अपवाद या कारिकेत सांगितला आहे.) उदात्तानंतर आलेला निहित (अनुदात्त) स्वार (स्वरित) होतो.

स्वरितानंतर येणारा अनुदात्त प्रचय होतो.

परंतु उदात्त आणि स्वरित या स्वरांपूर्वी अनुदात्तत्व विशिष्ट (अनुदात्त गुणाने युक्त असा स्वर आल्यास तो अनुदात्तच राहतो.)

**स्पष्टीकरण**- उदात्त, अनुदात्त, स्वरित हे स्वरांचे गुणधर्म आहेत. हे स्वर बऱ्याच वेळा व्यंजनांना जोडून असतात. तर काही वेळा व्यंजन विरहित देखील असतात. म्हणून व्यंजनाचे व्यवधान परत्व (पुढील वर्णाला) बाधक असत नाही. 'स्वरविधौ व्यञ्जनम् अविद्यमानवत्'- परिभाषा. स्वरविचारामध्ये व्यंजन हे अविद्यमान असल्याप्रमाणे आहे.

म्हणूनच **उदात्तानंतर** व्यंजनाचे व्यवधान असणारा स्वर **स्वरित** होतो, परंतु **उदात्त आणि स्वरिताच्या आगोदर असणारा अनुदात्त अनुदात्तच राहतो.**

निहितमुदात्तस्वरितपरम् (शु.य.प्रा.४.१३६) उदात्त आणि स्वरित पुढे असताना आगोदरचा स्वर निहित अनुदात्त होतो.

**अ.** उदात्त पुढे असताना स्वाहासोमाय (मा.सं.१०.५)



अनुदात्त

**आ.**स्वरिते परे- भूर्भुवः स्वः (मा.सं.३.३७) 'नोदात्त स्वरितोदयम्' (शु.य.प्रा.४.१४१) उदात्तानंतर प्रचय येणार नाही.उदा.

पदपाठ- व्वाजे। वाजेवत व्वाजिनोनः। धनेषु (मा.सं.९.१८)

संहितापाठ- व्वाजे वाजेवतव्वाजिनो नः धनेषु

'ध' उदात्त असल्याने त्या पूर्वीचा वर्ण प्रचय होणार नाही. स्वरित पुढे असतानाही अगोदरचा वर्ण प्रचय होणार नाही.उदा.

पदपाठ- रथौजाऽइति रथ ओजाः। च। सेनानीग्रामण्यौ

संहितापाठ- रथौजाश्च सेनानीग्रामण्यौ या ठिकाणी 'ण्यौ' वर्णापूर्वीचा जो वर्ण प्रचय असणार नाही. म्हणून ताथाभाव्य स्वरित माध्यन्दिन विरोधी आहे हेच सिद्ध होते.

**८८. पदकाले यः स्वरितः संहितायां तथैव च।**
**स्वरितश्चेद् भवेत् पश्चात् स एव निहितः स्वरः।।८८।।**

पदपाठाचे वेळी जो स्वरित आहे (तो) संहितापाठातही स्वरितच असतो परंतु जर त्या स्वरितानंतर स्वरित किंवा उदात्त आल्यास मात्र तो निहित अनुदात्त स्वर बनतो.

**स्पष्टीकरण-** उदात्त किंवा स्वरित पुढे असताना जो पदपाठात स्वरित असतो (जात्यस्वरित) तो संहितापाठातही स्वरित असतो. उदा.



पदपाठ- स्वः। देवेषु (मा.स.१८.५९)

संहितापाठ– स्वर्देवेषु

संहितापाठात कदाचित अपवादही दिसतो. तो अपवाद म्हणजे अशा स्वरितापुढे दुसरा स्वरित आला असताना तो प्रथम स्वरित अनुदात्त बनतो. स्वरितश्चेद् भवेत्पश्यात्– या वाक्यात स्वरित स्वर पुढे असताना असे म्हटले आहे परंतु टीकाकार म्हणतात. 'स्वरितपरत्वमुदात्तपरत्वस्याप्युपलक्षम्।' अर्थात स्वरित परत्व हे उपलक्षण आहे. निहितमुदात्तस्वरित परम् (शु.प्रा.४.१३६)

**अ.** उदात्तपरे निहितत्त्वम् – स्वः

पदपाठ– स्वः। द्यौः = स्वद्यौः (शु.य.३.५)

↓

उदात्त

**आ.**स्वरिते परे– स्वः + स्वः = स्वः (मा.सं.१८.५९)

= स्वः स्वः

या ठिकाणी स्वरित पुढे असताना अगोदरचा स्वर अनुदात्त आला आहे.

**८९. उदात्तान्निहितः स्वार्यः स्वारोदात्तौ न तत्परौ।**
**स्वरो यश्च तथाभूतो ज्ञेयः स प्रचयः सदा।।८९।।**

**(स्वरितानंतर येणाऱ्या प्रचयाचे निदर्शन स्थान)**

उदात्तानंतर अनुदात्त आल्यानंतर त्याचा स्वरित होतो जर त्या अनुदात्तानंतर स्वरित किंवा उदात्त नसतील तर जो अनुदात्त स्वर ताथाभाव्य स्वरिताप्रमाणे असेल तर तोही प्रचय जाणावा. (पूर्वीच्या दोन श्लोकात सांगितलेले स्वरित तसेच प्रचय स्वरासंबंधी तात्पर्य सांगणारा हा श्लोक होय.) प्रचय हा स्वरिताप्रमाणेच असतो (त्याचे प्रतिपादन पुढील श्लोकात केले आहे.)

९०. उच्चानुदात्तयोर्योगे स्वरित: स्वर उच्यते।
ऐक्यं तत्प्रचय: प्रोक्त: सन्धिरेष मिथोऽद्भुत:।।९०।।

(प्रचय हा स्वरिताप्रमाणेच आहे.) उच्च (उदात्त) आणि अनुदात्ताचा योग असताना त्यास स्वरित स्वर म्हणतात. त्या दोहोंचे एकत्व प्रचय होय, हा परस्परसंधी अद्भुत आहे.

**स्पष्टीकरण**– १. **उदात्त आणि अनुदात्ता**चा योग असताना त्यास स्वरित स्वर म्हणतात हे शु.य.प्रा. आणि पाणिनीने सांगितले आहे. (समाहार: स्वरित: (पा.१.२.३९) उभयवान् स्वरित: (शु.य.प्रा.१.११०) )

२. **पाणिनीय व्याकरणात** – प्रचयास एकश्रुती म्हटले आहे. स्वरितात् संहितायामनुदात्तानाम् (पा.१.२.३९) स्वरितात् परम् अनुदात्तमुदात्तमयम् (शु.य.प्रा.४.१३९) स्वरितानंतरच्या अनुदात्ताला उदात्तमय म्हटले आहे. यावरून स्पष्टच आहे की अनुदात्तात उदात्ताचे प्राचुर्य असते. परंतु काही अल्पसा भाग अनुदात्तत्व राहतेच, हाच उदात्त आणि अनुदात्ताचा अद्भुत संधी होय. अशाप्रकारे प्रचय प्राय: स्वरितासमानच आहे. म्हणून याज्ञवल्क्यशिक्षेत हस्तचालन विधीत स्वरिताच्या जागीच प्रचय दाखविले जातात. 'उदात्तं तु भ्रुव: प्रान्ते प्रचयं नासिकाग्रत:' **स्वरित** आणि **प्रचय** यांचा हा संज्ञाभेद हस्तचालन आणि उच्चारण यांच्यामध्ये तीक्ष्णत्व आणि मृदुत्व या दृष्टीने उपपन्न आहे. जात्य इत्यादी जे स्वरिताचे आठ भेद सांगितले आहेत त्या मधील संज्ञाभेदाचे हेच कारण होय. टीकेवरून असे स्पष्ट होते की,

१. **अभिनिहित** सर्वात तीक्ष्ण आहे.

२. या पेक्षा काही अंशी कमी तीक्ष्ण **प्रश्लिष्ट**होय.

३. त्यापेक्षा मृदु जात्य आणि **क्षैप्र** स्वरित होत.

४. या दोहों पेक्षाही मृदुतर– **तैरोव्यंजन**होय.

५. **पादवृत्त** सर्वात मृदु आहे.

## ९१. मात्रिकं वा द्विमात्रं वा स्वरितं यदिहाक्षरम्।
## तस्यादितोर्द्धमात्रा वै शेषं च परतो भवेत्।।९१।।

**(उदात्त, अनुदात्त यांच्या योगाने निर्माण झालेल्या स्वरिताच्या कोणत्या भागावर, उदात्तत्व व कोणत्या भागावर अनुदात्तत्व असते)**

या ठिकाणी (संहितेत) एक मात्रिक किंवा द्विमात्रिक जो स्वरित स्वर असतो त्याची प्रारंभीची अर्धमात्रा उदात्ताची असते आणि अन्य अर्धी मात्रा अनुदात्ताची असते.

**स्पष्टीकरण**- या ठिकाणी 'मात्रा' शब्द प्रमाण वाचक आहे. याचे तात्पर्य असे की एकमात्रिक स्वरितातील $^{१}/_{२}$ मात्रा उदात्त व उत्तरार्ध $^{१}/_{२}$मात्रा अनुदात्त असते. स्वरित हा द्विमात्रिक असेल तर पूर्वार्ध १ मात्रा उदात्त व उत्तरार्ध १ मात्रा अनुदात्त असते.

पाणिनीचे म्हणणे मात्र भिन्न आहे. **'तस्यादित उदात्तमर्धह्रस्वम्'** (पा.१.२.३२) या सूत्रामध्ये 'ह्रस्व' या पदाची विवक्षा मानली नाही तर याज्ञवल्क्य शिक्षेमध्ये सांगितलेलाच आशय येतो. परंतु ह्रस्व या पदाची विवक्षा मानल्यास (ते पद स्वीकारल्यास) दोनमात्रिक स्वरितातील प्रारंभीची $^{१}/_{२}$ मात्रा उदात्त होईल आणि शिल्लक राहिलेली १$^{१}/_{२}$ मात्रा अनुदात्त होईल. प्लुतस्वरितात प्रारंभीच $^{१}/_{२}$ मात्रा उदात्त व २$^{१}/_{२}$ मात्रा अनुदात्त होईल. याठिकाणी हे लक्षात घेणे आवश्यक आहे की ह्रस्व अर्थात १ मात्रिक स्वरितात $^{१}/_{२}$आणि $^{१}/_{२}$मात्रा उदात्त अनुदात्तात येतात. यात काहीच फरक पडत नाही. वाजसनेय प्रातिशाख्यात (१.१२६) पाणिनीयसूत्रातील ह्रस्व ग्रहण अविवक्षित मानूनच स्वरांच्या मात्रा प्रमाणाचा निर्देश केला आहे. तस्यादित उदात्तं स्वरार्धमात्रम् (१.१२६) या सूत्रानुसार

| | | **आदिमात्रा** | **शेषमात्रा** |
|---|---|---|---|
| अ | ह्रस्वस्वरित (१मात्रा) | $^{१}/_{२}$ उदात्त | $^{१}/_{२}$ अनुदात्त |
| आ | दीर्घ स्वरित (२मात्रा) | १मात्रा उदात्त | १ मात्रा अनुदात्त |
| इ | प्लुत स्वरित (३ मात्रा) | १$^{१}/_{२}$मात्रा उदात्त | १$^{१}/_{२}$ मात्रा अनुदात्त |

याज्ञवल्क्य शिक्षेतही हाच अर्थ अभिप्रेत आहे. कारण शुक्लयजुर्वेदाशी संबंधित याज्ञवल्क्यशिक्षा असल्याने त्या शाखेच्या संबंधित प्रातिशाख्याच्या विपरीत अर्थाचे प्रतिपादन ती करणार नाही. अथर्वप्रातिशाख्यातही हाच अर्थ प्रतिपादित केला आहे. स्वरितस्यादितो मात्रार्धमुदात्तम् (अथर्व.प्रा.१.१७) ऋग्वेदीय प्रातिशाख्यात वरील दोनही मतांचे प्रतिपादन केले आहे. तस्योदात्ततरोदात्तादर्धमात्रार्धमेव वा। (ऋ.प्रा.३.४) **पहिले मत**– जो मात्रा काल निर्धारित केला आहे त्या पैकी पहिली अर्धमात्रा उदात्त होय. **दुसरे मत**– जो मात्रा काल आहे त्याची निम्मी मात्रा उदात्त होय. ऋक्प्रातिशाख्यामध्ये पहिले मत दिले आहे तेच ऋक्प्रातिशाख्यामध्ये प्रथम दिल्याने महत्त्वाचे वाटते. काशिकाकार आणि महाभाष्यकारही याच मताचे दिसतात. दुसरे मत ऋग्वेदाच्या इतर शाखात प्रचलित असावे. त्यानुसार किंवा शुक्लयजुर्वेद प्रातिशाख्य, अथर्वप्रातिशाख्य यांच्या अनुसार व्याख्यान करण्याच्या इच्छेने भट्टोजी दीक्षित इत्यादी व्याख्यात्यांनी ह्रस्वता अविवक्षित मानून पाणिनीय सूत्राची व्याख्या केली आहे.

**९२. उच्चस्थानगते हस्ते स्वरितं नोपपद्यते।**
**अधस्तात्तु यदा गच्छेत् स्वरितं न तदा भवेत्।।९२।।**

हस्त उच्चास्थानी (भ्रूप्रान्ती) नेला असता स्वरित उपपन्न होत नाही तसेच हात खाली आणला असतानाही स्वरित होऊ शकत नाही. हस्त हा मध्ये स्थित असतानाच स्वरित स्वर योग्य पद्धतीने प्रदर्शित होतो.

स्वरप्रकरण समाप्त.

पूर्वार्ध समाप्त.

# याज्ञवल्क्य शिक्षा – भाग २

## वर्णप्रकरण (उत्तरार्ध) (कारिका १–११६)

### ५. वर्णदैवताधिकार (कारिका १ ते ७)

''मन्त्रो हीनः स्वरतो वर्णतो वा मिथ्याप्रयुक्तो न तमर्थमाह।'' अशाप्रकारे पाणिनीय शिक्षेत म्हटले आहे या पैकी उदात्तादि स्वरप्रकरण पूर्वार्धात सांगितले आहे. उत्तरार्धात वर्ण सामान्य आणि विशेषप्रकारे सांगून त्यांचे वर्ण, दैवत, लिङ्ग यांची माहिती दिली आहे.

**१. स्वराः । स्पर्शान्तस्थोष्माणः । कण्ठ्य–जिह्वामूलीय–तालव्य–मूर्धन्य –दन्त्योष्ठ–यमाऽनुस्वार–विसर्जनीयोपध्मानीय–नासिक्या–ऽनुनासिक्य–रङ्गाः। नामाऽऽख्यातो–पसर्ग–निपाताश्च किं वर्ण–दैवतलिङ्गाः ।**

स्वर, स्पर्शवर्ण, अन्तस्थवर्ण, ऊष्मवर्ण (एकूण ५६ वर्ण) कण्ठ्य, जिह्वामूलीय, तालव्य, मूर्धन्य, दन्त्योष्ठ वर्ण (स्थानानुसार वर्णांची विभागणी) यम, अनुस्वार, विसर्जनीय, उपध्मानीय, नासिक्य, अनुनासिक्य, रङ्ग (या यमादींना अयोगवाह असे म्हणतात.) नाम, आख्यात, उपसर्ग, निपात (पदांच्या चार जाती) हे कोणत्या वर्णांचे यांच्या देवता कोणत्या, लिङ्ग कोणते याचा विचार येथे केला आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| २. स्वर | – २३ | स्पर्शवर्ण | – २५ |
| अन्त:स्थवर्ण | – ४ | ऊष्मवर्ण | – ४ |

## स्वर

(अकारादि ह्रस्व, दीर्घ, प्लुत)

| ह्रस्व | दीर्घ | प्लुत | |
|---|---|---|---|
| अ | आ | आ३ | ३ |
| इ | ई | ई३ | ३ |
| उ | ऊ | ऊ३ | ३ |
| ऋ | ॠ | ॠ३ | ३ |
| ऌ | ॡ | ॡ३ | ३ |
| – | ए | ए | २ |
| – | ऐ | ऐ | २ |
| – | ओ | ओ२ | २ |
| – | औ | औ२ | २ |
| | | एकूण | २३ |

**स्पष्टीकरण–**

**अ.** स्वर्यते शब्द्यते व्यञ्जनम् एभिः।

**आ.** स्वेन राजन्ते इति वा।

ज्यांच्या द्वारा व्यंजनांचे उच्चारण शक्य होते ते स्वर होत किंवा जे स्वयं सुशोभित होतात ते स्वर होत. स्वरांचे उच्चारण स्वतःहून होते.

## व्यंजने

| स्पर्शाः | अन्तस्थाः | ऊष्माणः |
|---|---|---|
| क् ख् ग् घ् ङ् | य् र् ल् व् | श् ष् स् ह् |
| च् छ् ज् झ् ञ् | | |
| ट् ठ् ड् ढ् ण् | | |
| त् थ् द् ध् न् | | |
| प् फ् ब् भ् म् | | |
| २५ | ४ | ४ |

एकूण ३३

## विशेषत्वाने

**अयोगवाह**– हे स्वतंत्रपणे वर्णसमाम्नायात गणलेले नाहीत परंतु शब्दप्रयोगाच्या दृष्टीने व्यवहाराचे निर्वाहक आहेत. हे कोणत्या ना कोणत्या स्वरात, व्यंजनात संबद्ध होत असतात म्हणून हे अयोगवाह आहेत.

**ये च वर्णसमाम्नाये निर्दिष्टा न सन्ति परं प्रयोगं निर्वाहयन्ति ते अयोगवाहाः।**

**यमादयः**– यम, अनुस्वार, विसर्जनीय, जिह्वामूलीय, उपध्मानीय, नासिक्य, अनुनासिक्य, रंग हे अयोगवाह होत. (शु.य.प्रा. २८.२६.३१ मध्ये) विसर्जनीय, जिह्वामूलीय, उपध्मानीय, अनुस्वार, नासिक्य, यम यांना अयोगवाह म्हटले आहे.

### ३. उच्चारणस्थानानुसार वर्णांचे विभाजन

| वर्णसमाम्नाय | वर्ण | देवता | वर्ण | लिङ्ग |
|---|---|---|---|---|
| स्वर | शुक्ल | नानादैवत्य | ब्राह्मण | पुंलिंग |
| स्पर्शवर्ण | कृष्ण | -- | -- | -- |
| अन्तस्थवर्ण | कपिल | -- | शूद्र | -- |
| ऊष्मवर्ण | अरुण | -- | शूद्र | -- |
| यम | नील | वैश्वदेव | -- | पुंलिंग |
| अनुस्वार(अं) | पीत | -- | -- | -- |
| विसर्जनीय | श्वेत | -- | -- | -- |
| जिह्वामूलीय | रक्त | निर्ऋति: | -- | -- |
| उपध्मानीय | पीत | वैश्वदेवा: | -- | -- |
| नासिक्य | हरित | ,, | -- | -- |
| अनुनासिक (अँ) | अतिनील | ,, | -- | -- |
| रङ्ग | शबल | ,, | -- | -- |
| रेफ | -- | -- | -- | -- |

४. कण्ठ्य - अग्निदेवता - अकारादय:

तालव्य - सोम - चकारादय:

मूर्धन्य - वायु - टकारादय:

दन्त्य - रुद्रा - तकारादय:

ओष्ठ्य - आश्विनौ - पकारादय:

**यम** – कुं, खुं, गुं, घुं... वर्गेषु आद्यानां चतुर्णां परे यमो नाम मध्ये पूर्वसदृश: वर्ण: – एकूण यम २० आहेत. (कारिका १, २ प्रमाणे)

पहिल्या चार वर्गीय व्यंजन+पंचम वर्ग= **यम**

| | |
|---|---|
| स्वर, वर्गीय प्रथम वर्ण | – ब्राह्मण |
| वर्गीय द्वितीय, तृतीय, चतुर्थ वर्ण | – क्षत्रिय |
| वर्गीय पंचम वर्ण | – वैश्य |
| हकार:, ऊष्म | – शूद्र |
| वर्गीय प्रथम, अन्तस्थ | – स्त्रीलिंग |
| इतर अक्षरे | – षण्ढ होत. |

**कारिका ३, ४, ५ अनुसार पदांचे वर्ण, गोत्र दैवते. (नाम, आख्यात, उपसर्ग, निपात)**

| | **वर्ण** | **गोत्र** | **देवता** |
|---|---|---|---|
| नाम | शुक्ल–(रामोहरिकरिभूभृत्) | भार्गव | वायुदेवत्य |
| आख्यात | रोहित–(तिङ्न्त) | भारद्वाज | सोमदेवता |
| उपसर्ग | कपिल–(प्रादय:) | वसिष्ठ | अग्निदेवत्य |
| निपातका: | कृष्ण–(अव्ययमात्र) | काश्यप | वरुणदेवत्य. |

(गोत्र– शु.य.प्रा. ८.५० देवता–शु.य.प्रा. ८.५२)

३. (**कपिल**– पांढरा+पिवळा रंग– पिवळ्याची मात्रा कमी

**अरुण**– ज्याची लालिमा पूर्णपणे स्पष्ट नाही.)

**यम**– एकापदामध्ये वर्गीय १,२,३,४+पंचम वर्ण= अपञ्चमवर्ण सदृश वर्णाचा आगम होतो. हा वर्ण पूर्व वर्णाचे अंग बनतो. उच्चारण मुखसहित नासिका यांनी होते. याचे वर्णन याज्ञ.शि. वर्णप्रकरणात ९४ व्या कारिकेत केले आहे.

**नासिक्य**– हुं... इ. ध्वनी नासिक्य आहेत. केवळ नासिकेतून ज्याचे उच्चारण होते तो नासिक्य होय.

**अनुनासिक्य**– स्वरानंतर जो अर्धानुस्वार (अँ), श्,ष्,स्,ह् यां पूर्वी तसेच य,ल,व यांच्या पूर्वी येणारा अर्धानुस्वार (वंश, सँय्यन्ता) तसेच वर्गीय पंचम वर्ण (ङ्,ञ्,ण्,न्,म्) यांचा अंतर्भाव यात होतो.

**रंग**– स्वरानंतर येणारा अर्धानुस्वार, रेफाच्यापूर्वी किंवा स्वराच्या पूर्वी होतो. वृष्टिमा१ऽइव या पद्धतीने दाखविला जातो.

**४. कण्ठ्या आग्नेया अकारादयः । जिह्वामूलीया नैर्ऋत्या ककारादयः । तालव्या सौम्याश्चकारादय मूर्द्धन्या वायव्याष्टकारादयः । दन्त्या रौद्रास्तकारादय ओष्ठ्या आश्विनाः पकारादयः । शेषा वैश्वदेवा यमादयः ।**

कण्ठस्थानीय अकारादि वर्ण **अग्नि** संबंधी असतात.

जिह्वामूलीय ककारादि **निर्ऋति** संबंधी असतात.

चकारादि तालव्य वर्ण **सोम** संबंधी असतात.

टकारादि मूर्धस्थानीय वर्ण **वायु** संबंधी असतात.

तकारादि दन्त्यवर्ण **रुद्र** संबंधी असतात.

पकारादि ओष्ठस्थानीय वर्ण **अश्विनीकुमार** संबंधी असतात.

तर यम, अनुस्वार, जिह्वामूलीय, विसर्जनीय, उपध्मानीय, नासिक्य, अनुनासिक्य, रङ्ग, रेफ हे सर्व **विश्वेदेवा**संबंधी असतात.

**१+२.** **स्वरास्तु ब्राह्मणा ज्ञेया वर्गाणां प्रथमाश्च ये।**
**द्वितीयाश्च तृतीयाश्च चतुर्थाश्चापि भूमिपाः।।१।।**
**वर्गाणां पञ्चमा वैश्या अन्तस्थाश्च तथैव च।**
**ऊष्माणश्च हकारश्च शूद्रा एव प्रकीर्त्तिताः।।२।।**

### अक्षरांच्या जाती

स्वरांना ब्राह्मण जाणावे.

वर्गीय वर्णांचे जे प्रथम अक्षर (क्,च्,ट्,त्,प्) यांनाही ब्राह्मण जाणावे.

द्वितीय, तृतीय, चतुर्थ वर्णांना क्षत्रिय जाणावे. (**द्वितीय**- ख्, छ्, ठ्, थ्, फ् **तृतीय**- ग्, ज्, ड्, द्, ब् **चतुर्थ**- घ्, झ्, ढ्, ध्, भ्)

**पंचम** वर्ण (ङ्,ञ्,ण्,न्,म्) वैश्यजातीय होत.

**अन्तस्थ** (य्, र्, ल्, व्) वैश्य जातीय होत.

**ऊष्माणः** (श्, ष्, स्, ह्) (उर:स्थानीय) शूद्र जातीय होत.

**स्पष्टीकरण**- ह् कार हा ऊष्मवर्णात आलेला असतानाही ('हकारश्च') हकाराचा आणखी एकवेळा उल्लेख आला आहे. म्हणून उर:स्थानीय हकाराचा अंतर्भाव येथे करावा. ऊष्मवर्णांमध्ये परिगणित हकार असंयुक्त कण्ठस्थानीय आहेत. (अकुहविसर्जनीयानां कण्ठ:) परंतु संयुक्त हकार उर:स्थानीय आहे.

**३.** **शुक्लवर्णानि नामानि आख्याता रोहिता मताः।**
**कपिलास्तूपसर्गाश्च कृष्णाश्चैव निपातकाः।।३।।**

### पदांचे वर्ण, गोत्र, दैवत

नामांचा वर्ण **श्वेत**, आख्यातांचा वर्ण **लाल** मानला गेला आहे. उपसर्गाचा **कपिल** आणि निपातांचा **कृष्ण** वर्ण मानला गेला आहे.

यास्कांनी नाम, आख्यात, उपसर्ग, निपात अशा पदाच्या चार जाती सांगितल्या आहेत.

**४. भारद्वाजकमाख्यातं भार्गवं नाम भाष्यते।**
**वशिष्ठा उपसर्गाश्च निपाताः काश्यपाः स्मृताः।।४।।**

**पदांची गोत्रे**

आख्यातांचे गोत्र भारद्वाज आहे, तसेच नाम हे भार्गव गोत्राचे आहे, उपसर्ग वसिष्ठ गोत्राचे तर निपात काश्यप गोत्राचे आहेत.

**५. सर्वन्तु सौम्यमाख्यातं नाम वायव्यमिष्यते।**
**आग्नेयस्तूपसर्गः स्यान्निपातो वारुणः स्मृतः।।५।।**

**पदांच्या देवता**

सर्व आख्याते सोम देवता असणारे आहेत, नाम वायु देवता असणारे आहेत. उपसर्ग अग्निदेवता असणारे तसेच निपात वरुणदेवता असणारे मानले आहेत.

**६. आदित्यो मुनिभिः प्रोक्तः सर्वाक्षरगणस्य च।**
**स्वरा विसर्जनीयाश्च यमाः पुंल्लिङ्गकाः स्मृताः।।६।।**

**पददेवता, अक्षरदेवता आणि लिंग**

मुनींनी संपूर्ण अक्षरसमुदायाची देवता आदित्य सांगितली आहे आणि सर्वपदांची देवताही आदित्य आहे. स्वर, विसर्जनीय, यम हे पुंल्लिंगी आहेत.

**७. प्रथमाश्च तथाऽन्तस्थाः स्त्रीलिङ्गाः परिकीर्तिताः।**
**शेषाक्षराणि षण्ढानि प्राहुर्लिङ्गविवेचकाः।।७।।**

**अक्षरांची लिंगे**

१. स्वर, विसर्ग, यम यांना पुल्लिंग मानले आहे.

२. वर्गातील प्रथम वर्ण, अन्तस्थ (क्, च्, ट्, त्, प्, य्, र्, ल्, व्) यांना स्त्रीलिंग मानले आहे.

३. इतर सर्व अक्षरे नपुंसकलिंग आहेत.

## ६. सन्ध्यधिकार (कारिका ८-५८)

### (सन्धिश्चतुर्विधो भवति लोपाऽऽगमविकाराः प्रकृतिभावश्चेति)

(वर्णांचे संज्ञा, वर्ण दैवत्य हे सांगून संधिप्रकार सांगितले आहेत)

**स्पष्टीकरण**- संधि चार प्रकारचे असतात.

**लोप** - (वर्णस्य अदर्शनम्) (वर्ण न दिसणे)

**आगम** - (वर्णोपजनः) (नवीन वर्ण येणे)

**विकार** - (आदेश) (एकावर्णाच्या जागी दुसरा वर्ण येणे)

**प्रकृतिभाव** - (स्वकीयेन रूपेण अवस्थानम्) (मूळ स्थितीत राहणे)

**लोप**-

**विसर्गलोप**- अयक्ष्माः। मा अयक्ष्मा मा (मा.सं. १.१)

शततेजाः। व्वायुः- शततेजाव्वायुः (मा.सं. १.२४)

तिग्मतेजाः। द्विषतः- तिग्मतेजाद्विषतः (मा.सं. १.२४)

लोपं धौ (शु.य.प्रा. ४.३८) या सूत्रानुसार अ, आ स्वरानंतर येणाऱ्या विसर्गाचा लोप धिसंज्ञक वर्ण पुढे असताना सांगितला आहे.

अ आ + : + धिसंज्ञकवर्ण



विसर्गाचा लोप

धिसंज्ञक वर्णांमध्ये ह, य्, र्, ल्, व्, वर्गीय ३,४,५ वे वर्ण (मृदु व्यंजने) इतके वर्ण समाविष्ट होतात. या वर्णांचा अंतर्भाव पाणिनीने 'हश्' प्रत्याहारात केला आहे आणि अशा विसर्गाचा- स् → रु → य् या क्रमाने परिवर्तन होऊन **य्** चा लोप सांगितला आहे.

**आगम-**

प्रत्यङ्सोमः - प्रत्यङ्**क्**सोमः (मा.सं. १०.३१)

प्राङ्सोमः - प्राङ्क्सोमः (मा.सं. १९.३)

अस्मान्।सीते - अस्मान्त्सीते (मा.सं. १८.६१)

त्रीन्।समुद्रान् - त्रीन्त्समुद्रान् (मा.सं. १३.३१)

वरील दोन पहिल्या उदाहरणात **क्** आणि पुढील दोन उदाहरणात **त्** या वर्णाचा आगम झालेला आहे. (शु.य.प्रा.४.१४ 'ङ्नौ क्ताभ्यां सकारे' यासूत्रानुसार ङ् आणि न् यांच्या नंतर **स्** आल्यास क्रमशः **क्** आणि **त्** यांच्या व्यवधानाचे विधान केले आहे.) पाणिनीने अशा ठिकाणी ङ् च्या पुढे श्, ष्, स् असतात कुक् (क्) चा आगम सांगितला आहे तसेच न् नंतर स् असताना **धुट्**(ध्) चा आगम सांगितला आहे. त्या प्रमाणे त्रीन् समुद्रान् याठिकाणी धुट् आगम होऊन

त्रीन् ध् समुद्रान्



ध् चा त् होऊन त्रीन्त्समुद्रान् असा संधि होतो.

**विकार-**

आ । इ॒दम्- एदम् (मा.सं. ४.१)

आ॒। इमे- एमे (मा.सं. ३३.६०)

आ+ इ॒ष्टंय- ए॒ष्टंय (मा.सं. १८.८१)

प्र । इ॒षि॒त: प्रेषिंतः (मा.सं. २१.५१)

शु.य.प्रा. 'कण्ठ्यादिवर्ण एकारम्' शु.य.प्र. ४.३३ या सूत्राने 'अ' नंतर इ असताना त्याचा एकार होतो, अ नंतर उ असताना त्याचा ओकार होतो हे सांगितले आहे.

पाणिनीने 'आद्गुण:' या सूत्राने अवर्णानंतर स्वर असताना गुणरूप एकादेश सांगितला आहे.

**प्रकृतिभाव-**

आ॒शु॒ः। शिशा॑नः॒≡आ॒शुः शिशा॑नः॒ (मा.सं. १७.३३)

यु॒ञ्जा॒नः॒ प्र॑थमम् यु॒ञ्जा॒नः॒ प्प्र॑थ॒मम् (मा.सं. ११.१)

अदि॑तिः। षोड॑शाक्षरेण । अदि॑तिः षोड॑शाक्षरेण (मा.सं. ९.३४)

इन्द्रा॑ग्नी॒। आग॑तम्- इन्द्रा॑ग्नी॒ आग॑तम् (मा.सं. २.३१)

नमो॑। अ॒स्तु- नमो॑ऽअस्तु (मा.सं. १६.६४)

शुक्लयजुर्वेद प्रातिशाख्यातील 'प्रकृत्या कखयो: पफयोश्च' (३.११) या सूत्रात सांगितल्याप्रमाणे विसर्गाच्यापुढे क्,ख्,प्,फ् आले असताना विसर्गाच्या प्रकृतिभावाचे विधान आहे. या सूत्रानुसार 'युञ्जानः**प्प्र**थमम्' हा संधी सिद्ध होतो. विसर्गानंतर दिसणाऱ्या पकाराचे द्वित्व विसर्जनीयाद् व्यञ्जनपर: (शु.य.प्रा.४.१०६) सूत्राने झाले आहे. पाणिनीच्या व्यवस्थेत विसर्गापुढे 'प्' आला असताना पाक्षिक

प्रकृतिभाव कुप्वो≍क≍पौ च (पाणि.८.३.३८) या सूत्राने शक्य आहे. त्याचप्रमाणे आशुः शिशानः इत्यादी उदाहरणांमध्ये शुक्लयजुर्वेदप्रातिशाख्यातील शाकल्याच्या मतानुसार विसर्गाच्या पुढे श्, ष्, स् आल्यास विसर्गाचा अविकार होतो, म्हणूनच प्रकृतिभाव (विसर्गाचा अविकार) झाला आहे. शु.य.प्रातिशाख्यात प्रत्ययसवर्णम्मुदि शाकटायनः (३.९) या सूत्रात शाकटायनाचे मत दिले आहे. विसर्गानंतर श्, ष्, स् असताना परसवर्णाचे विधान केले आहे. परंतु अविकार৺शाकल्यः शषसेषु (३.१०) या सूत्रात वर्णिलेल्या शाकल्याच्या मताने विसर्गाचा अविकार सांगितला आहे.

इन्द्राग्नी+आगतम्- इन्द्राग्नीमध्ये द्विवचनान्त ईकार असल्याने इन्द्राग्नी पदाला प्रगृह्य संज्ञा येऊन सन्ध्यभाव दिसतो. प्रगृह्यं स्वरे (शु.य.प्रा.४.८७) सूत्रानुसार प्रकृतिभाव होतो. पाणिनीचीही हीच व्यवस्था आहे. ईदूदेद्... या सूत्रात प्रगृह्य संज्ञा सांगून 'प्लुत प्रगृह्या अचि नित्यम्' या सूत्राने प्रगृह्य संज्ञा व सन्ध्यभाव सांगितला आहे. शु.य.प्रा. 'हेड...(४.८५) या सूत्रानुसार हेडः, आपः, गुवः इत्यादी ठिकाणी होणाऱ्या एकार आणि ओकार या ठिकाणी प्रकृतिभाव सांगितला आहे. पाणिनीनेही प्रकृत्यान्तः पादमव्ययपरे (६.१.११५) सूत्राने अशा ठिकाणी प्रकृतिभावाची व्यवस्था केली आहे.

**८. आकाशस्था यथा विद्युत् स्फुटिता मणिसूत्रवत्।**
**एषच्छेदो विवृत्तीनां यथा बालेषु कर्त्तरी।।८।।**

(प्रकृतिभाव असताना विवृत्तीचे स्वरूप-उच्चारण प्रकार)

ज्या प्रमाणे आकाशातील विद्युत् मणिसूत्राप्रमाणे वेगाने प्रस्फुटित होते आणि आवाज होतो त्या प्रमाणे विवृत्तींचा छेद करून उच्चारण करावे.

ज्या प्रमाणे (केस कापताना) मुलाच्या केसांमध्ये कात्री (वेगाने कटक् असा आवाज करत करते) त्या प्रमाणे विवृत्ति उच्चारणात होते.

मण्यांमध्ये असणारा दोरा तुटताना ज्या प्रमाणे आवाज होतो त्याच प्रमाणे वीजेचा देखील तसाच आवाज होतो.

**स्पष्टीकरण-**

**विवृत्तीच्या उच्चारणासंबंधात ३ उपमा दिल्या आहेत.**

१. मण्यातील दोरा तुटताना होणारा आवाज

२. वीज प्रस्फुटित होणारा आवाज

३. मुलांचे केस कापताना कात्रीचा होणारा आवाज.

या तीनही क्रिया वेगाने होतात आणि अशा ध्वनींचा संबंध मात्रेशी (किती वेळ) लावता येत नाही त्याच प्रमाणे विवृत्तीचे उच्चारण नियतकालव्यापी असावे हे उच्चारण विद्युत्स्फुरणाप्रमाणे असावे.

**९. द्वयोस्तु स्वरयोर्मध्ये सन्धिर्यत्र न दृश्यते।**
**विवृत्तिस्तत्र विज्ञेया 'यऽईशे' तु निदर्शनम्।।९।।**

**विवृत्तिलक्षण**

दोन स्वरांमध्ये ज्या ठिकाणी संधि दिसत नाही त्याठिकाणी विवृत्ती जाणावी. या संबंधात षऽईशे... हा मंत्र उदाहरण म्हणून सांगता येईल.

षऽईशे... याचा विग्रह ष: ईशे असा आहे.

**स्पष्टीकरण-**

य: ईशे
↓
ष य् ईशे -कण्ठ्यपूर्वो यकारमरिफित: (शु.य.प्रा.४.३७) या सूत्रानुसार विसर्गाचा य् होतो.
↓
ष× ईशे -यवयोः पदान्तयो: स्वरमध्ये लोप: (४.१२५) यानुसार य् चा लोप होतो.

ष ईशे – अ+ई चा ए असा संधी करण्याचा प्रसंग निर्माण झाला. कण्ठ्यादिवर्ण एकारम् (प्राति.४.५३) सूत्राने ए होतो तर न परकाल: पूर्वकाले पुन: (प्राति.३.४) या सूत्राने एकाराचा निषेध सांगितला आहे.

ष ईशे– सन्ध्यभाव म्हणून याठिकाणी विवृत्ती आहे.

पाणिनीच्या सूत्रानुसार–

स्  षऽईश या दोन स्वरात जे अंतराल आहे तीच विवृत्ती होय.

↓

र्

↓

य्

↓

ष – लोप झाल्यानंतर परत संधी नाही.

**नारदीय शिक्षेच्या अनुसार**

शाखाभेदाने विवृत्तीच्या अन्तराला संबंधात विभिन्न मते सूचित केली आहेत.

चतसृणां विवृत्तीनामन्तरं मात्रिकं भवेत्।
अर्धमात्रिकमन्येषामन्येषामन्येषामणुमात्रिकम्।। (नारदीयशि.३.४)

शाखाभेदाने विवृत्तीचे अंतराल मात्रिक, अर्धमात्रिक $^{१}/_{२}$, अणुमात्रिक $^{१}/_{४}$ मात्रा असते. विवृत्ती असताना अर्धमात्रोच्चारणज्ञापक खण्डाकार चिह्न (ऽ) वैदिक देतात.

**१०+११+१२. पिपीलिका पाकवती तथा वत्सानुसारिणी।**

**वत्सानुसृजिता चैव चतस्रस्ता विवृत्तय:।।१०।।**

**पिपीलिकाऽऽद्यन्तदीर्घा नाभ्याऽआसीन्निदर्शनम्।**
**पाकवत्युभयोर्ह्रस्वा व्विनऽइन्द्रेति दर्शनम्।।११।।**

**वत्सानुसारिणी चादौ दीर्घा ताऽअस्य दर्शनम्।**
**अन्ते वत्सानुसृजिता तानऽआवोढमश्विना।।१२।।**

**विवृत्तींचे भेद आणि उदाहरणे**




पिपीलिका, पाकवती, वत्सानुसारिणी, वत्सानुसृजिता अशाप्रकारे चार विवृत्ती आहेत.

**स्पष्टीकरण-**

**पिपीलिका-** आदि आणि अन्ती दोन्ही बाजूने दीर्घ स्वर असल्यास पिपीलिका विवृत्ती होते. उदा. नाभ्याऽआसीत् (मा.सं.३१.१३) (दोन्ही बाजूने दीर्घ आणि मध्यभागी कृशत्व त्यामुळे मुंगीप्रमाणे ही रचना असल्याने या विवृत्तीस पिपीलिका विवृत्ती म्हटले आहे.)

(या ठिकाणी दोन्ही बाजूंनी दीर्घत्व असल्याने स्पष्ट श्रुती होते.)

**पाकवती-** दोन्ही बाजूंनी (आदि-अन्ती) ह्रस्व अक्षर असताना पाकवती विवृत्ती होते. उदा. विनऽइन्द्र (दोन्ही बाजूंनी ह्रस्व अक्षर असल्याने स्वल्पश्रुती ऐकायला येते)

**वत्सानुसारिणी-** आदि दीर्घ आणि अन्ती ह्रस्व अक्षर असल्यास ही वत्सानुसारिणी विवृत्ती होते. ताऽअस्य - हे या संबंधातील उदाहरण होय. दीर्घमात्रेपेक्षा ह्रस्वमात्रा अल्प असल्याने हीस वत्सानुसारीणी म्हटले आहे. वत्स प्रौढापेक्षा लहान असतो. या विवृत्तीत दीर्घाचा ह्रस्वाशी संबंध असल्याने दीर्घाशी मिसळलेले श्रवण होते.

**वत्सानुसृजिता**– (आदि ह्रस्व) आणि अन्ती दीर्घ असताना वत्सानुसृजिता विवृत्ती होते. तानऽआवोढामश्विना ... हे या संबंधातील उदाहरण. या विवृत्तीत आदि ह्रस्वाचे अनुकरण करीत अन्त्य दीर्घ श्रुत होतो. या चारही विवृत्तींमध्ये माध्यन्दिन शाखेत अर्धमात्रा कालिक विराम असतो.

**१३. करिणी कुर्विणी चैव हरिणी हरिता तथा।**
**तद्वद्धंसपदा नाम पञ्चैताः स्वरभक्तयः।।१३।।**

**स्वरभक्ती**

अर्शस... (मा.सं.१२.९७) इत्यादी ठिकाणी ऊष्मवर्णांशी संधि करताना, वर्णांचे द्वित्व झाले असताना, संहिता विग्रह करताना रेफ आणि ऊष्मवर्णांमध्ये स्वरभक्ति नावाची विरति (विराम) दिसतो या स्वरभक्तीचे भेद व स्वरूप या ठिकाणी सांगितले आहेत.)




करिणी, कुर्विणी, हरिणी, हरिता तसेच हंसपदा नावाच्या या पाच **स्वरभक्ती** होत.

**स्पष्टीकरण**– या श्लोकात पाचही स्वरभक्तींचा उल्लेख केला आहे. अशावेळी 'पञ्चैताः स्वरभक्तयः।' असे म्हणून 'पाच' हे म्हणण्याची आवश्यकता काय असा प्रश्न निर्माण होतो. परंतु पाचांपेक्षा कमी, अधिक स्वरभक्ती नाहीत हे स्पष्ट करण्यासाठी 'पञ्च' या पदाचाही वापर कारिकेत केला आहे.

रलावित्यादि... (शु.य.प्रा.४.१७) या सूत्रात ऊष्मांच्या बाबतीत विधान केले आहे. प्रातिशाख्याच्या परिशिष्ट असणाऱ्या प्रतिज्ञासूत्रात 'अथापरान्तस्थस्य' (मा.प्र.सू.२.३) या ठिकाणी ऋकाराचाही उल्लेख केला आहे.

**१४. करिणी रहयोर्योगे कुर्विणी लहकारयोः।**
**हरिणी रशयोर्योगे हरिता लशकारयोः।।१४।।**

र् आणि ह् यांच्या संयोगाने करिणी (स्वरभक्ती होते)

ल् आणि ह् यांच्या संयोगाने कुर्विणी (स्वरभक्ती होते)

र् आणि श् यांच्या संयोगाने हरिणी (स्वरभक्ती होते)

ल् आणि श् यांच्या संयोगाने हरिता (स्वरभक्ती होते)

र् आणि ष् यांच्या संयोगाने हंसपदा (स्वरभक्ती होते)

माध्यंदिन संहितेतील मंत्रामध्ये रेफ+ऋकार यांची स्वरभक्ती दिसत नाही, म्हणूनच याज्ञवल्क्य शिक्षेत या स्वरभक्तीचा उल्लेख नाही. प्रतिज्ञासूत्र संहिता व ब्राह्मण या दोन्ही ग्रंथाचा विचार करणारे असल्याने त्यात ‘र’ सोबत ऋकाराचा योग असताना स्वरभक्ती सांगितली आहे. ही स्वरभक्ती शतपथब्राह्मणात दिसते.

**१५+१६. या तु हंसपदा नाम सा तु रेफषकारयोः।**
**देवम्बर्हिश्च करिणी ‘उपबल्हेति’ कुर्विणी।।१५।।**

**हरिणी दर्शतमिति शतवल्शेति हारिता।**
**व्वर्षो व्वर्षीयसीत्याहुस्तथा हंसपदेति च।।१६।।**

करिणी (र्+ह्) देवम्बर्हिश्च (मा.सं.२१.४८)

कुर्विणी (ल्+ह्) उपबल्हे (मा.सं.२३.५१)

हरिणी (र्+श्) दर्शतम् (मा.सं.११.३७)

हरिता (ल्+श्) शतवल्शा (मा.सं.१२.१००)

हंसपदा (र्+ष्) व्वर्षो व्वर्षीयसीत्याहुः (मा.सं.६.११)

**स्वरभक्ती कशास म्हणतात–**

रलाभ्यां पर ऊष्माणो यत्र स्युः स्वरितोदयाः ।
स्वरभक्तिरसौ ज्ञेया पूर्वमाक्रम्य पठ्यते ।।

र् आणि ल् यांच्यापुढे ऊष्मवर्ण (श्, ष्, स्, ह्) आला असता (ऊष्मवर्णाला अव्यवहित) असा एक स्वर उच्चारणात येतो तीच स्वरभक्ती (स्वरांचे येणे) होय. ही स्वरभक्ती पूर्ववर्णाच्या सोबत म्हटली जाते. श्, ष्, स् हे स्वराने युक्त असायला हवेत, असे वर्णरत्न प्रदीपिका शिक्षेमध्ये म्हटले आहे.

**स्पष्टीकरण–**

र् ल्  + ऊष्म



मध्यभागी स्वरभक्ती होते.

रेफो वाथ लकारो वा यत्रोष्मणि स्वरोदये।
स्वरभक्तिर्भवेत् तत्र पूर्वमाक्रम्य पठ्यते।।(५४)

स्वरभक्ती रेफ, लकार आणि ऊष्मा यांच्या मधेच होते. स्वरभक्तीचे उच्चारण पूर्ववर्ती रेफ किंवा लकारासोबतच होते. परंतु ऊष्म वर्ण हे स्वराने युक्त असायला हवेत. संस्कृतटीकाकारांनी **पूर्वमाक्रम्य** चा अर्थ **रेफेण सह** असा केला आहे. स्वरभक्तीस 'रेफोष्ममध्यस्था' म्हटले आहे. या ठिकाणी र् ला ल् चे देखील उपलक्षण मानले आहे.

र्, ल् + ऊष्म (स्वरितोदय)=स्वरभक्ती (ऊष्म वर्णा अगोदर होते.)

(रेफ लकार यांचा ऊष्मांशी संयोग झाला असताना स्वरभक्ती सांगितली तर त्या ठिकाणी कोणता स्वर येतो)

**१७. स्वरभक्तिं प्रयुञ्जानस्त्रीन् दोषान् परिवर्जयेत्।**
**इकारं चाप्युकारं च ग्रस्तदोषं तथापि च।।१७।।**

स्वरभक्तीचा प्रयोग करताना तीन दोष टाळायला हवेत इकार, उकार तसेच ग्रस्त (नावाचा दोष) यांचे वर्जन करायला हवे.

**स्पष्टीकरण– ग्रस्तदोष–** वर्णोच्चाराचे **स्थान** आणि **करण** यांच्या निष्पीडनाने (संकोचाने) कंठाची संवृतता होते यासच ग्रस्तदोष म्हणतात. हा दोष स्वरभक्तीच्यावेळी टाळायला हवा.सामवेदात अकार तसेच अथर्ववेदात इकाराची स्वरभक्ती होते, अशी स्वरभक्ती माध्यंदिन शाखेत होत नाही.

शषसेषु विवृत्तां तु हकारे संवृतां विदु:। (ना.शि.२.६.८)

सम्यगेनां यदा पश्येच्छ**तवलिशेति** निदर्शनम्।
अकारं चाप्**युकारं** च विच्छिन्नं विवृतन्तथा।। (माण्डू.१०१)

ऋक्प्रातिशाख्यात धूर्षदम् इत्यादि ठिकाणी उकाररूप, तसेच बर्हिषद: इत्यादि ठिकाणी इकाररूपा स्वरभक्ती दाखवलेली आहे. अर्थात इ, उ यांचे वर्जन केवळ माध्यन्दिनशाखेसाठीच आहे. माध्यन्दिनशाखे मध्ये **एकारात्मिका स्वरभक्तीचे** विधान आहे.

वर्णरत्नप्रदीपिका शिक्षेमध्ये रेफ आणि ऊष्म वर्ण यांच्यामध्ये एकार स्वरभक्ती सांगितली आहे. 'ऊष्मणामुपरिस्थस्तु रेफो याति रेवर्णताम्' (५४)

शिक्षेमध्ये रेफ/लकार यांच्या सोबत स् च्या स्वरभक्तीचे उदाहरण दिले नाही कारण रेफानंतर येणारा दन्त्य स मूर्धन्य (ष्) बनतो म्हणूनच रेफानंतर येणारा दन्त्य स् चे उदाहरण दुर्मीळ आहे. ल् ने संयुक्त स् चे उदाहरण माध्यन्दिन संहितेत मिळत नाही.

या स्वरभक्तीचा काळ **अर्धमात्रा** असतो ऋक्प्रातिशाख्यात म्हटले आहे की **द्राघीयसी** सार्धमात्रा (ऋ.प्रा.१.३३) हाच आशय शु.य.प्रा.४.१७ च्या भाष्यात उवटाने स्पष्ट केला आहे. 'ऋलृसदृशौ व्यञ्जनावर्धमात्रिकौ।।' ऋग्वेदप्रातिशाख्यानुसार र् च्या पुढे ऊष्मवर्ण (श्,ष्,स्,ह्) आल्यास स्वरभक्ती दीर्घ होते. द्राघीयसी तूष्मपरा (ऋ.पा.६.४८) उदा. कर्हिचित् (ऋ.८.७३.५) या स्वरभक्तीचा उच्चारण काळ

अर्धमात्रेचा असतो जर स्वरभक्तिस्थलानंतर द्वित्व झालेला ऊष्मवर्ण असल्यास ती ह्रस्व स्वरभक्ती होते. 'इतरा क्रमे' (ऋ.प्रा.६.४९) उदा. वर्ष्यान् (ऋ.५.८३.३.), अदर्श्यायती (ऋ.७.८१.१) हा दीर्घ तसेच ह्रस्व भेद ऋक्प्रातिशाख्यात दिसतो. याज्ञवल्क्यशिक्षेनुसार वर्ष्यान् इत्यादी ठिकाणी द्वित्व झालेला ऊष्मवर्ण असल्याने या ठिकाणी स्वरभक्ती होणार नाही. रेफानंतर षकार असला तरी त्यानंतर स्वर आलेला नाही तर तो ऊष्मा **व्यञ्जनोदय** आहे, म्हणून स्वरभक्ती नाही. स्वरभक्ती ही स्वरसदृश दिसत असली तरी संयोगाचा (जोडाक्षराचा) विघात करत नाही. न संयोगं स्वरभक्तिर्विहन्ति... (ऋ.प्रा.६.३५) ही स्वरभक्ती संयुक्त वर्णाच्या कार्याचा विच्छेद करत नाही. या सूजूर्णि: श्रेणि: ... या ठिकाणी र् नंतर स्वरभक्तीचे व्यवधान असतानाही 'ण' काराचे द्वित्व झालेले आहे.

**१८. एतल्लक्षणमाख्यातं याज्ञवल्क्येन धीमता।**
**सम्यक्पाठस्य सिद्ध्यर्थं शिष्याणां हितकाम्यया।।१८।।**

मंत्राचा योग्य पाठ व्हावा यासाठी शिष्यांचे हित व्हावे या इच्छेने बुद्धिमान याज्ञवल्क्यांनी हे लक्षण सांगितले.

**स्पष्टीकरण**– मंत्राच्या चुकीच्या वर्णोच्चाराने व हीन पाठाने अनिष्ट निर्माण होते म्हणून योग्य प्रकारे पठन होणे आवश्यक आहे. श्लोकाच्या उत्तरार्धात एक पाठभेद आहे. 'सम्यग्वर्णान् प्रयुञ्जानो ब्रह्मलोके महीयते।' या पाठाचा आशय आहे की वर्णांचा (नियमानुसार) पाठ करणारा ब्रह्मलोकात पूजनीय ठरतो.

**१९. अर्धमात्रास्वरं किञ्चित् पृथङ्न्यूनमिवोच्चरन्।**
**ऋकारे च लृकारे च हृत्कण्ठमनसाऽपि च।।१९।।**

(स्वरभक्तीच्या निमित्ताने रलावृलृवर्णाभ्यां शु.य.प्रा.४.१७ या सूत्राने ऋलृवर्णसदृश स्वरभेद सांगितला परंतु त्यांचा उच्चार कसा करावा हे याठिकाणी सांगितले आहे.)

(स्वरभक्तीचा उच्चार करताना) ऋकार आणि लृकाराचा उच्चार हृदय, कण्ठ मनाने (काळजीपूर्वक) करावा. तो (र्,ल्) यांच्यापेक्षा भिन्न, (तसेच) एकारसदृशोच्चारणापेक्षा कमी मात्रेचा असावा.

**स्वरभक्तीचा उच्चार-**

१. ऋकार,लृकार स्वरूपी असावा

२. एकार सदृश असावा

३. अर्धमात्रा काळ असावा

४. स्वरसदृश असला तरी स्वरभक्तीमध्ये व्यंजनाचेही गुण येतात हे जाणावे.

१. शुक्लयजुर्वेदप्रातिशाख्यात स्वरभक्तीस ऋ,लृ सदृश सांगितली आहे. रलौऋलृवर्णाभ्याम् ऊष्माणि स्वरोदये सर्वत्र (४.१७) म्हणून ऋकार, लृकार उच्चारणप्रकार या सूत्रात सांगितला आहे.

२. स्वरभक्तीच्या प्रसंगी ऋकार व लृकार यांचे उच्चारण एकारसदृश व्हायला हवे. लघुमाध्यन्दिनशिक्षेत म्हणले आहे- ऋकारः खलु सर्वत्र ह्येकार सदृशो भवेत् (२८)

३. हे उच्चारण अर्धमात्रिक असावे. एकाराप्रमाणे द्विमात्रिक असू नये. एकारसदृश असे म्हटले आहे. त्या सारखे परंतु तसेच उच्चारण असे म्हटलेले नाही.

४. स्वरांचा आभ्यंतर प्रयत्न विवार आहे. व्यंजनांचा स्पृष्ट आहे, यावरून स्वर हे अस्पृष्ट ठरतात. स्वरभक्तीमधील ऋकार आणि लृकार स्वरांप्रमाणे अस्पृष्ट नाहीत त्यांमधे व्यंजनाचा 'स्पृष्ट' हा ही गुण दिसतो.

ऋलोर्मध्ये भवत्यर्धमात्रा रेफलकारयोः (वर्णप्रदीपिका शिक्षा ४२)

ऋकार आणि लृकारात रेफ आणि लकार यांचा अंश असल्याने र्, ल् मधील ईषत्स्पृष्ट हा धर्मही ऋ, लृ मध्ये संक्रमित होतो. म्हणून अन्य स्वराप्रमाणे यांच्या उच्चारणात अस्पृष्टता नाही अर्थात काही अंशी व्यंजनांप्रमाणे स्पृष्टता येते.

५. या शिवाय ऋ आणि लृ यांच्या मध्ये असणारा रेफ आणि लकार स्वरापेक्षा भिन्न मानणेही योग्य नाही. म्हणून यांचा एका वर्णाप्रमाणेच उच्चार करणे योग्य आहे.

ऋलृवर्णयो: रेफलकारौ संश्लिष्टौ अश्रुतिधरौ एकवर्णौ (शु.य.प्रा.४.१४६)

६. ऋ आणि लृ चे उच्चारण स्वरभक्तीच्या वेळी अर्धमात्रिक आणि एकार सदृश करणे आवश्यक आहे. प्रतिज्ञासूत्रातदेखील लघुमाध्यन्दिनशिक्षेप्रमाणे ऋकाराचे उच्चारण एकारसदृश सांगितले आहे. ऋकारस्य तु संयुक्तासंयुक्तस्य विशेषेण सर्वत्रैवम् (प्रतिज्ञासूत्र २.५)

७. स्वरभक्तीच्या उच्चारणाला अर्धमात्रा काळ तेव्हाच लागेल ज्यावेळी त्याचे उच्चारण शीघ्रतेने केले जाईल. म्हणून स्वरभक्तीचे उच्चारण एकारसदृश परंतु अर्धमात्राकाल असणारे करावे.

**तात्पर्य-**

**अ**. स्वरभक्तीमधील ऋ, लृ वस्तुत: व्यंजने आहेत, त्यात व्यंजनाचा स्पृष्टत्व गुण आहे.

**आ**. ऋ, लृ स्वरांप्रमाणे आहेत म्हणून संयोगाचा विघात या द्वारा होत नाही.

**इ**. ही स्वरभक्ती पूर्वस्वराची अंग बनते. स्वभक्ति: पूर्वभागाक्षराङ्गम् (ऋ.प्रा.१.३२)

कृष्णोसी ... (मा.सं.२.१)- क्रेष्णोसि...

क्लृप्तश्चमे - (मा.सं.१८.११) क्लेप्तश्चमे

**२०. आद्या मात्रा तु कण्ठ्यस्य एकारौकारयोर्भवेत्।**
**तालव्यस्य तथौष्ठ्यस्य द्वितीया च यथाक्रमात्।।२०।।**

अनेक वर्णांचे एकवर्णत्व विधान असताना ए, ऐ, ओ, औ यांच्यासंबंधी एकार आणि ओकार यांतील पहिली मात्रा कण्ठ्य अकाराची आहे तर दुसरी मात्रा अनुक्रमे (एकारातील इकार) तालव्य आणि (ओकारातील उकार) ओष्ठ्य आहे हे जाणावे.

**स्पष्टीकरण**– एकार आणि ओकाराच्या समानच ऐकार आणि औकार असतानाही ऐ आणि औ या मात्रांविषयी वरील श्लोकात सांगितलेले नाही. परंतु एकार आणि ओकार हे उपलक्षण असल्यामुळे त्यांच्या प्रमाणेच ऐ आणि औ चा मात्राविभाग जाणणे आवश्यक आहे. एओग्रहणम् ऐऔइत्यनयोरप्युपलक्षणम् (या.शि.टीका.)

यानुसार ऐकार आणि औकार पहिली मात्रा कण्ठ्य व दुसरी मात्रा अनुक्रमे तालु आणि ओष्ठ अशीच आहे.

ऐकार आणि औकार यांचा मात्राविभाग याज्ञवल्क्यशिक्षेत सांगितलेला नाही.वाजसनेयप्रातिशाख्यात ऐ, औ यातील पहिली मात्रा कण्ठ्य व दुसरी अनुक्रमे तालव्य, ओष्ठ्य सांगितली आहे.

'ऐकारौकारयो: कण्ठ्या पूर्वमात्रा ताल्वोष्ठयोरुत्तरा' (शु.य.प्रा.१.७३) यातही मात्रांचा समविभाग दिसून येतो.

**ऐ औ यांचा मात्राविभाग–**

पाणिनिशिक्षा

अर्धमात्रा तु कण्ठ्यस्य ह्येकारैकारयोर्भवेत्।
ओकारौकारयोर्मात्रा तयोर्विवृतसंवृतम्।।१९।।

ए, ऐ– ओ, औ– या दोहों मधील प्रत्येकी पूर्वावयव

↓

ए, ओ– हे विवृत आहेत तर या दोहोंमधील प्रत्येकी उत्तरावयव ऐ, औ हे संवृत देखील आहेत.

**२१+२२. ॐकारस्तु प्लुतो ज्ञेयः प्लुतमग्ना द्वितीयकम्।**
**लाजीनिति तृतीयञ्च शाचीनिति चतुर्थकम्।।२१।।**
**पञ्चमं तु विवेशाधः-स्विदासीदिति षष्ठकम्।**
**सप्तमन्तूपरिस्विदा ह्यष्टमं नैव विद्यते।।२२।।**

(ओंकाराची मात्रा नित्य प्लुतच असते. अन्यत्रही असणारी प्लुतस्थले यात सांगितली आहेत.)

ओंकार हा प्लुत जाणावा, दुसरा प्लुत '**अग्नाइ**', तिसरा '**लाजीन्**', चौथा '**शाचीन्**', पाचवा '**विवेश**', सहावा '**अधः स्विदासीद्**', सातवा '**उपरिस्विदासीत्**' हे आहेत. आठवा प्लुत (दिसतच) नाही.

**स्पष्टीकरण**- शुक्लयजुर्वेदमाध्यन्दिनसंहितेत तीन मात्रा असणार. ॐकार तीन स्थानी आलेला आहे.

**अ**.ॐ३ म्प्रतिष्ठ (मा.सं.२.१३)

**आ**.ॐ३ क्रतोस्मर (मा.सं.४०.१५)

**इ**.ॐ३ खंब्रह्म (मा.सं.४०.१७)

याठिकाणी ॐकार प्लुत आहे.

प्लुत असणारी अन्य स्थले पुढील प्रमाणे-

**२**. अग्ना३ इ (मा.सं.४०.१७)

**३**. लाजी३ न् (मा.सं.२३.८)

**४**. शाची३ न् (मा.सं.२३.८)

**५**. विवेशा३ (मा.सं.२३.४९)

**६**. अधःस्विदासी३त् (मा.सं.२३.७४)

७. उपरि स्विदासी३त् (मा.सं.३३.७४)

संहितेमध्ये या सात ठिकाणी असणारी पदेच **प्लुत** होत. या व्यतिरिक्त प्लुतयुक्त पद नाही. असे या.शि. मध्ये म्हटले आहे.

१.'क्रतो स्मर' याठिकाणी 'क्लिबे स्मर' याठिकाणी प्लुत आहे असे वाटते. अशा प्रसंगी दोन उदाहरणात मोठा विरोध जाणवेल. परंतु प्रातिशाख्यामध्ये क्रतो स्मर/ क्लिबे स्मर (मा.सं.४०.१५) या दोनही ठिकाणी प्लुत सांगितलेला नाही.

२. लाजी३न्, शाची३न्- ही दोन उदाहरणे स्वतंत्र परिगणित केलेली आहेत.

३. क्रतो स्मर, क्लिबे स्मर या दोनही ठिकाणी प्रारंभी ॐ३कार स्वीकारलेला आहे. शुक्लयजुर्वेदप्रातिशाख्यात ४.५०-५४ देखील प्लुताची सातच ठिकाणे सांगितली आहेत. ज्यांचे परिगणन वर केले आहे त्या सातच ठिकाणी प्लुतत्व आहे.

**लृकाराचे दीर्घत्व नाही-**

**लृकारस्य तु दीर्घत्वं नास्ति वाजसनेयिनः ।**

वाजसनेयिशाखेनुसार 'लृ'काराचे दीर्घत्व (संहितेत) नाही. (संहितेत दीर्घ लृकार असणारे उदाहरण नाही.)

या श्लोकात 'वाजसनेयि' पद आल्याने त्या पदाबद्दलचा विचार टीकेत आला आहे.

वाजस्य अन्नस्य सनि: दानं यस्य स: वाजसनि: तदपत्यं वाजसनेय: याज्ञवल्क्य:। जो अन्नाचे दान करतो तो **वाजसनि** होय आणि त्याचे अपत्य म्हणजे **वाजसनेय** होय. याज्ञवल्क्यांना उद्देशून हे पद वापरले आहे.

**२३. नैतत् स्वरितपूर्वाङ्गे नापराङ्गे कथञ्चन।**
**न स्वरे न च मात्रायां कथं स्वारो विधीयते।।२३।।**

(व्यंजनांचे द्वित्व किंवा संयोग (जोडाक्षर) असेल त्यावेळी उदात्तादि स्वर त्या जोडाक्षराच्या कोणत्या अवयवावर (उदात्तादि प्रयुक्त हस्तचालन) असावा या संबंधी विचार पुढे आला आहे.)

(हस्तचालनद्वारा) स्वरयुक्त वर्णाच्या पूर्वांगात स्वर दाखविणे योग्य नाही, त्याच प्रमाणे हे स्वर देणे पुढच्या अंगावरही शक्य नाही. हे स्वर देणे वर्णातही नाही आणि मात्रेतही (स्वरभक्तीत) नाही तर स्वर कशाप्रकारे दिला जावा.

**स्पष्टीकरण**– या श्लोकात **स्वरित** असा उल्लेख आला आहे. त्याचा अर्थ उदात्तादि स्वरविशिष्ट वर्ण (स्वराने युक्त असा वर्ण) असा आहे. 'स्वर' हा शब्द तारकादि गणातील असल्याने 'तारकादित्वादितच्' (पाणि. ५.२.३६) सूत्रानुसार 'इतच्' प्रत्यय लागून शब्द बनला आहे. स्वर+इतच् याचा अर्थ उदात्तादि स्वरविशिष्ट वर्ण असा आहे.

द्वित्व झालेल्या किंवा जोडाक्षर असणाऱ्या वर्णाबाबत जोडाक्षरातील पूर्व व्यंजन अगोदरच्या स्वराचे अंग बनते. म्हणूनच उदात्तादी स्वर दाखविणे (हस्तचालनद्वारा) दोन्ही पैकी कोणत्याही ठिकाणी दाखविणे अवघड आहे. अशा प्रसंगी स्वर दाखवताना हस्तचालन पूर्ववर्णावर व्हावे की उत्तरवर्णावर व्हावे हा प्रश्न निर्माण होणे साहजिकच आहे. 'मात्रा' याचा अर्थ स्वरभक्तीमध्ये विहित मात्रा असा आहे. 'देवम्बर्हिः' या ठिकाणी स्वरभक्ती आहे अशा प्रसंगी देखील हस्तचालनद्वारा स्वर कसा दाखवावा हाही प्रश्न आहे. यासंबंधातील प्रश्न–

१. व्यंजनांचे द्वित्व किंवा जोडाक्षर असताना हस्तचालनद्वारा स्वर कोणत्या वर्णावर दाखवावा.

२. स्वरभक्तीच्या प्रसंगी स्वर कोणत्या वर्णाचे ठिकाणी दाखवावा.

**२४. पराङ्गस्य तु यत्पूर्वं पूर्वाङ्गस्य तु यत्परम्।**
**उभयोरर्द्धसंयोगे स्वारङ्कुर्याद्विचक्षणः।।२४।।**

पुढील अंगभूत वर्णाचा पूर्व आणि मागील अंगभूत वर्णाचा जो पर दोहोंच्या अर्धसंयोग (पूर्वार्ध-अपरार्ध संयोग) या ठिकाणी निपुण वैदिकाने उदात्तादि स्वर दाखवावेत.

**स्पष्टीकरण- उदाहरण**




या उदाहरणात **स्** हा पुढील **त्** या वर्णाचा पूर्व आहे तसेच मागील अंगभूत वर्णाचा पर आहे म्हणून या ठिकाणी स्वर देण्यास सांगितले आहे.

शुक्लयजुर्वेदप्रातिशाख्यात पूर्वस्वराचे अंग कोणती व्यंजने बनतात हे सांगितले आहे.

त्यानुसार- संयोगादि: पूर्वस्य (शु.य.प्रा.१.१०२)

यमश्च (शु.य.प्रा.१.१०३)

क्रमजश्च (शु.य.प्रा.१.१०४)

(क्रमजोत्तर) तस्माच्चोत्तरं स्पर्शे (शु.य.प्रा.१.१०५)

अवसितं च (शु.य.प्रा.१.१०६)

हे वर्ण पूर्व स्वराचे अंग बनतात.

**१. संयोगादि**- अ**श्**श्वं: (मा.सं.२४.१) या उदाहरणात संयोगादि **श्** पूर्वीच्या उदात्त **अ** चे अंग आहे. तसेच शेष श्, व् ही व्यंजने उत्तरवर्ती स्वरित **अ** ची अंगे आहेत. अर्थात पूर्व शकारच्या उच्चारणानंतर स्वरित प्रदर्शक हस्तचालन करावे.



**२. यमवर्ण**- यमवर्ण पूर्व वर्णासोबत पूर्व स्वराचे अंग बनतो. उदा.-

रुक्क्मः (मा.सं.१२.१)
↓
यम

या उदाहरणात **म** वर्णाला अव्यवहित (जोडून असलेला) पूर्वीचा **क्** यमसंज्ञक होय. हा यमसंज्ञक वर्ण पूर्वीच्या ककारासह पूर्वीच्या अनुदात्त 'उ' चे अंग बनेल. म्हणूनच रकारापासून यमवर्णापर्यंत **अनुदात्त** स्वराचे हस्तचालन करून मकाराच्या अर्धोच्चारणानंतर उदात्त प्रदर्शन करावे.

र् + उ + क् + क् + म् + अ
अनुदात्त स्वराचे प्रदर्शन — उदात्त
यम

**३. क्रमज**– यामध्ये जोडाक्षरातील दुसरा वर्ण हा देखील पूर्व स्वराचे अंग बनतो. त्या नंतर येणारा वर्ण सुद्धा पूर्व स्वराचे अंग बनतो.

उदा. पाष्ण्र्या – मा.सं.२५.४०

प् + आ + र् + ष् + ण् + ण् + य् + आ
↓ पूर्वस्वर
↓ नंतर येणारा वर्ण
जोडाक्षरातील दुसरा वर्ण पूर्व स्वराचे अंग बनणार

या ठिकाणी संयोगादी वर्ण **रेफ** होय, क्रमज **ष्** वर्ण होय. क्रमजानंतर येणारा पूर्व 'ण'कार हे सारे पूर्व स्वराचे अंग होत.**र्, ष्, ण्** हे तीन वर्ण पूर्व स्वराचे अंग बनतात. तसेच उत्तर 'ण'कार, यकार हे परस्वराचे अंग आहेत. म्हणून पर ण् काराचे उच्चाराचे वेळी परस्वराप्रमाणे स्वरप्रदर्शन होईल.

**पाष्ण्र्या**– (मा.सं.२५.४०) या मध्ये ण् काराचे द्वित्व 'ऊष्मान्तस्थाभ्यश्च स्पर्श:' (शु.य.प्रा.४.१०३) या सूत्राने सांगितले आहे. ऊष्म तसेच अन्त:स्थ (समस्त), दोन्ही किंवा दोहों पैकी एक (व्यस्त) या दोनही प्रकारांच्या वर्णानंतर येणाऱ्या स्पर्श वर्णाचे द्वित्व होते. 'नास्वरपूर्वा ऊष्मान्तस्था:' (शु.य.प्रा.४.१०६) या नियमानुसार ण् काराच्या द्वित्वाला ऊष्म किंवा अन्तस्थ निमित्ताने अडथळा येत नाही. कारण पाष्ण्र्या या उदाहरणात र् अन्तस्थ तसेच ष् (ऊष्म) दोन्ही पण समस्तरूपाने असतानाही त्यांच्या पूर्वी स्वर असल्याने **ण्** काराचे **द्वित्व** झाले.

परंतु 'रेफहकाराभ्याम्' (शु.य.प्रा.४.१०१) सूत्राने 'ष्' चे द्वित्व व्हायला हवे पण या ष् पुढे **ण्** हा स्पर्श वर्ण आला आहे त्यामुळे ष् चे द्वित्व झाले नाही. यैस्तु परं तैर्न पूर्वम्– (शु.य.प्रा.४.१०४) या सूत्राने विधान केले आहे. म्हणून पाश्श्र्वम् किंवा पाश्श्र्व्यम् या ठिकाणी शकाराचे द्वित्त्व झालेले आहे कारण ऊष्म्याच्या पुढे स्पर्श वर्ण आलेला नाही, **व्** हा स्पर्श वर्ण नाही. संहितेत पार्ष्ण्या हा देखील एक ण कार असलेला पाठ उपलब्ध आहे. 'नास्वरपूर्वा ऊष्मान्तस्था:' या सूत्राच्या उदाहरणरूपात याचा निर्देश केला आहे.

असे वाटते की व्यस्त निमित्त मानून 'ष्' आणि 'ण्' यांच्या द्वित्वाची प्रवृत्ती न मानता द्वित्वरहित रूप पार्ष्ण्या हा निर्देश उपपन्न होऊ शकतो. कारण स्पर्श (ण्) याच्या द्वित्वामुळे 'ष्' चे द्वित्व होऊ शकत नाही. त्याचप्रमाणे ण् चे द्वित्व झाले नाही कारण ण् च्या द्वित्वाला निमित्त असणाऱ्या ष् च्या पूर्वी र् असल्याने अर्थात पूर्वी स्वराभाव असल्याने ष् हा ण् च्या द्वित्वाला कारण बनू शकत नाही. त्याचप्रमाणे पाष्ण्र्या (द्विषकारकरूप) सुद्धा सिद्ध होऊ शकते कारण **र्** च्या पुढे ष् असल्याने तो **र्** ष् च्या द्वित्वाला कारण बनू शकतो. याठिकाणी हे लक्षात ठेवणे आवश्यक आहे की 'पाष्ष्ण्र्या' या रूपात दोन **ष**कार असल्याने दोन **ण**कार होऊ शकणार नाहीत कारण **ण्** स्पर्श वर्णाचे द्वित्व केल्यास त्याला निमित्त असणाऱ्या **ष्** चे द्वित्व होऊ शकणार नाही.

**पाष्ष्ण्यर्या**– (द्विषकारक) या रूपात रेफ, दोन षकार पूर्व स्वराचे अंग बनतात. कारण क्रमजोत्तर (द्वितीय षकार) याच्यापुढे स्पर्श वर्ण आहे हा क्रमजोत्तर वर्ण पूर्व स्वराचे अंग बनतो.

तस्माच्चोत्तरं स्पर्शे (शु.य.प्रा.१.१०५)

**पाष्ण्यर्या**– द्वित्वहीन रूपात **रेफ** आणि **षकार** हे पूर्वस्वराचे अंग होतील कारण ष् कारानंतर स्पर्श वर्ण असल्याने तो षकार पूर्वाङ्ग होतो.

स्पर्श **ण्** तसेच **य्** वर्ण हे पुढील स्वराचे (**अच्**) चे अंग होतात.

पाष्ष्ण्यर्या– पार्ष्ष्+ण्या

पाष्ण्यर्या– पार्ष्+ण्या

पाष्ण्ण्यर्या– पार्ष्ण्+ण्या

४. **अवसित**– अवसित म्हणजे अन्त्य वर्ण. उदा. वाक् (मा.सं.१८.२) अन्त्य क् हा वर्ण अवसित असल्याने पूर्व स्वराचे अंग बनतो.

व्यंजन पूर्वस्वराचे अंग असो किंवा परस्वराचे (पारिशेष्यात्) अंग असो जे व्यंजन ज्या स्वराचे अंग बनते त्या (उदात्तादि) स्वराने युक्त ते बनते.

व्यंजनं स्वरेण सस्वरम् (शु.य.प्रा.१.१०७) तसेच स्वर उच्चः..... (याज्ञ.शि.२.२९) यावरून हे स्पष्टहोते.

**२५. संयोगे तु परं स्वार्यं परं संयोगनायकम्।**
**संयुक्तस्य तु वर्णस्य न स्वार्यं पूर्वमक्षरम्।।२५।।**

संयोगामध्ये पराङ्गव्यंजन हे स्वरयुक्त करावे कारण ते प्रमुख असते. संयुक्त अक्षरातील पूर्व (व्यंजन)अक्षराचे स्वरयुक्त उच्चारण करणे योग्य नाही. (स्वार्यं कुर्यात्=स्वरयुक्तं कुर्यात्) व्यंजनाच्या संयोगामध्ये पूर्वाङ्गत्व पराङ्गत्व निश्चित केल्यानंतर स्वराचा अवधी आणि आरंभ बिंदू निश्चित करणे आवश्यक आहे. यावर निर्णय असा केला आहे की–

१. परस्वराशी अंगभूत व्यंजनसमूह पुढील स्वराच्या गुणधर्माप्रमाणे उच्चारित करावा.

२. संयुक्तवर्णातील पूर्व अक्षराचे स्वरासहित उच्चारण करू नये. अर्थात पूर्व व्यंजनाचे पर स्वरासहित उच्चारण करू नये. कारण पूर्वाङ्गव्यंजन पूर्वस्वरासहित उच्चारित होऊन विरत (थांबले गेले) आहे. प्रकरणानुसार हे ग्राह्य आहे अन्यथा पूर्व अक्षर आपल्या स्वरासहित उच्चारित होणारच आहे.

## २६. अवग्रहे पदच्छेद उदात्तो दृश्यते यदि।
## स्वरान्तं स्वरितं प्राहुः सन्धौ तु स्वार्यते परम्।।२६।।

**अवग्रह असताना** (समास इत्यादींमधील पदप्रकृति दाखवताना केलेला विच्छेद) **पदच्छेद असताना** (संहितापाठाचा पदपाठ असताना) स्वरित स्वर पुढे असणारा उदात्त वर्ण (पदात) असताना, उदात्त स्वराच्या अंती असणारे व्यंजन संहितेच्यावेळी पुढील स्वरित स्वराने युक्त मानले जाते. कारण संधी झाल्यानंतर परस्वरवर्णाचा स्वर उच्चरित होतो.

**स्पष्टीकरण–**

**अ.** **१.** पदपाठाचे वेळी

**२.** समासादीं मध्ये (विशिष्ट पदांत) पदप्रकृति दाखविताना

**३.** सुबन्त पदांमध्ये प्रकृति–प्रत्यय दाखविताना

४. स्वादिष्वसर्वनामस्थाने (पा.सू. १.४.१७) या सूत्राने प्रयुक्त पद संज्ञेच्या ठिकाणी

**५.** प्रकृतीत दीर्घ न होण्याच्या स्थितीत

**६.** दोन पदांतील संधींचा अभाव असताना (प्रगृह्याचेवेळी) अशा प्रसंगी अवग्रह नावाचा विराम होतो.

**आ.** संहितायुक्त पदांचा विच्छेद केल्यानंतर पदपाठातही विराम असतो.

वरील श्लोकात उदात्त- स्वरित या स्वरांचा उल्लेख सामान्यपणे केलेला आहे. उदात्तानंतर स्वरित आला असताना संहितेत मध्ये स्वरिताचेच उच्चारण होईल.

संधी होताना स्वराच्या नंतर परवर्णाचा जो स्वर आहे तोच विग्रहातही असतो. पदच्छेदाचे वेळी कदाचित अंतिम व्यंजन पूर्व स्वराचे अंग बनले तरी संहिते मध्ये मात्र पुढील स्वराचेच ते अंग बनते.

उदा. समिद्धऽ इति **सम्**।-इद्धः (मा.सं.२९.१)

या ठिकाणी **सम्** उदात्त होय. **इ**द्धः मधील **इ** स्वरित आहे. पदच्छेदात **म्** व्यंजन स मधील अ चे अंग आहे. परंतु सम्+इद्धः - यांचा संधी झाल्यानंतर **म्** इ चे अंग होऊन त्याचेही उच्चारण स्वरितयुक्तच होईल.

उत् । एनम् (मा.सं.१७.५०)

= उदैनम् - परस्वराचेच उच्चारण होईल.

**२७. स्वरसन्धिविधानेन नीचोच्चत्वं विधीयते।**
**व्यञ्जनाद्वा स्वराद्वापि तत्सन्धौ स्वर उच्यते।।२७।।**

(उदात्त, अनुदात्त हे धर्म स्वरांचेच आहेत तरी व्यंजनाला स्वरत्व येते) स्वरसंधीच्यावेळी नीचता (अनुदात्तता) आणि उच्चता (उदात्तता) यांचे विधान केले जाते. हे विधान व्यंजन आणि स्वर हे पुढे असतानाही केले जाते म्हणून संहिते मध्ये **सर्व वर्णांनाच स्वर म्हटले आहे.**

**स्पष्टीकरण**- उदात्तत्व आणि अनुदात्तत्व हे स्वरांचेच धर्म आहेत अशा वेळी व्यंजनांना उदात्तादींचे विधान उपपन्नच होत नाही असे दिसते परंतु वरील श्लोकानुसार **शुद्धस्वरांचे** आणि **व्यंजनव्यवहित** स्वरांनाही स्वर म्हणता येते. संधींमध्ये यांना स्वर म्हणणे प्रातिशाख्यसंमत आहे असे म्हणावे लागेल.

**स्वरसंधी** मध्ये व्यंजने आणि स्वर यांच्या पुढे येणाऱ्या सर्वच अक्षरांना उदात्तत्व, अनुदात्तत्व हे गुणधर्म सांगितले आहेत.

१. प्रागुवर्णादक्षराणामेकीभाव:- (शु.य.प्रा.४.१३०) या ठिकाणी अक्षरांचा एकीभाव सांगितला आहे.

२. उदात्ताच्च। (शु.य.प्रा.४.१३५) या सूत्राने व्यंजनव्यवहित अशा स्वरांशी संधीही सांगितला आहे.

३. 'सव्यञ्जन: सानुस्वार:, शुद्धो वापि स्वरोऽक्षरम्'। व्यंजनसहित, अनुस्वारसहित किंवा शुद्ध असा स्वर म्हणजे **अक्षर** होय.

**२८. दुर्बलस्य यथा राष्ट्रं हरते बलवान् नृप:।**
**एवं व्यञ्जनमासाद्य अकारो हरति स्वरम्।।२८।।**

(व्यंजने ही स्वरांची अंगे होत.)

जसे बलवान् राजा दुर्बल राजाच्या राष्ट्राचे हरण करतो तसेच अकार (कोणताही स्वर) व्यंजनास प्राप्त करून (पकडून) त्याला स्वराकडे खेचून घेतो.

या श्लोकात 'अकार' असे पद वापरले आहे, हे पद सर्व स्वरांचे उपलक्षण होय. व्यंजन ज्या स्वराचे अंग होते त्या स्वराप्रमाणे ते बनते.

**२९. स्वर उच्च: स्वरो नीच: स्वर: स्वरित एव च।**
**स्वरप्रधानं त्रैस्वर्यं व्यञ्जनं तेन सस्वरम्।।२९।।**

मागील विचाराचेच अधिक स्पष्टीकरण-

स्वर उच्च (उदात्त) असतो, स्वर नीच (अनुदात्त) असतो आणि स्वर हा स्वरित देखील असतो. हा तीन स्वरांचा समूह (त्रैस्वर्य) स्वरवर्ण प्रधान आहे म्हणूनच त्याच्या आश्रयाने असणारे व्यंजन सुद्धा त्याच्या सह (उदात्तादी) स्वरासह युक्त होते.

**३०. मणिवद् व्यञ्जनान्याहु: सूत्रवत् स्वर इष्यते।**
**व्यञ्जनान्यनुवर्तन्ते यत्र तिष्ठति स स्वर:।।३०।।**

व्यंजने ही मण्यांप्रमाणे आहेत असे (आचार्य) म्हणतात. स्वर सूत्राप्रमाणे होत म्हणून ज्या ठिकाणी स्वर दाखवला जातो त्या ठिकाणी व्यंजने स्वरांचे अनुवर्तन करतात. (त्या स्वरांसोबतच ती व्यंजनेही राहतात.)

माळेमध्ये मणी सूत्राधीन असतात त्याप्रमाणे व्यंजने स्वराधीन असतात.

**३१. उदात्तं नानुवर्त्तेत नीचं न स्वरितं तथा।**
**विस्वरं तं विजानीयाद् दीर्घह्रस्वविवर्जितम्।।३१।।**

जो वर्ण उदात्त, अनुदात्त तसेच स्वरिताचे अनुवर्तन करीत नाही तसेच ह्रस्व, दीर्घ इत्यादींनी रहित असतो. त्या वर्णास (व्यंजनास) स्वर रहित जाणावे.

अर्थात व्यंजन हे उदात्तादी स्वरांनी दाखवू नये, व्यंजनाला कोणताही स्वर नसतो.

१. व्यंजने ही ह्रस्व, दीर्घ, प्लुत रहित असतात कारण ह्रस्व, दीर्घ, प्लुत हे स्वरांचेच गुणधर्म आहेत.

२. जे व्यंजन कोणत्याही स्वराचे अंग बनून उदात्तादि स्वरांचे अनुवर्तन करीत नाही, अशा व्यंजनांना कोणताही स्वर नसतो.

**३२. हरिं–वरुंण–वरेंण्याश्च धारां–पुरुंषौ तथा।**
**विश्वानरं विहायैकं शेषा रस्वरिता नराः।।३२।।**

(पदातील विशिष्ट व्यंजनाच्या आधारे स्वरनियम)

हरि, वरुण, वरेण्य, धारा, पुरुष आणि विश्वानर मधील नर शब्द सोडून शिल्लक राहिलेल्या इतर नर शब्दातील **र** स्वरित असतो (अर्थात या पदातील रेफाने युक्त अच् स्वरित असतो)

**हरि**– मती योजान्विन्द्रते हरीं (मा.सं.३.५१)

हरिवान्नऽइन्द्रः (मा.सं.२०.३९)

**वरुण**– व्वातस्य जूतिं व्वरुणस्य (मा.सं.१३.४२)

**वरेण्य**– तत्सवितुर्व्वरेण्यम्भर्गोदेवस्य (मा.सं.३.३५)

**धारा**– घृतस्य धाराः (मा.सं.१७.९३,९५,९६,९७)

**पुरुष**– पुरुषऽएवे दं (मा.सं.३१.२)

इत्यादी ठिकाणी रेफ विशिष्ट अक्षर असल्याने ते स्वरित होते.

**अपवाद**–

विश्श्वानराय– व्विश्श्वानराय व्विशश्वाभुवें (मा.सं.३३.२३)

या ठिकाणी विश्श्वानर पदातील घटक यातील **नर** यातील रेफविशिष्ट अक्षराचे स्वरितत्व झाले नाही. परंतु व्विश्वेन्नरः (मा.सं.२७.२३) याठिकाणी **नर** मधील र स्वरित आहे.

**३३. द्वौ वरुणौ वस्वरितौ उदुत्तमँ त्वँ–व्वरुणौ।**
**धाकारे चोरुधारायां तथा धारे च दोहने।।३३।।**

(**वरुण** आणि **धारा** शब्दातील रेफ स्वरित असतो परंतु त्याला काही अपवाद आहेत)

(वरील नियमाला) दोन **वरुण** शब्द आणि ऊरु**धारा** आणि दोहन संबंधी धार शब्द अपवाद आहेत.

वरुण मधील **व** स्वरित आहे तर धारा आणि धार शब्दातील धा स्वरित आहे.

**व्वरुण**– त्वँ व्वरुण (मा.सं.३.३२)

उदुत्तमँ व्वरुण (मा.सं.१२.१२)

यातील वकार स्वरित आहे.



**ऊरुधारा**– धुक्ष्वोरुधारा पयस्वती (मा.सं.८.४२)

**धारा**– धा॑रया मा॒ नमो॑भिः (मा.सं.१७.९०)

वरील उदाहरणातील धा॑ स्वरित आहेत.

**दोहन वाचक धार शब्द**– व्वसोः॑ प॒वित्र॑मसि श॒तधा॑रँ॒

व्वसोः॑ प॒वित्र॑मसि स॒हस्र॑धारम्

श॒तधारेण सु॒प्प्वा॒ (मा.सं.१.३)

दोहन कर्मात विनियुक्त मन्त्रातील 'शतधा॑र' शब्दातील 'धा' वर्ण स्वरित होतो. 'सहस्रधार' मधील धा वर्ण स्वरित होत नाही, म्हणूनच श्लोकात 'दोहने' पद वापरले आहे. दोहनाशी शतधार शब्दाचा संबंध आहे मात्र सहस्रधार शब्दाचा तसा संबंध नाही. दोहने पद कारिकेत असल्यामुळेच शतधार मधील 'धा' हाच स्वरित होईल. सहस्रधार मधील धा स्वरित होणार नाही.

**३४. प्रथमा यत्र दृश्यन्ते सन्धिस्थानेषु पूर्वतः।**
**स्ववर्गीयेण संयुक्ता मोक्षं तत्र न कारयेत्।।३४।।**

(अनेक व्यंजनांचा संधी होत असताना एकाचा उच्चार करून दुसऱ्या वर्णाचा उच्चार करताना स्वभावतः स्थान/करण यांचा विमोक, प्रयत्नभेद होऊ शकतो. परंतु समानवर्णांच्या संहितेत असा भेद होत नाही.)

ज्या (द्विरुक्ती इत्यादी) संधिस्थानाच्या ठिकाणी प्रथम वर्ण (वर्गीय प्रथम वर्ण क्,च्,ट्,त्,प्) आपल्या वर्गीय वर्णाशी संयुक्त होत असेल आणि पूर्व स्वराचे अंग होत असेल त्या ठिकाणी (समान स्पर्श वर्णांच्या मध्ये) (स्थान करण यांचा) संहिता मोक्ष करू नये. (मधेच सोडू नये. दोन्ही वर्णांचे उच्चारण झाल्यानंतरच मोक्ष करावा.)

सम्म्य**क्क्**स्रवन्ति (मा.सं.१३.३८)

आ**च्च्**या (मा.सं.१९.६२)



व्व**द्द**सूर्ष्व (मा.सं.३३.४०)

तत्त्सूर्व्वस्य (मा.सं.३३.३७)

अनुष्टुप्प्शारदी (मा.सं.१३.५७)

वरील उदाहरणांमध्ये प्रथम वर्ण क्,च्,ट्,त्,प् यांचा स्ववर्गीय वर्णांचा संयोग आहे. म्हणून प्रथम ककारादी यांच्या ठिकाणी स्थान व प्रयत्न सोडणे योग्य नाही.

तात्पर्य– स्थान आणि करण समान असणाऱ्या दोन वर्णांचे उच्चारण एकाच प्रयत्नाने करावे. एका वर्णाच्या उच्चारानंतर दुसऱ्या वर्णाचाही उच्चार त्याच प्रयत्नाने करावा. दोन समान स्पर्श वर्णाच्या मध्ये प्रयत्न भेद करू नये.

काही ठिकणी 'मोक्षं कुर्वीत' असा पाठ आहे. अशा वेळी स्ववर्गीय वर्णाच्या संयुक्त वर्णांचा उच्चार झाल्या नंतर प्रयत्न भेद करावा. समान स्पर्श वर्णांच्या मध्ये प्रयत्न भेद करू नये, असा अर्थ करावा लागेल.

समान स्पर्शवर्ण असताना दुसऱ्या स्पर्शवर्णाच्या उच्चारणानंतर **स्थानकरणमोक्ष (प्रयत्न भेद) करावा. दोन स्वतंत्र वर्ण असताना प्रयत्नभेद स्वाभाविक आहे.**

दोन वर्णांचे उच्चारण करताना प्रयत्नभेद करायचे नसल्याने पूर्व वर्णाची श्रुती होत नाही कारण स्थान आणि करणाचा विच्छेद या ठिकाणी नाही. वर्णरत्नप्रदीपिकेमध्ये या विषयी म्हटले आहे.

स्ववर्गीयैस्तु संयोग: स्पर्शानां सम्भवेद् यदि।
तत्पूर्वस्य श्रुतिर्नास्ति विरामव्यञ्जनस्य च।। (व.र.प्र.शि.१८७)

**३५. तकारन्ते पदे पूर्वे चवर्गे परत: स्थिते।**
**मोक्षं तत्र न कुर्वीत 'षच्च शेषे' निदर्शनम्।।३५।।**

अगोदर तकारन्त पद असताना आणि पुढे चवर्गीय व्यंजन आले असता (संधीच्या वेळी) स्थान करण मोक्ष करू नये. षच्च शेषे हे याचे उदाहरण होय.

**अ.** पूर्वीचा (३४) श्लोक आणि प्रस्तुत (३५) श्लोक यांच्यातील विशेष पुढीलप्रमाणे दिसतो. ३ ४व्या श्लोकात समानवर्ण (क् क् या प्रकारे) असताना दोन्ही समानवर्णाचा संबंध एकाच पदात होता (आ**च्च्या**)

**आ.** परंतु या श्लोकामध्ये (३५) दोन पदांतील समानवर्णांचा संबंध सांगितला आहे. (यत्+च) दोन भिन्न पदांतील समान वर्ण असतानाही स्थान-करणाचा मोक्ष करू नये असे या श्लोकात सांगितले आहे. अर्थात दोन पदे असताना एकावेळी उपस्थित दोन समान वर्णांचा समान स्थान करण असणाऱ्या एका प्रयत्नानेच उच्चारण करायला हवे. प्रयत्नभेद करू नयेत. यत्+च=यच्च दोन पदांतील च्च हे समान वर्ण उच्चारताना प्रयत्नभेद केला नाही. श्लोकामध्ये **त्** वर्गीय वर्णाचा च् वर्गीय वर्णाशी संधी होताना त वर्गीय व्यंजनाच्या ठिकाणी च वर्गीय व्यंजन येते. ३५ व्या श्लोकासंबंधात पाठभेद दिसून येतो.

तकारान्ते पदे पूर्वे चकारे परत: स्थिते।
मोक्षं तत्राऽपि कुर्वीत यच्चं शेषे निदर्शनम्।।

'शिक्षासङ्ग्रह:'- श्रीरामप्रसाद त्रिपाठी, सम्पूर्णानंद संस्कृतविश्वविद्यालय या ठिकाणी वरील पाठ स्वीकारला आहे.

यच्च शेषे- यामध्ये यत् हे तकारन्त पद पूर्वी आहे आणि च पदातील चकार पुढे आला आहे. अशा वेळी मोक्षं तत्रापि कुर्वीत याचा अर्थ पदद्वयातील समान वर्णद्वयाच्या (च्च) उच्चारणानंतर भिन्न प्रयत्नाने उच्चारण करावे.

वर्ण्णं द्विवर्णसंयोगे एकवर्णवदुच्यते।
स्वरमध्ये सजातीये विजातीये द्वयो: श्रुति:।। (व.र.प्र.शि.१८३-१८४)

या श्लोकात वरील विचार अधिक स्पष्ट झाला आहे. शिक्षासंग्रहात चवर्गे ऐवजी चकार परे असा पाठ घेतला आहे, या संबंधात चवर्गे हा पाठ योग्य आहे कारण यज्जाग्रतो...

यत्+जाग्रतो च वर्गातील ज् पुढे असतानाही प्रयत्नभेद करू नये हा आशय अधिक योग्य आहे.

दोन पदद्वयातील देखील समानवर्णद्वयाचा संधी झाला असता संयोगादि वर्णाच्या ठिकाणी स्थानकरण विमोक्ष करू नये याची इतर उदाहरणे टीकेत दिली आहेत.

युङ्ङःसि (मा.सं.१०.२५)

तद्देवानाम् (मा.सं.३३.१७)

स्थान आणि करण यांच्यातील भेद किंवा प्रयत्न भेदामुळेच भिन्न श्रवण होते. ज्या वेळी स्थान करण आणि प्रयत्न समान असताना वर्णांचे उच्चारण होत असेल तर दोन वर्ण असतानाही त्यांचे उच्चारण एकाच वर्णाप्रमाणे जाणवते आणि अशा वेळी संयोगादी वर्णातील उत्तर वर्णाचे श्रवण होते. कारण त्या उच्चारणानंतर त्या प्रयत्नाचे अवसान होते आणि प्रयत्नभेद होतो.

शु.य.प्रा.(४.१४२) द्विवर्णमेकवर्णवद्धारणं स्वरमध्ये समानपदे। या सूत्राच्या व्याख्येत उवटाचार्यांनी म्हटले आहे की 'समानपद' म्हटल्याने संहिता लक्षित होते. पदविच्छेदात एकवर्णवद् धारणा होत नाही, कारण पदविच्छेद केला असता त्याठिकाणी दोन वर्णांच्या मध्ये अर्धमात्रा कालिक विराम होतो. उदा.- इमम् मे (मा.सं.२१.१) इत्यादी ठिकाणी दोन पदांमध्ये विराम असल्याने एकवर्णवद् धारणा झालेली नाही.

समानपदग्रहणेन च संहिता लक्ष्यते।
पदविच्छेदे (धारणा) न भवति यथा इमम् मे।। (उवटभाष्य)

दोन वर्णांची एका वर्णाप्रमाणे समान धारणा त्याच वेळी शक्य आहे की ज्या वेळी दोन वर्णांचा विरामाशिवाय एकच प्रयत्न उच्चारणासाठी असेल. 'स्पर्शान्तस्य' (शु.य.प्रा. १.९०) या सूत्रानुसार अन्य अक्षराने पुढील पदाचा प्रारंभ करावा अन्यथा (संहितापाठात) पदादि वर्णाचे द्वित्व होते.



उदा.- तत्। नः (मा.सं.३३.३८)

दोन पदे भिन्न असल्याने **त्** नंतर विराम असल्याने अन्य प्रयत्नाने **न्** चे अन्त्य श्रवण झाले आहे. परंतु संधी केल्यानंतर मात्र दोन व्यंजनातील **तन्नो** मित्रो व्वरुण (मा.सं.३३.४२) समान उच्चारण ऐकायला येते. तसेच

'व्यञ्जनान्तस्य मोक्षः स्यात् करणस्थानतः पदे।

अन्यदन्यप्रयत्नेन पदमारभते बुधैः अन्यथा तु पदादौ च द्वित्वमापद्यते।।

उदा. सं य्यौमि (मा.सं.१.२२)

सँव्वपामि (मा.सं.१.२१)

इमम्मे (मा.सं.२१.१)

**३६. ककारान्ते पदे पूर्वे सकारे परतः स्थिते।**
**ख सवर्णं विजानीयात् 'भिषक्क्सीसे' निदर्शनम्।।३६।।**

(काहींच्या मते श, ष, स, र वर्ण पुढे आला असता प्रथम वर्ण द्वितीय वर्णरूप धारण करतात.) ककारान्त पद पूर्वी असताना आणि सकार पुढे असताना **ख्** प्रमाणे समान वर्णाची आपत्ती जाणावी. (याविषयी) भिषक्कसीसे... हे उदा. होय.

**३७. टकारान्ते पदे पूर्वे सकारे परतः स्थिते।**
**ठ सवर्णं विजानीयात् 'सम्राट्ट्सम्भृत' दर्शनम्।।३७।।**

टकारान्त पद पूर्वी असताना आणि सकार पुढे असताना **ठ्** प्रमाणे वर्णाची (आपत्ती) जाणावी. या विषयी 'सम्राट्ट्सम्भृतो...' हे उदाहरण देता येईल.

**३८. (पकारान्ते पदे पूर्वे सकारे परतः स्थिते।**
**फसवर्णं विजानीयादप्प्स्वग्न इति दर्शनम्।।)**
**पकारान्ते पदे पूर्वे शकारे परतः स्थिते।**
**फ सवर्णं विजानीयादनुष्टुप्प्शारदीति च।।३८।।**

पकारान्त पद पूर्वी असताना आणि सकार पुढे असताना **फ्** च्या समान वर्णाची आपत्ती जाणावी (यासाठी) अप्प्स्वग्ने... हे उदाहरण होय.

पकारान्त पद पूर्वी असताना आणि शकार पुढे असताना **फ्** सारख्या वर्णाची आपत्ती होते हे जाणावे. (याविषयी) अनुष्टुप्प्शारदी हे उदाहरण देता येईल.

**स्पष्टीकरण**– वर्गीय वर्णां पैकी कोणत्याही वर्गातील पहिला वर्ण **पूर्वी** असताना तसेच सकार **पुढे** असताना जो संयोग होतो त्या संयोगात वर्गाच्या प्रथम वर्णानंतर आणि सकारापूर्वी वर्गातील द्वितीय वर्णाची आपत्ती होते असा उल्लेख कारिकेत दिसतो. परंतु यातील उदाहरणे नियमाच्या विपरीत दिली आहे.

**क्** भिषक्क्सीसे – (मा.सं.२१.३६)

**ट्** सम्राट्टसम्भृंतम् – (मा.सं.३९.५)

**प्** अप्प्स्वग्ने – (मा.सं. १२.३६)

**प्** अनुष्टुप्प्शारदीति – (मा.सं.१३.५७)

श्लोकानुसार क्, ट्, प् यानंतर श्, स् आल्यास त्या दोन वर्णांमधे ख्, ठ्, फ् असे आगम व्हायला हवेत. परंतु तशी रूपे या ठिकाणी दिसत नाहीत. यावरून असे दिसते की शौनक इत्यादींची मते माध्यन्दिन शाखेत स्वीकृत नाहीत. शौनकाच्या मतानुसार पंचम वर्ण सोडून कोणत्याही वर्णापुढे आपल्या स्थानाहून भिन्न श्, ष्, स् वर्ण पुढे आले असता पंचमवर्ण सोडून असणाऱ्या वर्गीय वर्णातील द्वितीय वर्णाची आपत्ती होते.

असस्थाने मुदि द्वितीयं शौनकस्य (शु.य.प्रा.४.१२०) शौनकाच्या मतानुसार द्वितीय वर्ण ख्, ठ्, फ् व्हायला हवेत परंतु शौनकाचे मत या उदाहरणात दिसत नाही. आपस्तम्बाच्या मतानुसार समान स्थान असणाऱ्या वर्णांपुढे श्,ष्,स् वर्ण पुढे असताना वर्गद्वितीय वर्णाची आपत्ती देखील माध्यन्दिन शाखेत स्वीकृत नाही. हे पुढील श्लोकात स्पष्ट केले आहे.

**३९+४०. तकारान्ते पदे पूर्वे सकारे परतः स्थिते ।**

**थ सवर्णं विजानीयात् 'तत्सवितुर्न्निदर्शनम्'।।३९।।**

**नैतन्माध्यन्दिनीयानां सस्थानत्वात्तयोर्द्वयोः।**
**सस्थानेऽपि द्वितीयं स्यादापस्तम्बस्य यन्मतम्।।४०।।**

(उदाहरण देऊन शौनक मताचेही निरसन केले आहे.)

त् कारान्त पद पूर्वी असताना सकार पुढे असताना **थ्** सारखा समान वर्णाची आपत्ती जाणावी. (यासाठी) तत्सवितुर् (मा.सं.३.३५) उदाहरण दिले आहे.

हे मत माध्यन्दिनी संबंधी नाही. समान स्थान असणाऱ्या वर्णांच्या पुढे श्,ष्,स् वर्ण पुढे असताना वर्गीय प्रथम वर्णाचे जागी वर्ग द्वितीय वर्ण होतात. आपस्तम्बाचे हे मत आहे, हे मत माध्यन्दिन शाखेचे नाही. (अर्थात माध्यन्दिन प्रातिशाख्य लिहिणाऱ्या कात्यायनादि प्रातिशाख्यकारांचे स्वीकृत मत नाही.)

शुक्लयजुर्वेद प्रातिशाख्यात श्,ष्,स् वर्ण पुढे असताना वर्गीय प्रथम वर्णानंतर वर्गद्वितीयाची आपत्ती होते या शौनकाच्या मताचा उल्लेख केलेला आहे. परंतु हे मत माध्यन्दिन शाखेत स्वीकृत नाही कारण माध्यन्दिनशाखीय यजुर्वेदाच्या पाठामध्ये असे दिसून येत नाही. अन्य शाखांमध्ये जर दिसत असेल तर मान्य होऊ शकेल. हे शिक्षाकारांनी सुचवले आहे. 'अपि' या पदाच्या प्रयोगात हे ध्वनित होते. सांगण्याचे तात्पर्य हे आहे की १.पूर्व श्लोकात जे शौनकाचे मत उद्धृत केले आहे ते देखील उदाहरणांच्या विपरीत असल्याने ग्राह्य नाही. ही अग्राह्यता केवळ माध्यन्दिनशाखेच्या संबंधातच आहे.

**४०अ. ङकारान्ते पदे पूर्वे सकारे परतः स्थिते।**
**कसवर्णं विजानीयात् प्राङ्क्सोम इति दर्शनम्।।**

**आगमाचे विधान**

पूर्वी ङ्कारान्त पद असेल आणि स पुढे असेल तर क् समान वर्णाचा आगम जाणवतो.

उदा. प्राङ्**क्**सोमः

## ४०ब. नकारान्ते पदे पूर्वे सकारे परतः स्थिते।
## तसवर्णं विजानीयात् त्रीन्त्समुद्रान् निदर्शनम्।।

नकारान्त पद पूर्वी असताना आणि सकार पुढे असताना त् समान आगम होतो हे जाणावे. उदा. त्रीन्त्समुद्रान्...

## ४१. नकारान्ते पदे पूर्वे श्मश्रुभिः परतः स्थिते।
## छकारं न प्रयुञ्जीत 'ञ्श' सन्धिं समुच्चरेत्।।४१।।

नकारान्त पूर्वी असताना तसेच श्मश्रुभिः पद पुढे असताना छकाराचा प्रयोग करू नये. तर ञ्श् संधीचे उच्चारण करावे.

आदित्यान् श्मश्रुभिः (मा.सं.२५.१)

या ठिकाणी आदित्याञ्श्मश्रुभिः अशाप्रकारे '**ञ्श्**' संधीचे उच्चारण करावे. **ञ्छ्** असे उच्चारण करू नये.

**स्पष्टीकरण**– शुक्लयजुस् प्रातिशाख्यानुसार हेच सांगितले आहे. शकारे च (शु.य.प्रा.४.९६) या सूत्रानुसार **न्** च्या जागी ञ् होतो आणि श् च्या जागी छ् होत नाही. कारण छत्वाचे विधान 'परश्चास्पर्शपरश्चम्' (शु.य.प्रा.४.९७) सूत्रात केले आहे. स्पर्शवर्ण पुढे नसेल तरच **श्** ला **छ्** होतो.

आदित्यान्+श्मश्रुभिः याठिकाणी श् नंतर **म्** हा स्पर्शवर्ण आला आहे त्यामुळे श् चे छत्व होणार नाही. पाणिनिव्याकरणानुसार 'स्तोः श्नुना श्चुः' (पाणि.८.४.४०) या सूत्रात आदित्या**न्**+**श्**मश्रुभिः– नकाराचा **श**काराशी योग आला असताना न् ला चुत्व होऊन न् चा **ञ्** होईल.

आदित्या**न्**+**श्**मश्रुभिः



ञ्+श्म —— स्तोः श्चुना श्चुः (पा. ८.४.४०)

ञ्+**त्**+श्म —— शि तुक् (पा. ८.३.३१) यासूत्राने त् आगम आणि



शश्छोऽटि (पा. ८.४.६३) या सूत्राने **श्** ला छत्व होणार नाही.

कारण 'श्' हा झय् (वर्गीय पहिले चार वर्ण) वर्णांच्या पुढे आलेला नाही. श् हा ञ् च्या पुढे आहे ञ् ह झय् प्रत्याहारात येत नाही. म्हणून आदित्याञ्श्मश्रुभिः - असाच संधी पाणिनिनुसारदेखील होतो.

**४१अ. नकारान्ते पदे पूर्वे त्वं पदे परतः स्थिते।**
**सकारं न प्रयुञ्जीत 'चिकित्वान्त्वमिदं' यथा।।४१अ।।**

**न**कारान्त पद पूर्वी असेल आणि **त्वं** पद पुढे असेल तर **न्** काराच्या जागी स्कराचा प्रयोग करू नये. चिकित्वान् त्वम् (मा.सं.२९.२५) हे यासाठी उदाहरण आहे.

**स्पष्टीकरण**- शु.य.प्रा. मध्ये चिकित्वान् त्वम् यांचा चिकित्वाँस्तम् असा संधी सांगितला आहे. **न्** काराचा विकार भाव सांगितला आहे. असा विकार ब्राह्मणभागात संधी होताना **चिकित्वाँस्तम्** असा संधी होईल मात्र संहितेमध्ये असे होणार नाही. चिकित्वाँस्तम्- असा संधी सांगणारे सूत्र 'धामञ्छत्रूँश्चिकित्वाँस्त्वम्पूषन्नर्व्वन्निति च। (शु.य.प्रा.३.१४६) वीरेंद्र कुमार वर्मा यांनी आपल्या ग्रंथात हेच सूत्र संदर्भानुसार वेगवेगळ्या प्रकारे स्वीकारलेले आहे व धामन्, शत्रून्, चिकित्वान् त्वम्, पूषन्, अर्वन् यातील **न्** ला विकार होत नाही असे म्हटले आहे. त्यांनी हे सूत्र ''धामञ्छत्रूञ्चिकित्वान्त्वं पूषन्नर्वन्निति च ।'' असे स्वीकारले आहे. संदर्भानुसार हेच योग्य वाटते.

चिकित्वान् त्वम् (मा.सं.२९.२५)
↓
स्—— नुः (शु.य.प्रा.३.१३४)
↓
तथयोः सः (शु.य.प्रा.३.१३६)

उपधाअनुनासिक्य —— अनुनासिकमुपधा प्रागन्तस्थायाः (शु.य.प्रा.३.१३२)
प्राप्त झाला असताना अकारं न प्रयुञ्जीत

(ब्राह्मण भागात असा संधी होतो.)

**४१ब. मकारान्ते पदे पूर्वे सवर्णे पदे परत: स्थिते।**
**मसवर्णं विजानीयाद् इमम्म इति दर्शनम्।।४१ब।।**

मकारान्त पद पूर्वी असताना आणि त्या सारखा वर्ण पुढे असताना म् सदृशवर्ण जाणावा.

इमम् + मे = इमम्मे (मा.सं.९१.१)

**स्पष्टीकरण**- इमम् + मे - या ठिकाणी मोनुस्वार: (पाणि.८.३.२३) सूत्रानुसार म् चा अनुस्वार होऊन 'इमं मे ' असे झाले असते. हा अनुस्वार पदान्ती असल्याने वा पदान्तस्य (पाणि.८.४.५९) सूत्रानुसार विकल्पाने परसवर्ण केल्याने म् चा इमम्मे असे रूप बनते, परंतु परसवर्ण न केल्यास अनुस्वारान्त पद होऊ शकते **इमं मे** असेही रूप व्हायला हवे.

परंतु संहितेमध्ये म् कारन्त पद पूर्वी असताना पुढे त्याचाच सवर्ण असताना अनुस्वार न होता परसवर्ण व्हावा हे या श्लोकातून स्पष्ट होते. वेदांच्या संहितेत सर्वत्र परसवर्णच करावा हे यातून सांगितले आहे.

**४२. वर्णे तु मात्रिके पूर्वे ह्यनुस्वारो द्विमात्रिक:।**
**द्विमात्रिके मात्रिक: स्यात् संयोगाद्यश्च यो भवेत्।।४२।।**




१. दीर्घ अनुस्वार-उदा. ग॒णपतिं॑ हवामहे। (मा.सं.२३.१९)

२. ह्रस्व अनुस्वार- उदा. ता७ंसवितु: (मा.सं.१७.७४)



३. संयोगादि **गुरु** असून द्विमात्रिक नाही. उदा. **स७ंस्थाम्...**

**अनुस्वाराचे भेद**




१. **अनुस्वार**- (प्रातिशाख्याचा विचार)




प्रातिशाख्याचे सूत्र असे आहे 'अनुस्वारो ह्रस्वपूर्वोऽध्यर्द्धमात्रा पूर्वा चार्धमात्रा' (शु.य.प्रा.४.१५०)

२. पूर्व वर्ण दीर्घ असेल तर



**याज्ञवल्क्यशिक्षेप्रमाणे अर्थ–**

सूत्रात**अध्यर्द्धा** पद वापरले आहे. या पदाचा अर्थ शिक्षावल्ली या टीकेत सार्ध द्विमात्रिक २$^{१}/_{२}$असा केला आहे असे मानल्यास अनुस्वाराची $^{१}/_{२}$मात्रा आणि पूर्ववर्ती वर्णाची २$^{१}/_{२}$मात्रा मिळून तीन मात्रा होतात. शिक्षाकारांच्या मताने देखील द्विमात्रिक वर्णानंतर मात्रिक अनुस्वार आल्याने दोहोंच्या संयोगाने तीन मात्रा होतात, परंतु ही स्थिती ह्रस्वपूर्व अनुस्वारच्या बाबतीत असे घडत नाही.

**कारण ह्रस्वपूर्व (१ मात्रा) + द्विमात्रिक (२ मात्रा ) मिळून तीन मात्रा होतात.**

शुक्लयजुस् प्रातिशाख्यानुसार

ह्रस्व + ह्रस्वपूर्व अनुस्वार=२ मात्रा

(ह्रस्व वर्णाची अर्धी मात्रा आणि परवर्ती अनुस्वाराची दीड मात्रा एकूण २ मात्रा) म्हणून या दोन मतात भेद दिसून येतो.

**शिक्षावल्ली टीकेमध्ये प्रातिशाख्य**– याज्ञवल्क्यशिक्षा यांच्यात समन्वय साधण्याचा प्रयत्न केला आहे. शिक्षाग्रंथाचा अर्थ प्रातिशाख्याप्रमाणे लावण्याचा प्रयत्न केला आहे. अध्यर्द्धा (शु.य.प्रा.४.१४९) चा सामान्य अर्थ १$^{१}/_{२}$ दीड मात्रा असा आहे.

वाजसनेय प्रातिशाख्य– एक परिशीलन मध्ये युगलकिशोर मिश्रांनी परिशिष्ट–९ या सूत्राच्या अनुवादात अध्यर्द्धाचा अर्थ दीड मात्रा असाच केला आहे.

असा अर्थ स्वीकारल्यानंतर ह्रस्वपूर्व अनुस्वार, दीर्घ पूर्व अनुस्वार दोन्हीही पूर्वीच्या स्वरवर्णासह २ मात्रा असणारे होतात.

ह्रस्वपूर्व ($^{१}/_{२}$ ) + द्विमात्रिक(१$^{१}/_{२}$) = २मात्रा

दीर्घपूर्व (१$^{१}/_{२}$)+ एकमात्रिक ($^{१}/_{२}$) = २ मात्रा

**प्रतिज्ञापरिशिष्ट आणि अमोघानन्दिनीशिक्षा**- यांचे अवलोकन केले असता याज्ञवल्क्यशिक्षेप्रमाणेच त्यांचे मत दिसते. **प्रतिज्ञापरिशिष्टात** अनुस्वाराचे त्रैविध्य दाखविले आहे.

१. ह्रस्व स्वरानंतर येणारा अनुस्वार दीर्घ

२. दीर्घ स्वरानंतर येणारा अनुस्वार ह्रस्व

३. गुरुपुढे असताना अनुस्वार गुरु

तस्य त्रैविध्यमाख्यातं ह्रस्वदीर्घगुरुभेदैर्दीर्घात् परो ह्रस्वो, ह्रस्वात् परो दीर्घः, गुरौ परे गुरुः (प्रतिज्ञापरि.३.२)

**अमोघानन्दिनीशिक्षेमध्ये म्हटले आहे की ह्रस्व किंवा दीर्घ स्वरानंतर येणाऱ्या** – अनुस्वारानंतर व्यंजन आले असेल आणि त्यापुढे ऋ वर्ण येत असेल तर तो अनुस्वार द्विमात्रिक होतो.

ह्रस्व किंवा दीर्घ कोणताही स्वर + अनुस्वार+व्यंजन+ऋकार



द्विमात्रिक होतो.

अनुस्वारापूर्वी ह्रस्व असो किंवा दीर्घ असो अशा स्थितीत अनुस्वार द्विमात्रिकच होणार.

अनुस्वारो द्विमात्रः स्यादृवर्णव्यञ्जनोदये।
ह्रस्वाद् वा यदि वा दीर्घाद् देवानाꣳहृदयेभ्यः।
सꣳस्रष्टा सिꣳह्यासि संयोगे ह्रस्व इष्यते।
मध्यमꣳश्रथायेति संय्योगे न द्विरुच्यते।।

(लघ्वमोघानन्दिनी शिक्षा १५-१६)

याज्ञवल्क्यशिक्षेचा संबंध प्रामुख्याने माध्यन्दिनशाखेशी आहे-

१. अ. लृकारस्य दीर्घत्वं नास्ति वाजसनेयिनः (या.शि.१.२३)

आ. नैतन्माध्यन्दिनीयानाम् (या.शि.१.४०)

इ. माध्यन्दिनविरोधी स्यात्ताथाभाव्यस्तु य: स्वर: (या.शि.२.८६)

२. प्रतिज्ञापरिशिष्टात ग्रंथारंभी माध्यन्दिनशाखेचा गौरव - तस्मिन् शुक्ले याजुषाम्नाये माध्यन्दिनीयके। (प्र.प.१०३)

**शुक्लयजु:प्रातिशाख्यात अन्य शाखांच्या मतांचे प्रतिपादन आले आहे, ते पुढीलप्रमाणे–**

अ. हस्तचालनसंबंधात काण्व आचार्यांचा उल्लेख 'अनुदात्तं चेत् पूर्वं तिर्यङ् निहत्य काण्वस्य' (शु.य.प्रा.१,१२३)

आ. वर्ण विकारासंबंधी शौनकाच्या मताचा उल्लेख 'असस्थाने मुदि द्वितीयᳫं शौनकस्य (४.१२१)

इ. आचार्यांच्या नावाचा उल्लेख नाही पण मतांचे प्रतिपादन न वकारस्यासस्त्थान एकेषाम् (४.१२७)

ई. यजुष्षु च (४.७९) इत्यादी सूत्रांमध्ये यजुस् चा उल्लेख.

उ. शुक्लयजु: प्रातिशाख्य/ वाजसनेयि प्रातिशाख्य या नावावरूनही लक्षात येते की माध्यंदिन शाखे व्यतिरिक्त अन्य शाखांचीही मते यात आहेत.

ऊ. माध्यन्दिन (८.३१) औपशवि (३.१३१) काश्यप (४.५, ४.१६०) गार्ग्य (४.१६७) जातूकर्ण्य (४.१२५, ४.१६०, ५.२२) दाल्भ्य (४.१६) शाकटायन (३.९, ३.१२) शाकल्य (३.१०, ११) इत्यादी आचार्यांचे उल्लेख प्रातिशाख्यात आले आहेत.

**४३. अनुस्वारस्योपरिष्टात् संयोगो यत्र दृश्यते।**
**ह्रस्वं तं तु विजानीयात् 'सᳫंस्थामि'ति दर्शनम्।।४३।।**



**संयोगादि अनुस्वार**

(ह्रस्व किंवा दीर्घ स्वरानंतर येणाऱ्या) अनुस्वारानंतर संयोग आला असताना तो अनुस्वार ह्रस्वच जाणावा. यासाठी (पूर्वस्वरानुसार तो ह्रस्व किंवा दीर्घ ठरत नसतो) स॑ं॑स्थानम् हे उदाहरण देता येईल.

**स्पष्टीकरण**– अनुस्वारापूर्वीचा स्वर ह्रस्व असेल तर अनुस्वार दीर्घ असतो व पूर्वीचा स्वर दीर्घ असल्यास अनुस्वार ह्रस्व असतो. परंतु पुढे संयोग असेल तर मात्र पूर्वीच्या ह्रस्व, दीर्घ स्वरनिरपेक्ष अनुस्वार असतो.

संयोगादी अनुस्वारास ह्रस्व असे म्हटले आहे. परंतु टीकेमध्ये 'गुरुत्वं ह्रस्वेऽपि योज्यम्– प्रतिज्ञासूत्रविधानात्'

हा अनुस्वार ह्रस्व असला तरी तो **गुरु** आहे. याज्ञवल्क्यशिक्षेत संयोगे परे **ह्रस्वः** असे म्हटले आहे.

गुरुत्वाचे लक्षण 'आद्यपतनासमवायिकारणं गुरुत्वम्' हे आहे. संयोगाच्या आदि वर्णाच्या सोबत अनुस्वाराचे उच्चारण होते तेच **आद्यपतन** होय. म्हणूनच **अनुस्वार** गुरु ठरतो. याज्ञवल्क्य शिक्षेत मात्र गुरु हे पद वापरलेले नाही.

**४४. अनुस्वारो द्विमात्रः स्यादृवर्णव्यञ्जनादिगः।**
**ह्रस्वाद्वा यदि वा दीर्घात् 'दे॒वाना॒ꣳ हृद॑ये' यथा।।४४।।**

ऋवर्ण पुढे असणारे व्यंजन अनुस्वाराच्या पुढे आले असल्यास अनुस्वार द्विमात्रिक होतो.

अनुस्वार+व्यंजन+ऋकार=
↓
द्विमात्रिक

त्या अनुस्वारापूर्वीचा स्वर ह्रस्व असो की दीर्घ या स्वराला निरपेक्षपणे अनुस्वार द्विमात्रिक होतो. दे॒वाना॒ꣳ हृद॑ये (मा.सं.१६.४४) हे या साठी उदाहरण देता येईल.

**स्पष्टीकरण**– येथे आकारानंतर आलेला अनुस्वार दीर्घानंतर आल्याने ह्रस्व व्हायला हवा परंतु पुढे ह् + ऋ आल्याने तो अनुस्वार दीर्घच होय.

**४५. अनुस्वारस्तु यो दीर्घादक्षराद्यो भवेत् परः।**
**स तु ह्रस्व इति ज्ञेयो मन्त्रेष्वेव विभाषया।।४५।।**

**अनुस्वारासंबंधीच्या या व्यवस्थेबद्दल नियम**

दीर्घ अक्षरानंतर येणारा अनुस्वार ह्रस्व असतो. हा सामान्य नियम आहे परंतु या अनुस्वारापुढे ऋकाराने युक्त व्यंजन आल्यास मात्र हा अनुस्वार दीर्घही होतो. असा विकल्प या श्लोकात दिला आहे. मन्त्राव्यतिरिक्त ब्राह्मणादि भागामध्ये मात्र अनुस्वारापुढे ऋवर्णयुक्त अनुस्वार आला असता दीर्घानंतर येणारा, व ह्रस्वानंतर येणारा दीर्घच होतो.

**४६. ओभावश्च विवृत्तिश्च श–ष–सा रेफ एव च।**
**जिह्वामूलमुपध्मा च गतिरष्टविधोष्मणः।।४६।।**

ओभाव होण्यासाठी अ, आ नंतर उ, ऊ असणे आवश्यक आहे परंतु असा उ नसतानाही काही ठिकाणी विसर्गाचा ओ होतो, असा शिक्षाग्रंथाचा आशय आहे.

ऊष्मा (विसर्गाला) आठ प्रकारच्या अवस्था प्राप्त होतात.

१. ओभाव (ओ होणे)

२. विवृत्ति (विसर्गाचे न दिसणे, विराम)

३–५. श्, ष्, स्

६. रेफ़्

७. जिह्वामूलीय

८. उपध्मानीय

**स्पष्टीकरण**– ऊष्मा याचा अर्थ विसर्ग असा आहे. ऋक्प्रातिशाख्यात ऊष्मवर्णांमध्येच विसर्गाची गणना केली आहे. शुक्लयजुःप्रातिशाख्यात ऊष्मवर्णामध्ये श, ष, स, ह् यांची गणना केलेली आहे. या चारही वर्णांचा विसर्गाशी संबंध आहे.

पाणिनीय व्याकरणात देखील याच प्रकारे विसर्गाच्या अवस्था दिसून येतात.




अशा दोन अवस्था होतात.

**३,४,५.** विसर्गापुढे श्, ष्, स् आल्यास विसर्गाला विकल्पाने स् आदेश होतो. वा शरि। (पाणि.८.३.३६) या सूत्राने होतो.

: + श् ष् स्

↓

स् आदेश होतो.

**अ.** स् + श् = स्तोः श्चुनाश्चुः। (पाणि.८.४.४०)

↓

श्चुत्व (श्)

**आ.** स् + ष्

↓

ष्टुत्व (ष्) ष्टुनाष्टुः। (पाणि.८.४.४१)

**इ.** स् + स्

↓

स्

**१. ओभाव–**

पूर्वी ह्रस्व असेल आणि पुढे ह्रस्व अ किंवा हश् (मृदुव्यंजने) असतील तर स् ला रु आदेश होतो. र् ला उ आदेश होतो आणि अ + उ यांना गुणादेश ओ भाव होतो.

अ + स् + अ, मृदुव्यंजन

↓

अ + र्

↓ ↓

अ + उ = ओ

**७,८.** विसर्गापुढे क् ख् किंवा प् फ् आल्यास विसर्गाचे जागी अनुक्रमे जिह्वामूलीय आणि उपध्मानीय आदेश होतात.

: + क् / ख् → ᳵजिह्वामूलीय

: + प्, फ् → ᳵ उपध्मानीय

**२.** विसर्गापूर्वी अ, आ असतील आणि विसर्गानंतर अश् प्रत्याहारातील वर्ण (स्वर आणि मृदुव्यंजने) असेल तर विसर्गाला अनुक्रमे रु आणि त्या रु ला य् आदेश होतो. या **य्** चा लोप होऊन परत संधी होत नाही.




अशाप्रकारे पाणिनीयशिक्षेत सांगितलेल्या विसर्गाच्या परिवर्तनाचे आठ प्रकार पाणिनीच्या प्रक्रियेतही दिसतात.

**अ.** **१.**पाणिनिप्रक्रियेतही सारी परिवर्तने प्रत्यय असणाऱ्या स् ला मूळ मानून झालेली आहेत.

**२.** याज्ञवल्क्यशिक्षेत मात्र पदपाठात दिसणाऱ्या विसर्गाला मूळ मानून संहितापाठात होणाऱ्या परिवर्तनाच्या आधारावर मानली आहेत.

**आ.** १. पाणिनीय परंपरेत आणि शिक्षेत देखील विसर्गाला जिह्वामूलीय, उपध्मानीय श्, ष्, स् होणे मानले आहे. परंतु ओभाव, विवृत्ति, रेफ हे विसर्गाच्या जागी होत नाहीत तर प्रत्ययाच्या अवयव असणाऱ्या स् च्या जागी होतात.



२. शिक्षेमध्ये मात्र ही सारी परिवर्तने विसर्गाची होतात हे मानले आहे.

**हा केवळ प्रक्रियेच्या दृष्टीने शिक्षाकार आणि पाणिनी यातील भेद आहे.**

**४७. यद्योभावप्रसन्धानमुकारादि परं पदम्।**
**स्वरान्तं तादृशं विद्याद् यदन्यद् व्यक्तमूष्मणः।।४७।।**

**सर्वत्र होणारा ओभाव हा विसर्गाचाच परिणाम आहे असे मानणे योग्य नाही.**

उकार ज्याच्या आदि आहे असे पद पुढे असताना 'ओ'भाव होत असेल तर असे पद स्वरान्त (अकारान्त) आहे हे जाणावे (कारण) विसर्गाशिवाय ओ त्व झाल्याचे स्पष्ट आहे.

**स्पष्टीकरण–**

अकारान्त पद + उकारादि पद

अ + उ = ओ याठिकाणी विसर्गाशिवाय ओ त्व आहे. या 'ओ'भावाला विसर्ग हे निमित्त नाही. उदा–




या ठिकाणी ओ भाव हा विसर्गा संबंधीचा नाही. आ + ऊ या दोन स्वरांचा हा संधी आहे. परंतु कुक्कुटः + असि = कुक्कुटोसि (मा.सं.१.१६) या संधीत विसर्गाचा ओ भाव झालेला आहे.

**४८+४९+५०. ओभावमागता योष्मा तां तु केलिं विनिर्दिशेत्।**
**विवृत्तिप्रत्यया चोष्मा विज्ञेया विकटाऽऽनना।।४८।।**

**लीढातिलीढविद्युच्च श–ष–सेषु प्रकीर्तिताः।**
**जिह्वामूले च रेफे च विज्ञेया विकटा शठा।।४९।।**

**उपध्मानीयसहितां पुष्पिणीन्तां विनिर्द्दिशेत्।**
**अन्यत्र या भवेदूष्मा सुलभां तां विनिर्द्दिशेत्।।५०।।**

### विसर्गाच्या होणाऱ्या आठ अवस्थांची नावे

जो ऊष्मा (विसर्ग) ओभावाला प्राप्त होतो त्याला **केलि** असे म्हणावे. विवृत्तीने ज्याचा प्रत्यय (प्रतीती) येतो त्यास **विकटानन** असे समजावे. विसर्गाचे श्, ष्, स् होत असतील तर क्रमशः त्यांना **लीढा, अतिलीढा, विद्युत्** म्हटले आहे.

जिह्वामूल आणि रेफ होत असेल तर **विकटा** आणि **शठा** जाणावे. उपध्मानीय होत असेल तर त्याला **पुष्पिणी** म्हणावे. या व्यतिरिक्त होणाऱ्या उष्म्याच्या अवस्थेला **सुलभा** असे म्हणतात.

**स्पष्टीकरण-**

१. विसर्गाचा ओभाव होणे- **केलि-** याच्या उच्चारणास प्रयत्न नगण्य म्हणून केलि
२. विसर्गाची विवृत्ती होणे- **विकटानना-** उच्चारणाचे वेळी मुख विकटाकृती होते.
३. विसर्गाचा श् होणे- **लीढा-** श् चे उच्चारण करताना जिह्वाग्राचा तालूला स्पर्श होतो आणि आस्वादना प्रमाणे अनुभव येतो.
४. विसर्गाचा ष् होणे- **अतिलीढा-** जिह्वाग्रास आत वळवून मूर्धेला स्पर्श केला जातो. शकारापेक्षाही आस्वादनाचा अधिक अनुभव येतो.
५. विसर्गाचा स् होणे- **विद्युत्-** जिह्वाग्राने उच्चारण करताना शीघ्र गतीने दातांपासून विश्लेष होताना विजेप्रमाणे अनुभव येतो. जो क्षणभर चमकून नष्ट होतो.
६. विसर्गाचा जिह्वामूल होणे- **विकटा-** हनुमूलातून उच्चारण होताना मुखाकृति विकट होते.
७. विसर्गाचा रेफ होणे- **शठा-** जिह्वाग्रास थोडे आकुंचित करुन दन्तमूलास स्पर्श करताना काठिन्याचा अनुभव येतो.

८. विसर्गाचा उपध्मानीय– **पुष्पिणी**– उपध्मानीयाच्या उच्चारणात मुखाकृती विकसित होते.

याव्यतिरिक्त अन्यत्र असणाऱ्या विसर्गाचे उच्चारण सुलभ होते म्हणून अशास **सुलभा** असे म्हणतात.

**५१. पादाद्यं च पदाद्यं च तथाऽवग्रहकालिकम्।**
**सुस्पृष्टं वं विजानीयात् तत्तत्कालनिबन्धनम्।।५१।।**

(अनुस्वार, विसर्ग यांचे विवेचन केल्यानंतर अन्तस्थांपैकी रेफ, लकार यांचे स्पष्टीकरण स्वरभक्तिप्रकरणात केले आहे. आता य् कार आणि व् कार यांचे विशेष पुढे सांगितले आहेत.)

पादाच्या अगोदर, पदाच्या अगोदर त्याच प्रमाणे अवग्रहाच्या वेळी उच्चारित होणारा वकार (गुरुभूत वकार) त्या त्या काळाचे उल्लंघन न करता सुस्पृष्ट जाणावा (उच्चारताना  काल विलंबाने असल्याने गुरुभूत जाणावा.)

पादादि, पदादि, अवग्रह यांचे सोबत उच्चारण असताना वकाराच्या ह्रस्वत्व, दीर्घत्व मध्ये कोणताच भेद होत नाही. परंतु सुस्पृष्ट असल्याने त्याचे गुरुप्रमाणे उच्चारण होते.

'व' ची सुस्पृष्टता दाखवण्यासाठी तो वर्ण द्वित्वाने दाखविला जातो. उच्चारणात विलंब करण्यासाठी दोन वकार त्या ठिकाणी उच्चारले जातात.

वकाराच्या द्वित्वाचा उल्लेख प्रातिशाख्य किंवा शिक्षाग्रंथात नाही. उदा–

गणानान्त्वा ... व्वसो मम ...

या ठिकाणी **व्व**सो– या प्रकारचे **व** चे उच्चारण सुस्पृष्टता दाखविण्यासाठी आहे.

**५२. पादादौ च पदादौ च संयोगावग्रहेषु यः।**
**जशब्द इति विज्ञेयो योऽन्यः स य इति स्मृतः।।५२।।**

**य चा ष उच्चार ('य' चा 'ज' उच्चार होतो तो 'य' वर्ण 'ष' या पद्धतीने दाखविला जातो.)**

पादाच्या आदी, पदाच्या आदी, संयोगात असणारा, अवग्रहाने युक्त 'य' हा ष समजावा. (अशा य चा ष उच्चार होतो.) या शिवाय जे अन्य आहेत ते य च समजावेत.

**स्पष्टीकरण-**

१. **पादादी असणारा (असंयुक्त) य चे ष उच्चारण.**

उदा. **ष**ज॑मानस्य प॒शून्पा॑हि (मा.सं.१.१)

पादादी यकाराचे उच्चारण ष होते.

२. **पदाच्या आदि (असंयुक्त) असणाऱ्या 'य' चा उच्चार ष होतो.**

उदा. **ष**ज॑मानस्य (मा.सं.१.१)

षत्ते सोम दिवि (मा.सं.६.३३) पदादि असंयुक्त य चे ष उच्चारण, झाले आहे.

३.**संयोग असताना य चे ष उच्चारण होते.**

कारिकेत य चा इतर व्यंजनांशी संयोग असताना त्याचे ष उच्चारण सांगितले असले तरी विशिष्ट व्यंजनांशी संयोग असतानाच य चा ष उच्चार होतो. पदाच्या आदि, मध्यभागी आणि अन्ती **य** चा र्, ह्, ऋ, य् यांच्याशी संयोग असेल तर य चा ष उच्चार होतो. प्रतिज्ञासूत्रानुसार- रेफ, हकार, यकार- ऋकारैरेव ग्राह्यः। उदा. -

अ. घृताचीर्षन्तु हर्षत (मा.सं.३.४) पदादि आणि पदमध्यात यकाराचा र् शी संयोग असल्याने त्याचा उच्चार ष होतो.

आ. कृणुह्षध्वरम् (मा.सं.२९.२६) य चा ह शी संयोग म्हणून त्याचा उच्चार ष झाला आहे.

इ. जनवादिनं व्यृद्ध्यै (मा.सं.३०.६) य चा ऋ शी संयोग म्हणून उच्चार ष झाला आहे.

ई. धाम्ब्यारूपम् (मा.सं.१९.२४) य सोबत य चा संयोग म्हणून उच्चार ष झाला आहे.

४. **पदाच्या आदि य नसेल तर त्याचा ष उच्चार होत नाही.**

उदा. कुल्या**य** च (मा.सं.१६.३७)

तत्त्वा**य** (मा.सं.११.१)

५. वर सांगितलेल्या व्यंजनां व्यतिरिक्त इतर व्यंजनांशी संयोग असेल तर य चा ष उच्चार होत नाही.

उदा.-अस्मिन्**य**ज्ञे (मा.सं.१९.५८)

६. ऋकाराशी संयोग असताना य चा अन्य व्यंजनांशी संयोग असला तरी य चा ष उच्चार होतो.

उदा. सामान्**यृ**भिः (मा.सं.२०.१२) न् व्यंजनाचा संयोग असतानाही ऋ शी संयोग असल्याने या ठिकाणी ष उच्चार झाला आहे.

७. संयोग होताना वर सांगितलेली व्यंजने आणि य यांच्या मध्ये इतर व्यंजनाचे व्यवधान असले तर य चा ष उच्चार होणार नाही. उदा. -

अ. अग्निर्ज्योतिः (मा.सं.३.९) र् आणि य् या संयोगात ज् चे व्यवधान म्हणून य चा ष उच्चार होणार नाही.

आ. वर्ष्ण्यां (मा.सं.१६.३९) र् आणि य् यांच्यामध्ये ष् चे व्यवधान म्हणून य चे ष उच्चारण नाही.

इ. बह्व्यस्तन्वः (मा.सं.१९.४२) ह् आणि य् मध्ये व् चे व्यवधान म्हणून य् चे ष उच्चारण नाही.

८. अवग्रह असताना य काराचे ष उच्चारण होते. उदा.– षज्ञायज्ञियम् (मा.सं.१२.४) याचा पदपाठ षज्ञायज्ञियमिति यज्ञा । षज्ञियम् या प्रकारे होईल.

अ. ष[1]ज्ञाय[2]ज्ञियम् – पदादि य[1] चे अर्थात पहिल्या य चे ष उच्चारण होते परंतु पदामधील पुढील य[2] चे ष उच्चारण होत नाही.

आ. पदपाठात मात्र षज्ञायज्ञियमिति य[1]ज्ञाषज्ञियम् असे होते. पदपाठात संहितापाठातील ष[1] हा पदामध्ये असल्याने त्याचा उच्चार **य** झाला तसेच अवग्रहानंतर पुढील यकार असल्याने त्याचा ष उच्चार झाला.

१. षज्ञा**य**ज्ञियम् – संहितापाठ

२. षज्ञायज्ञियमिति **य**ज्ञाषज्ञियम् – पदपाठ

| संहितापाठ | | पदपाठ | |
|---|---|---|---|
| षज्ञा**य**ज्ञियम् | | **य**ज्ञाषज्ञियम् | |
| ↓ | ↓ | ↓ | ↓ |
| पदादि म्हणून ष उच्चार | पदामध्ये म्हणून य च उच्चार. | पदादि नसल्याने य उच्चार | अवग्रहानंतर त्यामुळे पदादि मानून ष उच्चार |

९. पदादिमध्ये पादादि यकाराचा खरे तर अंतर्भाव होतो मग स्वतंत्रपणे पादादि हे पद का वापरले आहे असा प्रश्न पडतो.

केवळ पदादि म्हटले असते तर उपसर्गानंतर जर **य** कार आला असताना त्याचे षउच्चारणाचा निषेध मानावा लागला असता. परंतु पादादि म्हटल्याने पादादि मध्ये असणाऱ्या उपसर्गानंतर जरी **य** आला तरी य चे ष उच्च्वारण होईल.

उदा.–उपषजम् (मा.सं.८.३५)

अनुखोजान् (मा.सं.३.५२)

या दोन्ही उदाहरणात पादाच्या आरंभी य असल्याने ख्रज्ञ, खोजान् मधील खकारापूर्वी उपसर्ग असतानाही ख उच्चारण झाले.

वरील दोन्ही खकार पदाच्या आरंभी नाहीत पण पादाच्या आरंभी आहेत म्हणून ख उच्चार झाला आहे.

१०. य चे ज्या वेळी सुस्पृष्ट उच्चारण होते त्या वेळीच ते ख स्वरूपात दाखविले जाते.

य म्हटल्याने ईषत्स्पृष्ट ठरतो. ख हा सुस्पृष्ट प्रयत्न असणारा वर्ण आहे.

य –ईषत्स्पृष्ट

ख – सुस्पृष्ट

पदाच्या प्रारंभी असणाऱ्या उपसर्गानंतर येणारा य खकाररूपात उच्चरित होत नाही असे याज्ञवल्क्यशिक्षेत म्हटले नाही परंतु लघु–अमोघानंदिनी शिक्षेत म्हटले आहे की पदाच्या आरंभी असूनही उपसर्गानंतर आलेला य ईषत्स्पृष्टच होतो. अर्थात त्याचा ख उच्चार होत नाही.

उपसर्गपरो यस्तु पदादिरपि दृश्यते।
ईषत्स्पृष्टो यथा विद्यात्पदच्छेदात्परो भवेत्।।

(लघ्वमोघानन्दिनीशिक्षा ५)

उदा.– वियत् – (मा.सं....) संहितापाठ व्वि।खत् पदपाठ

अधियज्ञः – (मा.सं.१७.५४)

उपयन्ति – (मा.सं.१७.७६)

व्वैश्श्वानरो नऽऊतयऽआप्प्रयातु परावतः। (मा.सं.१८.७२)

**तात्पर्य**– अ. पादादि उपसर्गानंतर येणाऱ्या य चे ख उच्चारण होते.

आ. पदादि उपसर्गानंतर येणाऱ्या य चे य़ उच्चारण होत नाही.

अपवाद– उपसर्गानंतर येणाऱ्या य चे द्वित्व असेल तर य चे य़ उच्चारण होते.

संय्य़ौमि – (मा.सं.१.२२)

उपसर्गानंतर य असला तरी त्याचे द्वित्व असल्याने य़ उच्चार होतो.

द्विर्भावेऽप्येवम् । (प्रतिज्ञासूत्र २.२)

११. द्विरुक्त होणाऱ्या पदात ज्यावेळी य येतो त्यावेळी संहितापाठात पहिल्या पदातील य चा य़ उच्चार होतो. पुढील पदातील य चा य़ उच्चार होत नाही.

उदा.– धाम्न्ने धाम्न्ने मे भवय़जुषे **य**जुषे (मा.सं.१.३०)



पदादि असल्याने याचे उच्चारण य़ व्हायला हवे.

यजुषे यजुषऽइति यजुषे य़जुषे ।



पदादि नसल्याने य़ उच्चार नाही. अवग्रहानंतर त्यामुळे य़ उच्चार.

## ५३. वकारस्त्रिविधः प्रोक्तो गुरुर्लघुर्लघूतरः।
## आदौ गुरुर्लघुर्मध्ये पदान्ते च लघूतरः।।५३।।

वकार तीन प्रकारचा सांगितला आहे. गुरु, लघु, लघुतर. (पदाच्या) आदि असणारा **गुरु**, मध्ये असणारा **लघु** आणि पदान्ती असणारा **लघुतर** होय.

**स्पष्टीकरण**–

पदादि वकार – गुरु – सुसंस्पृष्ट

पदमध्ये – लघु



पदान्ती – लघुतर – ईषत्स्पृष्ट

कात्यायनपरिशिष्टप्रवरसूत्र २ (का.प.प्र.सू.२) मध्ये म्हटले आहे **अथान्त्यस्य (वकारस्य) अन्तस्थानां पदादिमध्याऽन्तस्थस्य त्रिविधं गुरुमध्यमलघुवृत्तिभिः उच्चारणम्२.६.**

उदा.

१.पदादि वकार गुरु असल्याने उच्चारणाला काळ अधिक आहे म्हणून तो दाखविण्यासाठी वकार द्वय लिहिण्याची संप्रदायाची पद्धत आहे.

त्रिह्व शद्धाम**व्वि**राजति**व्वा**क्पतङ्गार्य धीयते (मा.सं.३.८)

शिवेन**व्व**चसात्त्वागिरिशाच्छा**व्व**दामसि (मा.सं.१६.४)

**व्वे**दाहमस्य भुवनस्य नाभिं**व्वे**द्द्यावापृथिवीऽअन्तरिक्षम् **व्वे**दसूर्य्यस्य बृहतः (मा.सं.२३.६०)

वरील ठिकाणी वकाराचे उच्चारण गुरुपद्धतीने होते.

२. पदामध्ये असणारा वकार लघु असतो त्यामुळे हा वकार द्वित्वाने दाखविला जात नाही.

उदा.- अनु**वी**रैः (मा.सं.२६.१९)

अभि**व**त्सन्नस्वसरेषु (मा.सं.२६.११)

३. पदान्ती असणारा वकार लघुतर असतो या वकाराचा प्रयत्न ईषत्स्पृष्ट असतो.

इषेत्त्वोर्ज्जेत्त्वा व्वायवस्त्थ देवो **व**ः (मा.सं.१.१)

लघुतर ऐवजी श्लोकात लघूतर असे म्हटले आहे ते छन्दासाठी दीर्घत्व आहे.

**५४. सन्धिजौ च पदान्तीयावुपसर्गपरौ लघू।**
**अथ-मा-स-नशब्देभ्योः विभाषाऽऽम्रेडिते यवौ।।५४।।**

(पूर्वी सांगितलेल्या ठिकाणी यकार आणि वकार यांना संस्पृष्टत्व प्राप्त झाले असताना)

पदान्ती असणारे, संधीने निर्माण झालेले आणि उपसर्गानंतर येणारे **य**कार **व**कार लघु होतात. अथ, मा, स, न या शब्दानंतर येणारे तसेच आम्रेडित (परत तेच पद येणे) मध्ये असणारे य, व हे विकल्पाने लघु होतात.

**स्पष्टीकरण**– या श्लोकात वापरलेला **लघु** शब्द **लघुतर** या अर्थाने आलेला आहे.

य, व हे वर्ण लघुतर अर्थात ईषत्स्पृष्ट प्रयत्न असणारे कोणत्या ठिकाणी होतात हे या ठिकाणी सांगितले आहे.

**१. सन्धिजौ** – संधीने निर्माण झालेले इको यणचि, एचोयवायाव: इत्यादी यण्, अय् संधीने निर्माण झालेले य् व् लघुतर असतात.

**लघुमध्यमवृत्त्यपेक्षयाऽपि जिह्वाग्रोपाग्रमध्यमूलानां शैथिल्येनोच्चारणात् लघुतरौ भवत:।** याज्ञ.शि.टीका.

उदा.– तवं व्वायवृतस्पते ... (मा.सं.२७.३४)

तव + वायो + ऋतस्पते

अव् + ऋतस्पते

लघुतर वकार

**२. पदान्ती 'व' लघुतर असतो.** याच बरोबर यण् आणि अयादींनी झालेले संधीही लघुतर असतात.

अर्षन्त्यूर्मय: (मा.सं.१७.९४) – अर्षन्ति + ऊर्मयः

तव व्वायवृतस्पते ... (मा.सं.२७.३४) – तव वायो + ऋतस्पते

या ठिकाणी पदान्ती असणारे ई ओ यांचे जागी संधी होऊन क्रमाने य् अव् आदेश होऊन पदान्ती दिसणाऱ्या य् व् यांचे उच्चारण ईषत्स्पृष्ट झाले आहे.

याची अन्य उदाहरणे ५६ व्या श्लोकात आहेत. या उच्चारणां बाबतचा विकल्प स्वत:च्या संप्रदायाप्रमाणे असणार आहे.

प्रतिज्ञासूत्र (२.६) मध्ये पदादि, पदमध्य, पदान्ती असणाऱ्या व् ला क्रमश: गुरु, मध्यम, लघुवृत्ति असे म्हटले आहे. याज्ञवल्क्यशिक्षेत यांनाच क्रमाने गुरु, लघु, लघुतर म्हटले आहे. याज्ञवल्क्यशिक्षेत ज्याला लघु म्हटले आहे त्यालाच प्रतिज्ञासूत्रात मध्यमवृत्ति म्हटले आहे. तसेच याज्ञवल्क्यशिक्षेत लघुतर म्हटले आहे. त्यालाच प्रतिज्ञासूत्रात लघु म्हटले आहे. म्हणूनच शिक्षेत जो लघु शब्द वापरला आहे तो लघुतर या अर्थानेच वापरला आहे.

प्रतिज्ञासूत्र – गुरु – मध्यम(वृत्ति) – लघु(वृत्ति)
↓ ↓ ↙
याज्ञ.शि. – गुरु – लघु – लघुतर

५३ व्या श्लोकात पदान्ती असणाऱ्या व् चे उच्चारण लघुतर सांगितले आहे.आणि ५४ व्या श्लोकात सन्धिज य् आणि व् यांना पदान्तीय म्हटले आहे. म्हणून दोन्ही ठिकाणी समान स्थितीत समान विधानाचा स्वीकार करणे योग्य ठरेल.

**५५. पञ्चमादुत्तरो यो वो यदि नैकपदे भवेत्।**
**संहितायां लघुः सोऽथ पदकाले गुरुर्भवेत्।।५५।।**

(आम्रेडितातील य् व् यांच्या लघुतर उच्चाराबाबत विकल्प सांगितला आहे त्या बद्दलचा नियम.)

(प्रत्येक वर्गाच्या) पंचम वर्णानंतर य् कार किंवा व् कार समान पदात नसेल तर तो संहितेत लघु आणि पदपाठात गुरु होतो.

**स्पष्टीकरण**– वर्गीय पंचम वर्ण (अनुनासिक) + य् , व् (समान पदात नसतील तर) य्, व् हे

१. संहितेत– लघु २. पदपाठात गुरु होतात

यो रेवान्यो (मा.सं.३.२९) – संहितापाठ

ष: । रेवान् ।ष: – पदपाठ

त वर्गातील पंचम वर्ण







संहितेमध्ये ह्, र्, ऋ यांच्याशी संयोग असेल तर पदादि असूनही य चे सुसंस्पृष्ट उच्चारण होणार नाही. वकारासंबंधातही हेच सांगता येईल.

पंचम वर्णानंतर येणारे य् , व् पदपाठात गुरु होतात. अन्य वर्णानंतर आलेले य् व् पदपाठात गुरु होत नाहीत.

**५६. हकार–रेफसंयुक्त ऋवर्णोदय एव वा।**
**सुस्पृष्टं तं विजानीयाद् यकारो नान्ययुग् यदि।।५६।।**

(संयोग असताना यकार सुस्पृष्ट होतो व त्याचे ष उच्चारण होते. असे सामान्य विधान केले आहे परंतु सर्वच व्यंजनांच्या संयोगाच्या वेळी तो सुसंस्पृष्ट होत नाही. ष उच्चारण होत नाही. कोणत्या व्यंजनांच्यावेळी ष उच्चार होतो हे या ठिकाणी सांगितले आहे.)

रेफ, हकार यांनी युक्त यकार अन्य व्यंजनाने युक्त नसेल तर तो यकार सुस्पृष्ट जाणावा. पुढे ऋकार असतानाही तो य सुस्पृष्ट जाणावा. (अर्थात या यकाराचा ष उच्चार करावा.)

**स्पष्टीकरण**– 'ऋकारोदय:' ऋकारस्य उदय: आगम: । य नंतर ऋकार आल्यास य सुस्पृष्ट होणारच असा या ठिकाणी भाव आहे.

रेफ, हकार, ऋकार, यकाराव्यतिरिक्त इतर व्यंजनांशी संधी असेल तर मात्र 'य' कार सुस्पृष्ट होणार नाही.

हाच आशय– **रेफ–हकार–ऋकार–यकारैरेव योगे जकारोच्चारणं फलितं यकारे अन्यत्वाभावात् तथा हि द्विर्भावेऽप्येवम्** ... (का.प.प्र.सू.२.२.) यात आला आहे.

ज्या वर्णाशी संयोग सांगितला आहे त्यात र्, ह् इत्यादी वर्णांसोबत य या वर्णाचा अंतर्भाव केलेला नाही परंतु यकार यकाराशी भिन्न नाही म्हणून 'नान्ययुक्' असे म्हटल्याने 'य्' काराचा निषेध होत नाही. कात्यायनाने 'द्विर्भावेऽप्येवम्' (का.प.प्र.सू.२.२.) या सूत्राने साक्षात् विधान केलेले आहे. म्हणूनच रेफ, हकार, ऋकार आणि यकार या वर्णांशी संयोग असताना ऽकारोच्चारण होते.

**५७.** (उपसर्गानंतर य्, व् असतानाचे स्पष्टीकरण श्लोक क्र. ५७ क–ख–ग–घ–ङ–च या सहा श्लोकात आले आहे.)

**क.** **उपसर्गपरो यस्तु पदादिरपि दृश्यते।**
**ईषत्स्पृष्टो यथा 'वियत्' पदच्छेदे परो भवेत्।।क।।**

उपसर्गानंतर यकार पदादि असताना सुद्धा य चा ईषत्स्पृष्ट प्रयत्न दिसतो उदा. वियत् । हाच यकार पदच्छेद करून पदपाठात असेल तो दुसरा होतो. (अर्थात सुस्पृष्ट होतो आणि 'य' काराचे ऽरूपात उच्चारित होतो.)

वियत् – संहितापाठ – वि या उपसर्गानंतर असलेला य ईषत्प्रयत्न

वि। ऽत् – पदपाठ – सुस्पृष्ट प्रयत्न होऊन ऽ उच्चार होतो.

**ख.** **विभाषया यकारश्च नित्यमाम्रेडितेऽपि च।**
**यत्र यत्रेति 'मा यज्ञं' तथा मेति पदादपि।।ख।।**

वर सांगितलेला यकार विकल्पाने ईषत्स्पृष्ट होतो. (पादाच्या प्रारंभी उपसर्गानंतर आलेला उपसर्ग सुस्पृष्ट होतो.) परंतु आम्रेडितात पुढील पदातील 'य' चे ईषत्‌स्पृष्ट उच्चारण होते. उदा. ष्रत्र यत्र हे आम्रेडित होय (आम्रेडित अर्थात द्विरुक्त पदातील य रूपात नित्य ईषत्स्पृष्ट होय.) मा ष्रज्ञ (मा.सं.५.३) - या ठिकाणी मा या पदानंतर येणारा ष्र ईषत्स्पृष्ट न होता सुस्पृष्ट होतो.

**स्पष्टीकरण**- उपसर्गानंतर आलेला 'य' पादादि असेल तर 'ष्र' उच्चारण होते. उदा. अनु ष्रोजान्विन्द्रते हरी । (मा.सं.३.५२)

**ग. अथात उत्तरो यः स्यात् तथा नेति पदात् परः।**
**भवतीत्यपि पूर्वैव तथा च सपदादपि।।ग।।**

**अथ** आणि **न** या पदांच्या नंतर येणारा य हा ईषत्स्पृष्ट असत नाही, अर्थात तो सुस्पृष्ट आहे. पूर्वपदादि यकार ईषत्स्पृष्ट विकल्पाने होतो. तसेच **स** पदानंतर येणारा यकार ईषत्स्पृष्टच असतो. (पादाच्या प्रारंभी उपसर्गानंतर आलेला उपसर्ग सुस्पृष्ट होतो.)

**घ. अथाव्वयमादित्यादावथो येऽअस्य दृश्यते।**
**नयत्परो यथा च स्यात् सपदे तदुदाहृताः।।घ।।**

'अथा**व्व**यमादित्य...' इ. मंत्रभागात तसेच अथो ष्रेऽअस्य इ.मंत्रभागात व्, य ची सुस्पृष्टता दिसते. न या पदानंतर आलेला 'य' तसेच 'स' पदानंतर येणारी उदाहरणे पुढे दिली आहेत. (स नंतर येणारा **य** ईषत्स्पृष्ट होय. यात विकल्प आहे.)

(**य** प्रमाणेच **व** बद्दलदेखील सांगता येईल)

उदा.सयोजते - (मा.सं.१५.३३)

सयुजा- (मा.सं.११.१५)

सयावभिः- (मा.सं.३३.१५)

सयुधऽइ- (मा.सं.१७.३५) याठिकाणी स नंतर आलेला 'य' ईषत्स्पृष्ट होय.

न यत् – (मा.सं.२२.८२)

नयन्तु – (मा.सं.३७.७)

ही उदाहरणे सोडून न–स शब्दांनंतर येणाऱ्या य चे ज कारोच्चारण नित्य आहे.

सयन्ता (मा.सं.६.२९)

मनो न येषु (मा.सं.७.१७) या ठिकाणी स, न यानंतर आलेला य सुस्पृष्ट आहे. सम् उपसर्गानंतर 'य' आल्यास यकाराच्या द्विरुच्चारणाने यकारोच्चारण नित्य ठरते.

सँय्यज्ञपतिराशिषा – (मा.सं.६.१०)

विकल्प सांगितलेला असला तरी तो संप्रदायानुसार आवश्यक तेथे करावा. **न तु स्वेच्छया यत्र कुत्रापि विकल्पनीयम् इति। या.शि.**टीका.

**स** पदानंतर येणारा **य** कार काही स्थळांना सोडून य कार रूप घेतो.

**ङ. यदेव लक्षणं यस्य वकारस्यापि तद्भवेत्।**
**यत्र यत्र विशेषः स्यादिदानीं स स कथ्यते।।ङ।।**

(या ठिकाणी य्, व् यांचे उच्चारण होताना त्यांचे वैशिष्ट्य सांगून वकाराची अन्य वैशिष्ट्ये सांगितली आहेत.) य काराचे जे लक्षण सांगितले आहे तेच वकाराचे सुद्धा असायला हवे. य चे ईषत्स्पृष्ट उच्चारण कोठे होते सुस्पृष्ट कोठे होते हे वरील श्लोकात सांगितले आहे. तेच नियम 'व'कारा बाबतही आहेत. व कारा बाबत ज्या ठिकाणी विशेष असेल ते विशेष पुढे सांगितले आहेत.

**च. त्वदर्थवाचिनौ वो वां वा वै यदि निपातजौ।**
**आदेशाश्च विकल्पार्था ईषत्स्पृष्टास्तु ते स्मृताः।।च।।**

(पदादि वकाराचे सुस्पृष्टतेत कदाचित अपवाद दिसतात.)

त्वदर्थवाची (युष्मदर्थ) वस्, ताम्, वाम्, निपातनाने निर्माण झालेले (पादपूरणार्थक) वा, वै, आदेशभूत (यणादि संधि किंवा अयादि संधीत सांगितलेले) वकार किंवा विकल्पार्थक वा शब्द ईषत्स्पृष्ट जाणावेत.

| | |
|---|---|
| अ. युष्मदर्थक - वस्, वाम् (षष्ठी, चतुर्थी,द्वितीया)<br>आ. निपातनाने निर्माण (पदपूरणार्थक) -वा, वै<br>इ. आदेश (यण्, अयादि) - व्, अव्<br>ई. विकल्पार्थक - वा | यांमधील **व** हा ईषत्स्पृष्ट जाणावा. |

अर्थात हे सारे वकार लघुतर आहेत. यांचे उच्चार गुरु करू नयेत.

**१. युष्मदर्थक वः, वाम्**

देवो **वः** सविता (मा.सं.१.१)

ग्राव**वा**ङ्कशा (मा.सं.७.११) वाम्

पदादि असूनही वः, वाम् मधील **व** ईषत्स्पृष्ट आहेत.

**२. निपात- वा, वै**

व्वातो**वा** (मा.सं.९.७) पदादि असूनही वा **निपात** म्हणून तो ईषत्स्पृष्ट होय.

न **वा** उऽएतत् (मा.सं.२३.१६) वै निपात असल्याने वै (वा) निपात ईषत्स्पृष्टहोय.

विकल्पार्थक वा मित्रावरुणनेत्रा **वा**मरुन्नेत्रा **वा** (मा.सं.९.३६)

वा शब्द विकल्पार्थक म्हणून तो ईषत्स्पृष्ट होय.

वकार आणि यकार यांची सुस्पृष्टता आणि ईषत्स्पृष्टता या दोन गुणधर्माबाबत समानता आहे.

| वकार | यकार |
|---|---|
| ईषत्स्पृष्ट→ व | य |
| सुस्पृष्ट → व्व (गुरु) | य्य (गुरु) |

अ. या दोहोंमध्ये सुस्पृष्टतेच्या व्यवस्थेत केवळ संयोगामध्ये भेद आहे.

आ. पदादि, पादादि, अवग्रह याबाबतीत दोहोंतही सुस्पृष्टतेचे विधान आहे.

इ. यकारमध्ये य, ऋ, ह्, र् यांचा संयोग आणि या पेक्षा भिन्न वर्णाचा असंयोग असताना सुस्पृष्टतेचे विधान केले आहे.

असे काही विधान **व** काराबाबत केलेले नाही.

अथ – १. अथा**व्व**यमादित्यादौ।

२. अथो य्येऽस्य दृश्यते।

अथ नंतर येणारे व्, य् हे सुसंस्पृष्ट झाल्याचे दिसते.

सन्धिज य्कार आणि वकार यांची उच्चारणासंबंधात एकाचवेळी व्यवस्था केली आहे. (५४वी कारिका पहावी.)

**५७. हकारं पञ्चमैर्युक्तमन्तस्थाभिश्च संयुतम्।**
**औरसं तं विजानीयात् कण्ठ्यमाहुरसंयुतम्।।५७।।**

(य, व यांची वैशिष्ट्ये सांगितल्यानंतर आता **हकारा**बद्दल सांगितले जात आहे.)

वर्गीय पंचम वर्णाशी तसेच अंतस्थवर्णांशी संयुक्त हकार औरस (उर: स्थानीय) जाणावा. तसेच असंयुक्त हकार कण्ठस्थानीय जाणावा.

अ. ह् + पंचमवर्ण / अंतस्थ = हा ह्कार औरस (उर: स्थानीय) आहे.



आ. असंयुक्त ह् = कण्ठ्य

उदा. ब्र**ह्म**णे ब्राह्मम्म् (मा.सं.३०.५), गे**ह्या**य च (मा.सं.१६.४४)

या उदाहरणात अनुक्रमे प वर्गाचा पंचमवर्ण **म्** आणि अन्तस्थ **य** वर्ण यांच्याशी ह् हा संयुक्त असल्याने या उदाहरणातील**ह् औरस** होय.

नमो रोहिताय (मा.सं.१६.१९) या ठिकाणचा **ह** असंयुक्त असल्याने तो **कण्ठ्य** होय.

**५८. हकारो यत्र पूर्वस्थो ह्यन्तस्थाद्यो भवेत् परः।**
**पदकाले वियुज्येत संहितायां स औरसः।।५८।।**

ज्या संयोगात 'ह'कार पूर्वी असेल आणि अन्तःस्थातील आदि वर्ण **य** पुढे असेल आदि पदपाठ होताना वियुक्त होऊ शकत असेल तर संहितेमध्ये तो **ह** उर:स्थानीय होतो.

ह + य् = पदपाठात दोन्ही वर्ण वियुक्त होत असतील (स्वतंत्र पदे पडत असतील) तर हा ह संहितापाठात उर:स्थानीय होय.

उदा. सिꣳह्यसि – (मा.सं.५.१०) – संहिता

सिꣳही । असि । – पदपाठ

↓

पदपाठ केल्याने हा हकार असंयुक्त असल्याने तो **कंठ**स्थानी होय.

## ७. वर्णोच्चारण विधि (कारिका ५९ ते ८०)

**५९. मेघदुन्दुभिनिर्घोषो ज्ञायते पयसो ह्लदात्।**
**एवं नादः प्रयोक्तव्यः सिंहस्य रुदितं यथा।।५९।।**

मेघ आणि दुन्दुभीचा नाद ज्याप्रमाणे जाणला जातो, सरोवरापासून (उठलेल्या) जलाचा आवाज ज्याप्रकारे जाणला जातो, सिंहाची गर्जना ज्याप्रमाणे जाणली जाते त्याचप्रमाणे (औरस हकाराचे) उच्चारण करावे.

| | |
|---|---|
| मेघ<br>दुन्दुभी<br>सरोवरातून उठलेला जलाचा आवाज<br>सिंहगर्जना | यांच्या आवाजाप्रमाणे उर:स्थानीय हकाराचा उच्चार करावा. |

टीकाकारांनी रुदित याचा गर्जित असा अर्थ केला आहे.

**६०. मासे भाद्रपदे मेघा: शब्दं कुर्वन्ति यादृशम्।**
**एवं गह्वरमासाद्य 'शुक्रं दुदुह्रे' दर्शनम्।।६०।।**

भाद्रपद महिन्यामध्ये ज्या प्रमाणे मेघ गर्जना होते, गुहेमध्ये गेल्यानंतर ज्याप्रमाणे (गंभीर) ध्वनी येतो (त्याप्रमाणे औरस हकाराचे उच्चारण करावे)

उदा. शुक्रं दुदु**ह्रे**ऽअह्नय: (मा. सं. ३.१६)

(अन्तस्थांशी ह् चा योग असताना तो **ह्** औरस होय)

**६१. शाखायां वानरा यद्वन्निपतन्त्युत्पतन्ति च।**
**एवं वर्णा: प्रयोक्तव्या 'इहे हैषां' निदर्शनम्।।६१।।**

(कण्ठ्य हकाराचा निर्देश करून अनुदात्तानंतर अविलंबाने उदात्ताकडे जाऊन तेथूनही अविलंबाने **स्वरिताचे** उच्चारण करण्यासाठी यात सांगितले आहे.)

अनुदात्त →उदात्त →स्वरित हे सारे अविलंबाने करावे.

वानर ज्या प्रमाणे (एका फांदीवरून दुसऱ्या) फांदीवर चढउतार करतात त्याप्रमाणे वर्णांचा प्रयोग करावा. इ॒हेहै॑षां (मा. सं. १०.३२) हे या संबंधात उदाहरण देता येईल.

वानर ज्याप्रमाणे आरोहण आणि अवरोहण सहजगत्या करतात त्यात विलंब करत नाहीत त्याप्रमाणे अनुदात्तानंतर उदात्त उच्चारताना विलंब करू नये. तसेच उदात्ताचे ठिकाणी किंचित विराम करून अविलंबाने स्वरितावर विराम करावा. याच प्रमाणे अन्य वर्णांचा प्रयोग करावा. स्वराचा उच्चार करणाऱ्याने स्वरोच्चार करून विराम करावा.

**६२. कुक्कुटः कामलुब्धो यः ककारद्वयमुच्चरेत्।**
**एवं वर्णाः प्रयोक्तव्याः 'कुक्कुटोसी'ति दर्शनम्।।६२।।**

कामुक कोंबडा दोन ककारांचे ज्याप्रमाणे उच्चारण करतो त्याप्रमाणे वर्णांचा (जोडाक्षरांचा) उच्चार करावा. यासाठी कुक्कुटोऽसि..... हे उदाहरण देता येईल.

कुक्कुटोऽसि..... (मा. सं. १.१६) या मंत्रातील कुक्कुट शब्दात दोन ककारांचा संयोग आहे. प्रथम 'कु' आणि द्वितीय 'कु' यांच्यामध्ये असणार 'क्' आदिवर्णाचा अवयव बनतो.

संयोगादि **क्** चे (कुक्-कु) उच्चारण करून एका मात्रेचा विराम करावा आणि त्या नंतर स्थान, करण यांचा भेद न करता पुढील उकारासहित ककाराचे उच्चारण करावे.

द्विवर्ण्णमेकवर्ण्णवद् धारणात् स्वरमध्ये समानपदे । (शु. य. प्रा. ४.१४२) या सूत्रानुसार एका पदातील दोन स्वरांच्या मध्ये येणाऱ्या दोन वर्णांचे उच्चारण करताना एका वर्णाप्रमाणे उच्चारण करावे.




दोन पदे असतील तर पदच्छेदा नंतर दोन वर्णांचे समान उच्चारण होणार नाही.

**६३. यथा पुत्रवती स्नेहाच्चुम्बते निजमौरसम्।**
**एवं वर्णाः प्रयोक्तव्या 'ब्रुञ्जान' इति दर्शनम्।।६३।।**

(च वर्गातील पंचम वर्ण ञ् चे उच्चारण कसे करावे?) पुत्रवती स्त्री ज्याप्रमाणे आपल्या आत्मजाचे (मुलाचे) प्रेमाने हळुवारपणे चुंबन घेते, त्याच प्रमाणे वर्णांचा प्रयोग करावा. या संबंधात ब्रुञ्जानः - (मा. सं. ११.१) हे उदाहरण देता येईल.

बालकाचे चुंबन घेताना मातेचे मुख वर्तुळाकार होते त्याप्रमाणे, च वर्गातील अनुनासिक (ञ्) चा उच्चार करताना मुख वर्तुळकार करावे.बुञ्जान: - या पदाचे उच्चारण करताना मुखाचे वर्तुळ स्पष्टच दिसते.

जिह्वाग्राने ⟶ अधोदन्तमूलास स्पर्श करून ⟶ जिह्वामध्याने तालूला स्पर्श करून ञ् चे उच्चारण करताना मुख वर्तुळाकार होते.

**अ.** म्हणून **ञ्ज** ध्वनीचा **ग्य, द्न** रूपाने उच्चार अशुद्ध आहे.

**आ.** **ञ्** हा तालव्य असल्याने जिह्वामध्यद्वारा तालु या स्थानावरून होणारे उच्चारण द्न, ग्य असणार नाही.

**इ.** च वर्गीय सर्वच वर्णांचे उच्चारण जिह्वामध्याचा तालूला स्पर्श करताना जिह्वाग्राचा **अधोदन्तमूलाशी स्पर्श स्वभावत: होतो.**

या दन्तमूलाच्या स्पर्शामुळे 'ज' काराच्या जागी 'द' कार आणि 'ञ्' काराच्या जागी 'न' काराचे श्रवण प्रतीत होते आणि त्यामुळे '**द्न**' असे उच्चारण जाणवते आणि त्यामुळे '**द्न**' चे अनुकरण केले जाते.

**ई.** **द् कार आणि न कार** यांच्या उच्चारणात **जिह्वाग्राचा ऊर्ध्वदन्त** आणि **अधोदन्त** यांना स्पर्श होतो आणि **ज कार** आणि **ञ् कार** यांच्या उच्चारणात **जिह्वाग्राचा अधोदन्तमूलाला** स्पर्श होतो यात काही अंशी **साम्य** असले तरी **ञ्ज** च्या उच्चारणात जिह्वामध्याचा तालूस स्पर्श आहे तर **द्न** उच्चारताना दन्तास स्पर्श आहे. म्हणजे या दोहोत करण भेद आहे.

सञ्ज्ञानमसि (मा. सं. १२.४६) इत्यादी ठिकाणी देखील मुख वर्तुळाकार होते.

**६४. वडवा च हयं दृष्ट्वा योनिं विकुरुते यथा।**
**एवं वर्णा: प्रयोक्तव्या'स दुन्दुभे' निदर्शनम्।।६४।।**

घोड्याला पाहून घोडी ज्याप्रमाणे आपल्या योनीची विविध रूपे (संकोच-विकास) करते त्याप्रमाणे वर्णांचा प्रयोग करावा. याविषयी सदुन्दुभे...... (मा. सं. २८.२५) हे उदाहरण देता येईल.

**स्पष्टीकरण**– 'त'वर्गातील पंचम वर्ण 'न्' याचा समान अक्षराशी योग असताना मुखाकृती कशी होते ते या ठिकाणी सांगितले आहे.

सदुन्दुभे – याचा उच्चार करताना सदुन् + दुभे – यापैकी सदुन् याचा उच्चार करताना ओष्ठमंडल विवृत ठेऊन 'न्'च्या उच्चारणानंतर एकमात्राकाळ थांबून 'दुभे' याचे उच्चारण करावे.

न काराचा उच्चार ईषत्स्पृष्ट करू नये. अनुस्वाराप्रमाणे उच्चारण करताना ईषत्स्पृष्टता होते तसे उच्चारण व्हायला नको.

६५. **दर्दुरोदरदेशौ तु प्रफुल्लेते पुनर्यथा।**
**एवं वर्णाः प्रयोक्तव्या'अपाम्फेने' निदर्शनम्।।६५।।**

(प वर्गातील पंचम वर्ण 'म्' याचा तुल्याक्षराशी संयोग असताना उच्चारण कसे व्हावे यासाठी दिलेला दृष्टान्त)

बेडकाचा पोटाचा भाग ज्याप्रमाणे दोन्ही बाजूंनी फुगतो आणि परत पूर्ववत होतो त्याप्रमाणे वर्णांचा प्रयोग करावा (यासाठी) अपाम्फेने..... (मा. सं. १९.७१) हे उदाहरण देता येईल.

**स्पष्टीकरण**– अपाम् + फेने म्हणताना म् काराच्या उच्चारणाचे वेळी गाल फुगतात आणि परत मूळ ठिकाणी येतात. पुन्हा 'फे' म्हणताना काही अंशी फुलून परत प्रकृतिस्थ होतात.

अशा प्रकारे **म्** चा स्ववर्गीय वर्णांशी संयोग होताना सर्वत्र उच्चारण करावे.

या उदाहरणात **म्** कार उच्चारणात प्रयत्नदीर्घता (न् काराप्रमाणेच) सूचित केली आहे.

अर्थात 'म्' काराच्या उच्चारानंतर एक मात्रा काळ थांबून पुढील वर्णाचे उच्चारण करावे.

| | |
|---|---|
| ६३ व्या कारिकेत ञ्<br>६४ व्या कारिकेत न्<br>६५ व्या कारिकेत म् | यांच्या उच्चारणाचे नियम सांगितले आहेत. |

या कारिकांमध्ये तसे नाव घेतलेले नाहीत. ञ्, न्, म्, यांच्या त्यांच्या वर्गीय वर्णाशी संयोग असताना एकमात्रा काळ थांबून पुढील वर्णाचा उच्चार सांगितला आहे. हे त्या त्या उदाहरणांवरून स्पष्ट होते.

**६६. यथा भारभराऽऽक्रान्ता निश्वसन्ति नरा भुवि।**
**एवं वर्णाः प्रयोक्तव्या'अद्‌भ्यः सम्भृत' इत्यपि।।६६।।**

अद्‌भ्यः यातील 'य' चे गुरू उच्चारण करून विसर्ग उच्चारणाचे वेळी मुख उघडून एकमात्रा काळ थांबून पुढील संभृतम् पदाचे उच्चारण करायचे आहे.

विसर्ग पुढे असताना पूर्वाक्षराचे गुरू उच्चारण तसेच विसर्गानंतर किंचित थांबून पुढील वर्णाचे उच्चारण या ठिकाणी सांगितले आहे.

अधिक ओझे असणारी माणसे (दम लागल्याने) ज्याप्रमाणे जमिनीवर उभे राहून श्वास घेतात त्याप्रमाणे वर्णांचा प्रयोग करावा यासाठी 'अद्‌भ्यः सम्भृत' (शु.य. ३१.१७) हे उदाहरण देता येईल.

**६७. यथा कामातुरा नारी शब्दं कुर्याद्दिने दिने।**
**तच्छब्दं कुरुते प्राज्ञः 'सिꣳह्यसि' निदर्शनम्।।६७।।**

(अनुस्वार आणि संयोग पुढे असताना पूर्वीचे अक्षर गुरु होते. त्याचे उच्चारण कसे असावे ते सांगितले आहे.)

ज्याप्रमाणे (रतिक्रीडा करणारी) कामातुर नारी (सि सि) असा आवाज करते त्याचप्रमाणे बुद्धिमान माणसास याचेच अनुकरण करणे योग्य आहे. यासंबंधी सिꣳह्यसि हे उदाहरण देता येईल.

**स्पष्टीकरण**– सिᳫंह्यसि... (मा. सं. ५.१२) इत्यादि उदाहरणांमध्ये 'सि' उच्चार करताना गुरुता दाखवायची आहे. रतिक्रीडेमध्ये आसक्त नारी सिऽ सिऽ असा ध्वनी करते त्यामध्ये गुरुता जाणवते म्हणून हे उदाहरण दिले आहे.

याच उदाहरणातून संयोगापूर्वी ह्रस्व असेल तर त्याला गुरुत्व येते हे सांगितले आहे. पाणिनीने "संयोगे गुरु: (पा.१.४.११) या सूत्राने संयोगापूर्वीच्या वर्णाला गुरु संज्ञा दिलेली आहे. हा संयोग पूर्वी असणाऱ्या अनुस्वाराच्या उच्चारणावरून लक्षात येतो. अनुस्वार पुढे असल्याने 'सि' ला गुरुत्व आले आहे. तसेच 'ह्य' चा संयोग पुढे असल्याने अनुस्वारास दीर्घत्व आले आहे.

## ६८. पक्षौ वितत्य खे गृध्रो भ्रान्त्या संकुच्य तिष्ठति।
## एवं वर्णा: प्रयोक्तव्या'बार्ध्रीनसो' निदर्शनम्।।६८।।

(अनुस्वार, संयोग पुढे असताना अगोदरचा वर्ण गुरु होतो **त्याचप्रमाणे जो दीर्घ आहे तो ही गुरु होतो**.)

गिधाड पक्षी (ज्याप्रमाणे) आकाशात संचार करताना पंख पसरून (नंतर) संकुचित करून स्थिर होतो त्याचप्रमाणे दीर्घ गुरुभूत वर्णांचा प्रयोग करावा. (आणि त्यात स्थिर रहावे) यासाठी बार्ध्रीनस: (मा. सं. २४.३९) हे उदाहरण आहे.

या उदाहरणामध्ये **बार्** याचे उच्चारण करताना मुख उघडले जाते व लगेच गुरुत्व उच्चारणासाठी संकुचित केले जाते. याच प्रकारे अन्यत्र ठिकाणीही दीर्घ गुरुभूत वर्णांचे उच्चारण करावे.

## ६९. रङ्गे चैव समुत्पन्ने नो ग्रसेत् पूर्वमक्षरम्।
## स्वरं दीर्घं प्रयुञ्जीत पश्चान्नासिक्यमुच्चरेत्।।६९।।

(वर्णोच्चाराचे वेळी रङ्गस्वराच्या उच्चार कसा करावा हे यात सांगितले आहे. **रङ्ग** – **न्** कार **म्** कार यांचा विकार असताना जे उपधा अनुनासिक त्यास **रंग** म्हणतात.)

रङ्ग उत्पन्न झाल्यानंतर त्या पूर्वीचे अक्षर खाऊ नये (त्याचे शीघ्र उच्चारण करू नये) तर पूर्व अक्षर दीर्घ, विलंबित उच्चारावे, त्यानंतर नासिक्य रङ्गाचा उच्चार करावा.

**स्पष्टीकरण**– न् कार, म् कार यांचा विकार होताना किंवा लोप होताना पूर्ववर्ती स्वर अनुनासिक होतो. या अनुनासिक ध्वनीला **'रङ्ग'** असे म्हणतात.

स्वर → न् / म् = रङ्ग
↓ ↓
अनुनासिक बनणे (लोप / विकार)

यास रङ्ग म्हणण्याचे कारण न्/म् यांच्या पूर्वीचा स्वर या न्/म् मुळे रञ्जित होतो.

अशा अनुनासिक स्वराच्या शीघ्र उच्चाराने त्याचा ग्रास होईल तसा ग्रास होऊ नये म्हणून त्यापूर्वीच्या अक्षराचा दीर्घ उच्चार करावा त्यानंतर **शुद्ध** नासिक्य**रंगा**चा उच्चार करावा.

मात्रिक अकाराच्या उच्चारणात देखील संवृतत्वाची हानी न करता त्याचे दीर्घ अर्थात विलंबित उच्चारण करावे.

''अराँ२।।ऽ''

अरान् न् चा लोप

अर् + आ + न्

''आ'' अनुनासिक बनतो – अशावेळी

अर् + आँ – आ चे पूर्ण उच्चारण करून रंगाचे उच्चारण करावे.
रङ्ग

**७०. यथा सौराष्ट्रिका नारी अराँ२।। इत्यभिभाषते।**
**एवं रङ्गः प्रयोक्तव्यो ङकारपरिवर्जितः।।७०।।**

सौराष्ट्रदेशात जन्मलेली नारी ज्या प्रमाणे **अराँ२।।** या पदाचे उच्चारण करते त्याच प्रमाणे रङ्गाचे ङ्कार रहित उच्चारण करावे. (अर्थात रङ्गाचे असे उच्चारण करावे की ज्यात ङ्कार (ङ्, ञ्, ण्, न्, म्) ऐकायला येणार नाही)

**स्पष्टीकरण**- श्लोकात 'ङ्कारपरिवर्जित:' असे म्हटले आहे. रङ्गाचे उच्चारण ङ्कार रहित असावे. हा ङ्कार वर्गीय व्यंजनांपैकी अन्त्य वर्णांचे (ङ्, ञ्, ण्, न्, म्) उपलक्षण आहे.

रङ्गाचे उच्चारण अनुनासिक व्यंजनांप्रमाणे असू नये. वर्गान्त्य व्यंजनांचे श्रवण रङ्ग उच्चारणात असू नये.

**ङकार हा उपलक्षण स्वरूपात स्वीकारला कारण**

१.पहिल्या वर्गातील हा वर्ण होय.

२.अनुस्वाराच्या ठिकाणी ङ्काराचे उच्चारण करणारे संप्रदायाशी अनभिज्ञ लोक बरेच असावेत.

चुकीचे उच्चारण त्या काळी देखील होत होते असे दिसते - उवट भाष्यात म्हटले आहे -

सन्ति अतीर्थोषिता (आश्रमात न राहिलेले), अलसा, अगुणदोषज्ञा, अन्योन्याध्यापका: सर्ववर्णा-न्यत्वजनयितार: । तद्दोषनिवृत्यर्थमाचार्येण शिष्यहितार्थमिदमारब्धम् । अनुस्वारस्य तावत् स्थाने ङकारं जनयन्ति । हवींषि, सर्पींषि, भासांसि, अवांसि इत्येवं तन्निवृत्यर्थमनुस्वारलक्षणं क्रियते।। (ऋग्वेद प्रातिशाख उवटभाष्य १३.२२)

**चुकीचे उच्चारण-** अनुस्वाराच्या परसवर्ण अभाव असणाऱ्या ठिकाणी (रेफ, श, ष्, स्, ह पुढे असताना) अनुस्वाराचा उच्चार

उत्तर भारतात – ङ्, न् या स्वरूपात केला जातो

दक्षिण भारतात – म् या स्वरूपात केला जातो.

या प्रकारे अनुस्वाराचे उच्चारण सदोष आहे.

कारण– १.अनुस्वाराचे स्थान केवळ **नासिका** हेच आहे. प्रत्येक वर्गाच्या पंचम वर्णाचे (ञ् म् ङ्ण् न्) **मुखसहित नासिका** हे उच्चारण स्थान आहे.

२. अनुस्वारस्य ययि परसवर्णः (पा.८.४.५८) या सूत्रानुसार यय् प्रत्याहारातील वर्ण पुढे असताना अनुस्वार परसवर्ण होतो.

३.श्, ष्, स्, ह् हे यय् प्रत्याहारात अंतर्भूत होत नाहीत त्यामुळे या वर्णांबाबत परसवर्ण संभवत नाही. र् वर्ण यय् प्रत्याहारात येत असला तरी त्याही वर्णाचे अनुनासिक रूप संभवत नाही.

मग अशाप्रसंगी अनुस्वार + श्, ष्, स्, ह्, र् अनुस्वाराचे उच्चारण कसे करावे हे वर सांगितले आहे.

**७१. द्विमात्रो मात्रिको वापि नासामूलं समाश्रितः।**
**अन्ते प्रयुज्यते रङ्गः पञ्चमैः सर्वनासिकः।।७१।।**

(रंगाचे अनुस्वारत्व येथे सांगितले आहे.)

(अ) दोन मात्रा किंवा एकमात्रा असणारा रङ्ग नासामूला वर आश्रित आहे. (नासामूलस्थानीय आहे.)

(आ) पञ्चमैः वर्णैः जातः अयं रङ्गः अन्ते प्रयुज्यते अयं सर्वनासिकः वर्तते ।

वर्गीय पाचव्या वर्णापासून (न्, म्) निर्माण झालेला रंग स्वरांच्या शेवटी उच्चारला जातो.

याठिकाणी 'पञ्चमैः' म्हटले असले तरी अन्त्यवर्णां पैकी केवळ म्, न् यांच्या लोपानेच रंग निर्माण होणार आहे.

(इ) हा रंग पूर्णपणे नासिका स्थानीय असतो. अनुनासिकाप्रमाणे मुख आणि नासिका या दोहोंच्या साह्याने उच्चारित होत नाही. केवळ नासिकेनेच उच्चारला जातो.

(१) दोन मात्रा असणारा **रंग** दोन स्वरांमध्ये आणि कदाचित रेफाच्या, ऊष्म व्यंजनाच्या व्यवधानाने युक्त असा असतो.

उदा. (१) लो॒कार॒ँऽअ॑कल्पयन् । (मा. सं. ३१.१३)

| |
आ अ

याठिकाणी रंग **आ** आणि **अ** या दोन स्वरांमध्ये आलेला आहे. आ दीर्घ आहे.

(२) शत्रूरँप] (मा. सं. २.२७)

ऊ र् + अ

हा रंग दोन स्वरांमध्ये परंतु **'रेफ'** व्यवधान असणारा आहे.

| |
|---|
| षामैरयँश्चन्द्रमसि (मा. सं. १.२८)<br>अ य् अ म् श् च<br>↓<br>व्यवधान |

षामैः + अय**म्** – मधील म् लोप होऊन हा **रङ्ग** झालेला आहे.

**७२. अनन्तरं मकारस्य यो रङ्गस्तत्र रज्यते।**
**सर्वानुनासिकं विद्यादेषा मन्योपधानिका।।७२।।**

म्कारानंतर येणाऱ्या अन्तस्थ (य्, र्, ल्, व्, ह्) आणि ऊष्म वर्णांमुळे (श्, ष्, स्, ह्) निर्माण होणारा रङ्ग हा अनुनासिक जाणावा. या श्रुतीस **उपधानिका** असे म्हणतात.

| |
|---|
| न् / म् + अंतस्थ / ऊष्म<br>उपधानिका – अशावेळी यास रंग असे न म्हणता<br>उपधानिका ही संज्ञा येते. |

या श्लोकात 'मकारस्य' असे म्हणून म् चा उल्लेख केलेला आहे. परंतु म्कार हा न् काराचेही उपलक्षण मानावे.

या श्लोकात **सर्वानुनासिकः** हे पद आले आहे. ७१ व्या श्लोकात **सर्वनासिकः** असे म्हटले आहे.

त्यामुळे श्लोकात सांगितलेले उच्चारण **सर्वानुनासिक** आहे की **सर्वनासिक** आहे असा संभ्रम निर्माण होतो त्यामुळे दोन श्लोकात **विरोध** दिसतो. ७२ व्या श्लोकात रङ्गाच्याच एका भेदाचा उल्लेख केलेला आहे. रंग- एकमात्रिक किंवा द्विमात्रिक असतो. दोन्ही अवस्थांमध्ये तो **सर्वनासिक** च असतो. अशा अवस्थेत **सर्वनासिक, सर्वानुनासिक** यांचा मेळ कसा बसणार.

१.**सर्वानुनासिक** हे पद सर्वनासिक अर्थाने घेतल्यास औचित्याच्या दृष्टीने हे योग्य वाटत नाही.

२. अमरवल्ली टीकेत या संबंधात स्पष्टपणे काहीच म्हटले नाही. अमरवल्ली टीकेत सर्वानुनासिकाचा सर्वनासिक असाच अर्थ घेतला आहे.

''सर्वानुनासिकम् - यदुक्तं पूर्ववचने तत्तथैव इति शेषः विद्यात् जानीयात्  इति अत्र नास्ति विवादः ।''

यावरून असे दिसते की सर्वानुनासिकाचा अर्थ सर्वनासिक असा अमरवल्लीत घेतला असावा.

या श्लोकात **मन्या** याच्या अर्थाबद्दल स्पष्टता नाही. **''एषा श्रुतिः उपधानिका मन्या मन्तव्या इत्यर्थ** असा अर्थ घेणे शक्य आहे परंतु मन्या शब्द व्याकरण नियमानुसार संज्ञावाचक आहे.

संज्ञायां समज-निषद-निपत-मनविद-षुञ्-शीङ्-भृञिणः। (पा. ३.३.९९) या सूत्राने मन् ला भाव या अर्थाने क्यप् प्रत्यय करून मन्या शब्द बनतो. पण हा संज्ञावाचक आहे. याचा अर्थ आहे गळ्याजवळील शीर. मन्याचा संज्ञाभिन्न अर्थ करण्याला कोणताच आधार नाही. शिक्षावल्लीमध्ये याकडे लक्ष न देता मन्या - बोधक असा अर्थ केला आहे.

''मन्या'' प्रयोग अन्य व्याकरणाद्वारा सिद्ध होतो का हे पाहणे आवश्यक आहे.

## ७३. यरलवा: शषसहा अष्टैते चोपधानिन:।
## वर्गान्तै रज्यते यस्तु सर्वैः सर्वानुनासिक:।।७३।।

य्, र्, ल्, व्, श्, ष्, स्, ह् या आठ वर्णांना उपधानी असे म्हणतात. वर्गीय अंत्यवर्णानंतर (नकार / मकारानंतर) त्यांच्या पुढे हे उपधानी वर्ण आले असता जो रङ्ग रंजित होतो तो सर्वानुनासिक होतो (मुख आणि नासिका या दोहोंद्वारा उच्चार न होता त्याचे केवळ नासिकेद्वारा उच्चारण होते)

उपधावर्णांचे आनुनासिक्य करीत असल्याने रङ्गाच्यावेळी या वर्णांना उपधानी असे म्हणतात. उपधानी वर्ण पुढे असल्याने या रङ्गश्रुतीस **उपधानिका** हे नाव आहे.

पुढील सर्व उदाहरणांमध्ये उपधांचे आनुनासिक्य होते.

उदा. अहीँश्च सर्वान् – (मा. सं. १६.५)

अ + ह् + ई + न् + श् + च् + अ

न् चा लोप होऊन उपधा (अगोदरच्या) ई ला अनुनासिक बनविले.

अह् + ईँ + श्च = अहीँश्च।

**उदाहरणे**

अहीँश्च सर्वान् (मा. सं. १६.५) – ई + न् + श् + च् (न् लोप)

अन्याँस्त] (मा. सं. १७.११) आ + न् + स् + त्

ग्र स] भँ य्यु वम् (मा. सं. ११.१४) अ + म् + य् + य् (म् लोप)

तँल्लोकम् (मा. सं. २०.२५) अ + म् + ल् + ल्

सँव्वपामि (मा. सं. १.२१) अ + म् + व् + व्

र्, ष्, ह् यांची अनुनासिक रूपे माध्यंदिन संहितेत नाही. या ठिकाणी अनुस्वारच सांगितला आहे. अन्य शाखांमध्ये या ठिकाणी देखील अनुनासिक दिसते.

वरील सर्व उदाहरणांमध्ये न् कार किंवा म् कार यांच्या जागी रङ्ग श्रुती आहे. श्, स्, य्, व्, ल् यांच्यापूर्वी न् कार आणि म् कार असल्याने रङ्ग आहे.

न् कार आणि म् कार हे पूर्वपदाचे अंतिमवर्ण असल्याने त्या पूर्वीचे वर्ण **उपधा** होत. हे वर्ण **अनुनासिक** बनले. म्हणून या सर्व श्रुती **उपधानिक** होत. रङ्गाचाच एक भेद **उपधानिक** हा आहे. रङ्ग हा द्विमात्रिक असतो पण उपधानिक एकमात्रिक असतो.

७१ व्या श्लोकात रंग – ''द्विमात्रिको मात्रिको वा ।'' असे म्हणून रंगाचे दोन भेद सांगितले आहेत.

म्कारापुढे अन्तस्थ आणि ऊष्ण वर्ण आल्यास म्काराच्या उपधेला अनुनासिक बनविण्यासंबंधात ''अनुस्वारं रोष्मसु मकार: (वा. प्रा. ४.१) या सूत्राने सांगितले आहे.

**७४. नस्त उत्पद्यते रङ्गः कांस्येन समनिस्वनः।**
**मृदुश्चैव द्विमात्रः स्याद् 'वृष्टिमाँ२।। इव' दर्शनम्।।७४।।**

कांस्याप्रमाणेध्वनि करणारा मृदु द्विमात्र रंग नासिकेपासून उत्पन्न होतो ज्याचे उदाहरण वृष्टिमा रँ।।ऽइ]व (मा. सं. ७.४०) हे होय.

'नस्तः' म्हणजे 'नासिकामूलतः' ।

**स्पष्टीकरण**– कांस्यापासून (कासे या धातूच्या पात्रापासून) उत्पन्न झालेला ध्वनि अत्यंत मृदु आणि स्पष्ट असतो. त्याप्रमाणे ध्वनि असणारा रङ्ग अनुनासिक रूपात उत्पन्न होतो. हा रंग अनुस्वाराप्रमाणे सघोष नाही म्हणून सघोष उच्चार करू नये.

कांस्य पात्रापासून निर्माण झालेला आवाज अनुरणनाने दीर्घकाळ चालतो त्याचप्रमाणे रंगाचा दोन मात्रा हा काळ दीर्घकाळ चालतो.

रंगाच्या द्विमात्रेपैकी (१) एकमात्रा हृदयात् (२) अर्धीमात्रा मूर्धेत (३) आणि अर्धीमात्रा नासिकेत असते. याचे प्रतिपादन पाणिनीय शिक्षेत केले आहे.

हृदये चैकमात्रस्तु अर्धमात्रस्तु मूर्धनि ।
नासिकायां तथार्धं च रङ्गस्यैवं द्विमात्रता (पाणि. शि. २८)

यावरून स्पष्ट आहे की रङ्गाच्या उच्चारणात १$^{१}/_{२}$ मात्रा काळ हृदय तसेच मूर्धा आहे आणि अर्धमात्राकाळ नासिका आहे.

**७५. यादृशी रत्नवर्णाभा जपाया: कुसुमेऽथवा।**
**तादृशं रञ्जयेद्वर्णं प्रान्ते नासिक्यमाचरेत्।।७५।।**

(श्लोक ७२ मध्ये उपधानिका या प्रकारचा उल्लेख आला आहे. उपधानिका उपधेला कशा प्रकारे रंजित करतात.)

रत्नाची वर्णकांती ज्याप्रमाणे असते किंवा जपाकुसुम (जास्वंद) च्या फुलाची ज्याप्रमाणे कांती असते त्याप्रमाणे वर्णांचे रंजन करणे आवश्यक आहे.

**स्पष्टीकरण**– ज्याप्रमाणे माणिक्य रत्नांची कांती विरळ असते किंवा जास्वंदाच्या फुलामध्ये विरळ रञ्जता असते याप्रकारे विरल अनुनासिक्य उपधास्वरास रञ्जित करावे आणि अन्त्यदेशी नासिक्याचे उच्चारण करावे. श्लोकात **रत्नवर्णाभा** म्हटले आहे. या ठिकाणी रत्न म्हणजे माणिक्यच घेणे आवश्यक आहे. कारण जास्वंदाशी त्याची तुलना केली आहे. जपाकुसुमाच्या प्रान्त भागात रक्तिमा दिसतो. कडांकडे जायला लागल्यानंतर रक्तिमा विरळ झालेला दिसतो त्याचप्रमाणे उपधानिकेचा उच्चारण करताना स्वराच्या अंतर्भागात नासिक्याचे उच्चारण करावे. संपूर्ण स्वराचे नासिक्य उच्चारण करू नये. माँस्पचनी (शु.य.प्रा.२५.३६) सूत्रात उच्चारणासाठी उदाहरण दिले आहे. माँस्पचनी– याचा उच्चार करताना माउँस्– या प्रकारे करावे. यात यातील दीर्घस्वरानंतर आलेल्या नासिक्याचा उच्चारणकाळ एकमात्रा आहे.

**७६. लाक्षारक्तं यथा तोयं नकारान्तं पदं तथा।**
**सर्वं रङ्गं विजानीयाच्छत्रूनिति निदर्शनम्।।७६।।**

लाक्षारस पाण्यात मिसळल्यानंतर संपूर्ण पाणी लाल भासते. त्याचप्रमाणे नकारान्त पदही असते. या संपूर्ण (नकारान्त पदाला) रङ्ग जाणावे. (या संबंधीत) जहिशत्रून्... हे उदाहरण आहे.

लाक्षा लाल असल्याने जल लाल जाणवते यावेळी लाक्षा लाल आहे असे भासित होत नाही. कारण लाक्षा पाण्यापेक्षा भिन्न भासत नाही. त्याचप्रकारे नकारान्त पदातील उपधा अनुनासिक असतानाही संपूर्ण नकारान्तपदच रङ्ग भासते. भिन्न भासत नाही.

जहिशत्रू१ँरप– (मा. सं. ७.२७) या उदाहरणात प्रातिशाख्यानुसार नकाराचा रेफ आणि उपधेचे अनुनासिक झाल्यानंतर **शत्रून्** हे पदच रङ्ग बनते.




शत्रू**न्,** परिधीन् क्रतू**न्** वनस्पती**न्** स्वरे रेफम् – (शु.य.प्रा. २.१४२)




= शत्रू१ँ रप – अशी संहितापाठात स्थिती होते. या ठिकाणी उपधानिका असताना सुद्धा १ $^{१}/_{२}$सार्धमात्रा असणारा रंग होय.

आमोघानन्दिनी शिक्षेमध्ये पाच प्रयोगांना अनुरंग सांगितले आहे.

(१) जहि शत्रून् (२) क्रतून् (३) वनस्पतीन् (४) परिधीन् क्षिणान्ति (५) शत्रूँरनपव्ययन्त: अनुरङ्गा: पञ्चैकार्द्धमात्रिका भवन्ति (अमोघानन्दिनी शिक्षा ४१)

म्हणूनच शत्रू१ँरप या प्रयोगात अर्धानुस्वाराच्या खाली १ १/२ (१।।) मात्रेचे प्रदर्शन १।। दाखवून केले आहे.

उपधानिका दोन प्रकारची समजायला हवी –

१.व्यंजन पुढे असताना

२.स्वरपुढे असताना

स्वर पुढे असताना ‘न्’ ला रेफ होतो आणि परत ही उपधानिका व्यंजन पुढे असणारीच बनते. (उदा. शत्रूँ रप...)

**१.पहिल्या उपधानिकेत** स्वरोच्चारणानंतर शेवटी नासिक्याचे उच्चारण करायला हवे आणि याचा काळ १ मात्रा असतो.

याचे उदाहरण – अर्हीँश्च ।
अन्याँस्ते
रासभँय्युवम्

**२. दुसऱ्या उपधानिकेत–** उपधाभूत स्वरासहित रङ्गोपधानिकाचे एकसमान अनुनासिक उच्चारण होते. या मध्ये उपधा स्वर आणि त्यानंतर उच्चारला जाणारा उपधानिकेचा भेद प्रतीत होत नाही. लाक्षेच्या रसाने युक्त जलाची उपमा यासाठी समर्पक दिसते. सम्पूर्ण नकारान्त पद रंग असू शकत नाही परंतु तो तसा भासतो.

उपधाभूत स्वरासहित उपधानिकेस ‘‘सर्वं रङ्गं विजानीयात्’’ या वचनाद्वारा रङ्ग म्हटले आहे.

**७७. लुप्ते नकारे यत्सारं रञ्जन्ति शौनकादयः।**
**एवं रङ्गं विजानीयान्नाभ्याऽऽआसीन्निदर्शनम्।।७७।।**

नकारलुप्त झाल्यानंतर शौनक इ. (प्रतिशाख्यपर) ज्या स्वराचे रञ्जन करतात त्या स्वरास रङ्ग जाणावे. (याविषयी) नाभ्याऽऽआसीत् (या कण्डिकेतील रङ्ग लोका२ँ।।ऽअकल्पियन्) हे उदाहरण होय.

**स्पष्टीकरण**– शौनक इ. आचार्यांनी 'न्' काराचा लोप झाल्यानंतर न्काराच्या पूर्ववर्ती स्वराचे रञ्जन सांगितले आहे. म्हणून या स्वरास रङ्ग जाणावे. हे रञ्जन नासिकेच्या सहाय्याने होते. नासिक्यरूप धर्माने रञ्जित होत असल्याने यास रङ्ग म्हणतात.

या श्लोकाचा पाठभेद आहे तो असा –

लुप्ते नकारे यत्स्वारं रञ्जन्ति शौनकादय: ।
आदिरङ्गं विजानीयात् न चासीदिव विन्दति ।।

या श्लोकाचा आशय असा –

नकार लुप्त झाल्यानंतर शौनक इत्यादी ज्या स्वराचे रंजन करतात त्या नकाराच्या आदि असणारा (नकाराच्या पूर्वीचा स्वर) रङ्ग होय. यासाठी ''नचासीदिव'' हे उदाहरण होय.

या पाठभेदात आलेले उदाहरण योग्य नाही. या ऐवजी नत्वाभिरिविन्दतीइँ विन्दतीइँ (ऋ. १०.१४६.१) हा पाठ योग्य वाटतो. प्लुत ई हा अनुनासिक आहे.

**७८. पञ्च रङ्गा: प्रवर्त्तन्ते घात–निर्घात–वज्रिण:।**
**अहिण: प्रहिणो ज्ञेयो आ–ई–ऊ–ऋ–ओ दर्शनम्।।७८।।**

(पाचरंग प्रवृत्त होतात अर्थात रंगाचे पाच प्रकार दिसतात. ते असे)

घात, निर्घात, वज्रिण, अहिण, प्रहिण या नावाने हे जाणावेत. आ–ई–ऊ–ऋ–ओ ही यांची उदाहरणे होत (अर्थात हे वर्ण पुढे असतील तर रंगांना अनुक्रमे संज्ञा होतात)

| | | | | |
|---|---|---|---|---|
| रंग | + | आ | – | घात |
| रंग | + | ई | – | निर्घात |
| रंग | + | ऊ | – | वज्रिण |
| रंग | + | ऋ | – | अहिण |
| रंग | + | ओ | – | प्रहिण |

बृहद्आमोघानन्दिनी शिक्षा (४३) मध्ये या पाच रङ्गांची उदाहरणेही दिलेली आहेत.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| देवाऱ्ँ।।ऽआसादय | – (मा. सं. २२.१७) | रंग | + आ | – घात संज्ञक रंग |
| देवाऱ्ँ।।ऽइदेषि | – (मा. सं. २३.१६) | रंग | + इ | – निर्घात संज्ञक रंग |
| देवाऱ्ँ।।ऽउपागा | – (मा. सं. ३२.३९) | रंग | + उ | – वज्रिण संज्ञक रंग |
| देवाऱ्ँ।।ऽऋतुभिः | – (मा. सं. १८.३३) | रंग | + ऋ | – अहिण संज्ञक रंग |
| अमित्राऱ्ँ।।ऽओषतात् | – (मा. सं. १३.१२) | रंग | + ओ | – प्रहिण संज्ञक रंग |

श्लोकात सांगितलेला आ – ई – ऊ – हे ह्रस्व स्वराचेही उपलक्षण होत.म्हणूनच लोकाऱ्ँ।।अकल्पयन् – या ठिकाणी घातसंज्ञक रंग होतो.

**स्पष्टीकरण**– या संबंधात शिक्षावल्ली टीकाकाराने शौनकादींच्या मताचा उल्लेख केला आहे. या मतानुसार अ, आ, ई, ऊ, ऋ ज्यावेळी रक्त (अनुनासिक) होऊन क्रमाने घात, निर्घात, वज्रिण, अहिण, प्रहिण संज्ञक रंग होतात. हा रंग नकाराचाच विकार आहे, मकाराचा नाही.

| | |
|---|---|
| यामैरयँश्चन्द्रमसि | – अ रक्त झाल्याने हा **घात** होय |
| लोकाऱ्ँ।।ऽअकल्पयन् | – आ रक्त झाल्याने हा **निर्घात** होय |
| अहीँश्च | – ई रक्त झाल्याने हा **वज्रिण** होय |
| शत्रूऱ्ँ।।रप | – ऊ रक्त झाल्याने हा **अहिण** होय |
| | – ऋ रक्त झाल्यास हा **प्रहिण** होय |

**तात्पर्य – मात्रांच्या दृष्टीने तीन प्रकारचे रङ्ग दिसतात.**

| | |
|---|---|
| द्विमात्रिकरङ्ग | – लोकाऱ्ँ।।ऽअकल्पयन् |
| एकमात्रिक उपधानिक | – यामैरयँश्चन्द्रमसि |
| सार्धैकमात्रिक– रङ्ग | – शत्रूऱ्ँ।।रप |

सर्वप्रकारच्या रंगाचा समावेश या पाच प्रकारात होऊ शकतो.

**७९. यथा व्याघ्री हरेत् पुत्रान् दंष्ट्राभिर्न च पीडयेत्।**

**भीता पतनभेदाभ्यां तद्वद्वर्णान् प्रयोजयेत्।।७९।।**

(वर्णांचे सामान्यत: उच्चारण कसे करावे हे दोन श्लोकात सांगितल्यानंतर वर्णोच्चारण प्रकरणाचा उपसंहार केला जातो.)

**स्पष्टीकरण–**

१. पिलू खाली पडण्याच्या भीतीने भयभीत झालेली वाघीण ज्याप्रमाणे आपल्या पिलांना (एका जागेहून दुसऱ्या जागेकडे) आपल्या दाढांनी पकडून घेऊन जाते. परंतु पिलांना दातांची पीडा होऊ देत नाही. त्याप्रमाणे वर्णांचा प्रयोग करावा (वर्णोच्चार करावा).

आपल्या मुखातून पिले पडू नये म्हणून वाघीण दृढपणे आपल्या पिलांना पकडते त्याचप्रकारे वर्णांचा उच्चार अत्यंत दृढतेने करावा त्यांना उच्चार सुस्पष्ट आणि श्रव्य असावा.

२. वाघीण आपल्या पिलांना दाढांनी अत्यंत कठोरतेने घट्टपणे पकडत नाही की ज्यामुळे पिलांना जखमा होऊन ते घायाळ होतील. त्याचप्रमाणे स्थान, करण यांना पीडा देऊन वर्णांचा उच्चार करू नये.

३. रंगाचे उच्चारण करतानाही हा उपदेश महत्त्वाचा आहे. शिथिल उच्चारणाने ङ्काराचा उच्चार किंवा मकाराचा उच्चार ऐकायला येईल.

४. म्हणूनच शिथिलता, तसेच पीडा यांनी बचाव करून अत्यंत विवृत आणि अत्यंत संवृत मुख न करता उचित प्रकारे विवृत, संवृत करून रङ्ग चे उच्चारण करावे.

**८०. मधुरं च न चाव्यक्तं व्यक्तं चापि न पीडितम्।**
**सनाथस्येव देशस्य न वर्णाः समरङ्गताः।।८०।।**

मधुर पण अव्यक्त नाही, व्यक्त पण पीडित नाही (असे उच्चारण करावे) (सुदृढ) राजसत्ता असणाऱ्या देशात (ब्राह्मणादीं प्रमाणे असणारे) (अकारादि वर्ण) यांच्यात वर्णसंकर होऊ दिला जात नाही.

**स्पष्टीकरण**– माधुर्य संपादन करण्यासाठी वर्ण अस्पष्ट असण्याची आवश्यकता नाही. वर्णांच्या व्यक्ततेसाठी वर्णांना दात खाऊन पीडित करण्याचीही आवश्यकता नाही. कारण अशा पीडनाने माधुर्याचा नाश होईल.

प्रभावी राजा वर्णव्यवस्थेस स्थिर ठेवतो, प्रजेत वर्णसंकर होऊ देत नाही. त्याचप्रमाणे वर्णोच्चार करणारा जाणकार उचितस्थान आणि कारणाद्वारा सुव्यक्त, मधुर उच्चारण करतो.

## ८. पदाधिकार (कारिका ८१ ते ९०)

**पदोच्चारण विशेष–**

**८१. यथा समुत्तनागेन्द्रः पदात्पदं निधापयेत्।**
**एवं पदं पदाद्यन्तं दर्शनीयं पृथक् पृथक्।।८१।।**

मदोन्मत्त गजश्रेष्ठ ज्याप्रमाणे एक पाऊल दमदार ठेऊन त्यानंतर दुसरे पाऊल उचलून ठेवतो त्याच प्रमाणे उच्चारणाचे वेळी पदाचा आदि आणि अन्त (शेवट) स्वतंत्रपणे दाखवावा.

**स्पष्टीकरण**– पहिले पद स्पष्टपणे उच्चारून दुसऱ्या पदाच्या उच्चारास प्रारंभ करावा. तसे न केल्यास दोन पदे एकमेकांत मिसळून अर्थाबद्दल संदेह निर्माण होईल.

दोन पदांमधील अंतर एकमात्रा काळ असावे. ''पदयोरन्तरे काल एकमात्रा विधीयते'' (या.शि.१.१३) हे पूर्वी सांगितलेले आहे.

सुस्पष्ट अर्थ कळण्यासाठी सुस्पष्ट उच्चारणही महत्त्वाचे आहे.

**८२. गीती शीघ्री शिरःकम्पी यथालिखितपाठकः।**
**अनर्थज्ञोऽल्पकण्ठश्च षडेते पाठकाधमाः।।८२।।**

(समजून घेतल्याशिवाय जे अर्थरहित पठण करतात त्यांना **पाठकाधम** म्हटले आहे.)

पठण करताना (१) गाणारा (२) शीघ्रतेने म्हणणारा (३) उगीचच मान हलवणारा (४) जसे लिहिले आहे तसेच वाचणारा (५) अर्थ न समजता पठण करणारा (६) हळू आवाज असणारा हे सहा पठण करणाऱ्यां मध्ये अधम आहेत.

**१. गीती** – निर्धारित काळापेक्षा अधिक काळ उच्चारण करणारा **गीती** होय. अन्यथा सामवेदी वैदिक सामगान सावकाश करतात म्हणून त्यांना अधम म्हणावे लागेल.

**२.शीघ्री** – आवृत्ती म्हणताना शीघ्रतेने पठण चालेल परंतु अन्य वेळी देखील जो शीघ्र पठण करतो तो **शीघ्री** होय.

अभ्यासार्थे द्रुतां वृत्तिं – अभ्यास करताना वेगाने म्हणायला हवे (याज्ञ ४९)

**३. शिर: कम्पी** – पठण करताना उगीचच मान हलवणारा मानेने उदात्तादि स्वर देणारा.

**४. यथालिखित पाठक** – ज्या प्रमाणे लिहिले आहे तसेच न समजून घेता वाचणारा. पोथीत कदाचित् दोष असेल किंवा पद, मंत्र, अक्षर कोठे संपते, कोठून सुरू होते हे न समजता आहे तसे वाचणारा.

**५. अल्पकण्ठ** – पठण करताना अत्यंत कमी शक्ती लावणारा आणि ज्याचे उच्चारण ऐकायलाही येणार नाही असा.

**६. अनर्थज्ञ** – वाक्याचा अक्षरश: अर्थ न जाणणारा तसेच तात्पर्यरूपही अर्थ न जाणता विपरित अर्थ जाणणारा हे सारे पाठकाधम होत.

८३. **माधुर्यमक्षरव्यक्तिः पदच्छेदस्तु सुस्वरः।**
**धैर्यं लयसमत्वं च षडेते पाठके गुणाः।।८३।।**

(१) माधुर्य (२) अक्षरांची स्पष्टता (३) पदविभाग (४) सुंदर स्वर (५) निर्विकार चित्तता आणि (६) लयीची समानता हे वेदपाठकामध्ये सहा गुण असतात.

**१. माधुर्य** – अपेक्षेपेक्षा अधिक बल न देता स्वाभाविकपणे पदांचे उच्चारण करणे हा महत्त्वाचा गुण आहे. अपेक्षेपेक्षा अधिक बल दिल्याने कर्कशता निर्माण होते.

**२. अक्षर व्यक्ति –** प्रयत्न शैथिल्यामुळे पदांचे स्पष्ट उच्चारण होत नाही. (८० व्या कारिकेतही) वर्णांच्या स्पष्टते संबंधात विचार आला आहे. अक्षर व्यक्तीची पाच कारणे असतात – अनुप्रदान, संसर्ग, स्थान, करणविन्यास, परिमाण (तै. प्रा. २.२३.२)

**अनुप्रदान** म्हणजे बाह्य आणि आभ्यन्तर प्रयत्न, वर्णांच्या उच्चारणासाठी योग्य प्रयत्न व्हायला हवेत.

**संसर्ग –** एक वर्ण दुसऱ्या वर्णाच्या जवळ आल्यानंतर वर्णांच्या उच्चारणात वैशिष्ट्य निर्माण होते.

**स्थान –** वर्णोच्चाराची कंठ इ. स्थाने वर्णोच्चारात महत्त्वाची आहेत.

**करणविन्यास –** उच्चारण अवयवांचे योग्यप्रकारे संचालन व्हायला हवे.

**परिमाण –** वर्णोच्चारामध्ये वर्णांच्या उच्चारणाच्या मात्रा याचाही विचार महत्त्वाचा ठरतो.

या पाच कारणांमध्ये प्रभावीपणे अक्षरव्यक्ती होत असते.

**३.पदच्छेद –** यथासंभव पदविभाग पूर्वक उच्चारण करणे. छंदोभङ्ग होणार नाही या प्रमाणे उच्चारण व्हायला हवे.

**४.सुस्वर –** वर्ण उच्चारण झाल्यानंतर श्रुति सुखद अनुरणन होणे. ज्यामुळे श्रोत्याच्या चित्ताचे रञ्जन होणे म्हणजे सुस्वर हा गुण होय. या अनुरणनामुळे स्वराच्या सौष्ठवाची परीक्षा होते.

**५. धैर्य –** निर्विकार चित्तता म्हणजे धैर्य होय. कोणत्याही प्रकारे मनोविकार रहित पाठ केला तरच योग्य प्रकारे पाठ होणे शक्य असते.

**६.लय समता –** एका लयीत पाठ करणे. ह्रस्व–दीर्घ वर्णांच्या उच्चारणात लागणारा काळ हा त्या प्रमाणेच व्हायला हवा. तसेच स्थान प्रयत्नांचा समान प्रयोग करणे आवश्यक आहे.

**८४. आचार्याः सममिच्छन्ति पदच्छेदन्तु पण्डिताः।**
**स्त्रियो मधुरमिच्छन्ति विक्रुष्टमितरे जनाः।।८४।।**

आचार्य सम (पाठ) इच्छितात, पण्डित पदविच्छेद इच्छितात, स्त्रिया मधुर पाठाची इच्छा करतात तर अन्यलोक उच्चस्वरात उच्चारण इच्छितात.

जो सांगवेदांचे अध्यापन करतो तो आचार्य होय.

उपनीय गुरः शिष्यं वेदमध्यापयेद्विजः।
सकल्पं सरहस्यं च तमाचार्यं प्रचक्षते ।। (मनु.२.१४०)

असे आचार्य शिष्याकडून समपाठाची इच्छा करतात. **सम** बद्दल नारदीय शिक्षेत म्हटले आहे - समं नाम आवाप-निर्वाप-प्रदेशानाम्प्रत्यन्तरस्थाना-ना७ंसमासः सममित्युच्यते।। (नार. शि. १४०)

स्वरांचे आपूरण (**आवाप**) प्रक्षेप (**निर्वाप**) यांचा समास (यांची समता स्थापन करणे) म्हणणे सम होय.

**स्त्रिया मधुर पाठाची इच्छा करतात.** मधुरपदाबद्दल नारदीय शिक्षेत म्हटले आहे मधुरं नाम स्वभावोपनीतललितपदाक्षरगुणसमृद्धं मधुरमुच्यते (नार. शि. १.३.१०) स्वाभाविकरीतीने सादर केलेले, ललितपदांचे आणि अक्षरांचे गुणांसह समृद्ध उच्चारण मधुर होय.

**इतरजन विक्रुष्टाची इच्छा करतात.**

विक्रुष्टं नाम उच्चैरुच्चारितं व्यक्तपदाक्षरमिति विक्रुष्टम्।(नार शि. १.३.६)

सुस्पष्ट पदाक्षरांचे उच्चस्वरात उच्चारण विक्रुष्ट होय.

प्रस्तुतपदात (८४) वर्णित गुण अगोदरच्या कारिकेत सांगितले आहेत तरीही आचार्य, पंडित यांच्यासाठी सम, पदच्छेदयुक्त, मधुर, विक्रुष्ट पाठ प्रधान आहे हे सांगण्यासाठी या गुणांचा परत उल्लेख केलेला आहे.

या पदात विक्रुष्ट म्हटले आहे तर पूर्वीच्या कारिकेत यासाठी अक्षरव्यक्ती म्हटले आहे. यातील सम, पदच्छेद, मधुर हे गुण तर पूर्वीच्या कारिकेत स्पष्टपणे सांगितले आहेत. नारदीय शिक्षेमध्ये पाठाचे दहा गुण सांगितले आहेत. रक्त, पूर्ण, अलंकृत, प्रसन्न, व्यक्त, विक्रुष्ट, श्लक्ष्ण, सम, सुकुमार, मधुर. या दहागुणांपैकी प्रस्तुत कारिकेत विक्रुष्ट, सम, मधुर हे गुण प्रस्तुत श्लोकात सांगितले आहेत.

**८५. आवर्तते पदं यच्च द्विस्त्रिराम्रेडितं हि तत्।**
**यथा च 'धाम्ने धाम्ने' 'यजुषे यजुषे'ऽपि च।।८५।।**

आम्रेडित, (द्विरुक्त पदातील दुसरे पद आम्रेडित.)दोन अक्षरांचे किंवा तीन अक्षरांचे पद आवृत्त होते (पुनरावर्तित होते) त्यातील शेवटचे पद आम्रेडित होय. ''धाम्ने धाम्ने'', यजुषे यजुषे ही आम्रेडिताची उदाहरणे होत.

पाणिनीय सूत्रानुसार सर्वस्य द्वे (पा. ८.१.१) पदाचे द्वित्व होत असल्याचे सांगितले आहे. तसेच तस्य परमाम्रेडितम् (पा. ८.१.२) या सूत्राने द्विरुक्त झालेल्यापैकी शेवटचे पद **आम्रेडित** म्हणून स्वीकारलेले आहे.

धाम्ने धाम्ने याठिकाणी पुढील पदाची दोन अक्षरे आम्रेडित होत तसेच ꣡जुषे ꣡जुषे मधील शेवटची **तीन** अक्षरे आम्रेडित होत

**आम्रेडिताचे कार्य**

१. इवकाराम्रेडितायनेषु च (शु. य. प्रा. ५.१८) या सूत्रानुसार आम्रेडित पुढे असताना अवग्रहाचे विधान केले आहे. धाम्ने धाम्ने - धाम्ने धाम्नऽइति धाम्ने धाम्ने (मा. सं. १.३०) यजुषे यजुषऽ इति यजुषे। यजुषे (मा. सं. १.३०)

२. आम्रेडितामध्ये असणाऱ्या पदातील य, व् हे सुस्पृष्ट असत नाहीत. अर्थात आम्रेडितातील य चा ज उच्चार होत नाही, व ब चे द्वित्व उच्चारण होत नाही.

**आवर्तते पदं -** याचा अर्थ शिक्षावल्लीच्या टीकेमध्ये द्व्यक्षर किंवा त्र्यक्षर यांची आवृत्ती झाल्यास द्विरुक्त झालेल्या पुढच्या पदाला आम्रेडित संज्ञा येते असे म्हटले आहे.

परंतु हिंदी टीकेत डॉ. हरिराम मिश्र यांना हा अर्थ योग्य वाटत नाही. हरिराम मिश्र द्वयक्षर, त्र्यक्षर असा अर्थ न घेता जे पद दोन किंवा तीन वेळा आवृत्त होते त्यावेळी शेवटचे पद आम्रेडित होय असे म्हटले आहे. यासाठी मधु मधु मधु (मा. सं. ३७.१३) हे उदाहरण दिले आहे. शेवटचा मधु शब्द आम्रेडित आहे.

**८६. हीयते वर्द्धते वापि पदं यच्च कृशोदरम्।**
**उपचारः स विज्ञेयः 'उभे सुश्चन्द्र' दर्शनम्।।८६।।**

**उपचार संज्ञा**

जे पद क्षीण होते, वाढते किंवा मध्यात संकुचित होते त्यास **उपचार** असे जाणावे.

उभे सुश्चन्द्र - (मा. सं. १५.४३) हे यासाठी उदाहरण होय.

**१.वर्णाची वाढ –** उभे सुश्चन्द्र या उदाहरणात सुचन्द्रच्या जागी शकराचा आगम होऊन सुश्चन्द्र असे रूप बनले आहे. अर्थात या उदाहरण वर्णाची वाढ झालेली आहे. चन्द्रे सुशकारेण (शु. य. प्रा. ३.५४) या सूत्राने अशा ठिकाणी शकराचा आगम सांगितला आहे. पाणिनीने ही अशा आगमाचे विधान केले आहे. ह्रस्वाच्चन्द्रोत्तरपदे मन्त्रे (पा. ६.१.१५१) मन्त्रामध्ये ह्रस्व स्वरानंतर उत्तरपदी चन्द्र शब्द आल्यास सुट् आगम सांगितला आहे.या सुट् चेच श्चुत्व बनले आहे.

**२.वर्णाची हानी –**विशस्पतीवं...(मा.सं.३३.४०).सवर्णदीर्घामुळे एका अक्षराची हानि झाली आहे.

**३.पदमध्य संकुचित होणे –**वृष्टिमाऽँ।।ऽइंव... (मा. सं. ७३) याठिकाणी –







वनर्षद: (शु. य. प. ३३.१) इत्यादी ठिकाणी 'रे'फाचा आगम झाला आहे त्यामुळे एका वर्णाची वृद्धी झाली आहे.

वन + सद

वनसदोऽवेटो रेफेण (शु.य.प्रा.३.४९) या सूत्राने रेफाचा आगम सांगितला आहे.

**८७. प्रथमे न षकारेण सकारेणैव संयुतम्।**
**एतत्स्वरं समासाद्य 'अग्निष्वात्ता' निदर्शनम्।।८७।।**

षकाराने नव्हे तर अगोदरच्या सकाराने युक्तपदातील स्वराच्या (इकारादि) कारणाने (षकार युक्त) होते. अग्निष्वात्ता: (मा.सं.१९.५८) या संबंधात उदाहरण होय.

अग्निष्वात्ता: - (मा. सं. १९.५८) या उदाहरणात स्वात्ता: हे पद आहे. परंतु अग्नीमधील इ या स्वराशी झालेल्या समासामुळे दन्त्य सकार मूर्धन्य षकार बनला आहे. अर्थात मुळात तेथे स्‌कार आहे. भाविभ्य: स: षठं समानपदे (शु. य. प्रा. ३.५६) या सूत्रानुसार कण्ठ्यस्वर (अ, आ) सोडून अन्ये कोणत्याही स्वरापुढे आलेल्या स्‌काराचा षकार होतो.

पाणिनीय व्याकरणाच्या दृष्टीनेही सुषामादिषु च (पा. ८.३.९८) या सूत्राने स्‌ ला षत्व प्राप्त होते. ज्या षत्वाला काही विधान प्राप्त होत नाही त्यासाठी सुषामादिगण पाठ पाणिनीने दिला आहे. सुषामादि हा आकृति गण होय.

अग्नि शब्दातील 'इ' हे उपलक्षण आहे. अ, आ सोडून इतर स्वरांचेही ग्रहण या मध्ये होते.अग्निष्वात्तातील **स्वात्ता** स्वतंत्र पद पदपाठात दिसून येते.

ये। अग्निष्वात्ता : । अग्निष्वात्ताऽइत्येग्नि । स्वात्ता: । (मा.सं.प.१९.६१)

**८८. प्रथमे न ठकारेण थकारेणैव संयुतम्।**
**एतत्स्वरं समासाद्य 'अधिष्ठानं' निदर्शनम्।।८८।।**

(उपचार) हे नैमित्तिक कार्य आहे.

(प्रारंभी) पद ठकाराने नव्हे तर थकाराने युक्त होते. परंतु स्वराशी (इकार) संयुक्त झाल्याने (ते षकार आणि ठकाराने) युक्त झाले. (याविषयी) **अधिष्ठानम्** - हे उदाहरण होय.

इकारामुळे स्‌ काराचा षकार होतो व षकारामुळे थकाराचा ठकार होतो हे यात सांगितले आहे. षात्तथौमूर्धन्यम् (शु.य.प्रा.३.८०) या सूत्रानुसार षकारानंतर 'त' किंवा 'थ' आले तर ते मूर्धन्य (ट्‌, ठ्‌) बनतात.

पदपाठामध्ये ही स्वतंत्रपदे दिसून येतात.

अ॒धि॒ष्ठान॑म् । अ॒धि॒ष्ठा॒न॒मित्य॑धि । स्थान॑म् (मा.सं.प.१७.१७)

पाणिनीय व्याकरणाच्या दृष्टीने उपसर्गात् सुनोति... (पा. ८.३.६५) या सूत्रानुसार 'अधि' उपसर्गानंतर स्था धातु आल्यास ष त्व होते आणि ष्टु ना ष्टुः (८.४.४१) सूत्राने ष्टुत्व होऊन **अधिष्ठान** रूप बनते.

## ८९. प्रथमे न णकारेण नकारेणैव संयुतम्। एतदक्षरमासाद्य त्रिणवेति निदर्शनम्।।८९।।

### उपचरित षत्वापत्ती (ण त्व होणे)

(प्रारंभी) पद ण काराने नव्हे तर 'न'काराने युक्त होते. (परंतु) या अक्षराच्या (र अक्षराच्या) योगाने (णकारयुक्त झाले) या विषयी **त्रिणव** (मा. सं. १.१४) हे उदाहरण होय.

ऋषरेभ्यो नकारो णकारं समानपदे । स्वरयवहकपैश्च (शु. य. प्रा. ३.८५-८६) या सूत्रानुसार एकाच पदात ऋ, र्, ष् यानंतर आलेला नकार णकार बनतो. या दोन पदांमध्ये स्वर, य्, व्, ह्, क वर्ग, प वर्ग यांचे व्यवधान चालू शकते. या सूत्रानुसार त्रि + नव - याचे त्रिणव रूप बनले आहे.




पाणिनीय व्याकरणानुसार - रषाभ्यां नो णः समानपदे....(पा. ८.४.१) या सूत्रानेही 'न्' चा 'ण्' होऊ शकतो. परंतु एकाच पदात ते वर्ण आवश्यक आहेत. त्रिणव ही दोन पदे स्वतंत्र असताना या ठिकाणी त्यातील न्काराचा णकार झाला आहे.

पाणिनीने व्यत्ययो बहुलम् (पा. ३.१.८५) या सूत्रानुसार वेदात अनेक ठिकाणी अशी रूपे होतात हे सांगितले आहे.

(शु.य.प्रा.- अष्टाध्यायी दोन्हीकडे समानपदे ही अट आहे. पण प्रातिशाख्यानुसार दोन पदे स्वतंत्र असतानाही 'ण'त्व सांगितले आहे.)

पदपाठ –

त्रिणवत्रयस्त्रिँशौ। त्रि नवत्रयस्त्रिंशाविर्ति त्रि नवत्रयस्त्रिँशौ। (मा.सं.प.१०.१४)

**९०. प्रथमे नैव रङ्गेण नकारेण च संयुतम्।**
**एतद्रञ्जितमासाद्य 'वृष्टिमाँ२।।ऽइव' दर्शनम्।।९०।।**

**उपचरित उपधा अनुनासिक बनणे**

(प्रारंभी) पद रङ्गाने युक्त नव्हते परंतु नकाराने संयुक्त झाल्याने (हे पद) रञ्जनाने युक्त (रङ्गयुक्त) बनले. या विषयी वृष्टिमाँरँ।।ऽइ]व हे उदाहरण होय.

वृष्टिमान् + इव – (मा. सं. ७.४०) सन्धीपूर्वी अशी स्थिती होती परंतु 'न्' कराशी संयोग झाल्याने 'आ' अनुनासिक बनून रंग निर्माण झाला आहे. (याची सर्व प्रक्रिया श्लोक २.८६ मध्ये दिली आहे)

पाणिनीय व्याकरणाच्या दृष्टीने –

| | |
|---|---|
| वृष्टिमान् + इव | |
| ↓ | |
| रु | दीर्घादटि समानपदे (पा. ८.३.९) सूत्राने 'न्' ला रु त्व |
| ↓ | |
| य् | भोभगोअघोअपूर्वस्य योऽशि (८.३.१७) सूत्राने रु या 'य्' आदेश |
| ↓ | |
| ~~य्~~ | लोपः शाकल्यस्य – (८.३.१५) |
| वृष्टिमा + इव | |
| वृष्टिमान् + इव | आतोऽटि नित्यम् (पा. ८.३.३) सूत्राने दीर्घ आकाराला नित्य अनुनासिकत्व आहेत वृष्टिमाँ इव |

## ९. प्रकीर्ण (कारिका ९१ पासून ९७ पर्यंत)

**च. एते ककारादयो मकारावसानाः कृष्णाः पञ्चविंशतिः स्पर्शाः व्याख्याताः शनैश्चरदेवत्याः । चत्वारोऽन्तस्था यरलवाः कपिलवर्णा अग्निदेवत्याः । चत्वार ऊष्माणः शषसहा अरुणवर्णा आदित्यदेवताः । एवं त्रयस्त्रिशद्व्यञ्जनानि ।**

(स्वरांच्या देवता, वर्ण पूर्वी सांगितले आहेत (कारिका १.१-५) आता व्यंजनांचे सांगत आहेत.)

१. क पासून म पर्यंतचे पंचवीस वर्ण **स्पर्श** होत आणि कृष्ण रंगाचे होत. यांची देवता शनी होय.

२. य्, र्, ल्, व् हे चार **अन्तस्थ,** पिंगटवर्णांचे होत यांची देवता अग्नी आहे.

३. श्, ष्, स्, ह् हे चार **ऊष्म** वर्ण होत हे **अरुण** वर्णाचे आणि आदित्य देवता असणारे आहेत. अशाप्रकारे**३३** व्यंजने आहेत.

**स्पष्टीकरण-**

**१.स्पर्श वर्ण**

आभ्यन्तर (अंतर्गत मुखातील) स्थाने

| **करण** | **स्थान** | | |
|---|---|---|---|
| जिह्वामूल | कंठ | क वर्ग | ५ वर्ण |
| जिह्वामध्य | तालु | च वर्ग | ५ वर्ण |
| जिह्वोपाग्र | मूर्धा | ट वर्ग | ५ वर्ण |
| जिह्वाग्र | दन्त | त वर्ग | ५ वर्ण |
| अधरोष्ठ | उत्तरोष्ठ | प वर्ग | ५ वर्ण |
| | | | = २५ स्पर्श वर्ण होत |

**२. अन्तस्थ-** स्पर्श आणि ऊष्माच्या मध्ये असल्याने य्, र्, ल्, व् हे अन्तस्थ होत.

ऋक्प्रातिशाख्यात चतस्रोऽन्तस्थास्ततः (ऋक्प्रा. १.९) या सूत्रावरील भाष्यात उवट म्हणतात ''स्पर्शोष्मणामन्तर्मध्ये तिष्ठन्तीति अन्तस्थाः''

**अ.** पाणिनीय व्याकरणात माहेश्वर सूत्रात स्वर आणि व्यंजन यामध्ये असल्याने यांना अन्तस्थ म्हणतात.

**ब.** संधी करताना इ, उ, ऋ, ऌ (इक्) या स्वरांच्या जागी य्, व्, र्, ल् (यण्) वर्ण येतात. त्याच प्रमाणे य्, व्, र्, ल् या वर्णांचे संप्रसारण होताना इय्, उव् असे संप्रसारण होताना या मध्ये स्वर, व्यंजन हे दोनही गुणधर्म दिसतात. म्हणून उच्चारण धर्माच्या दृष्टीने यांना अन्तस्थ म्हणतात.

**ऊष्म** वर्णांच्या उच्चारणाचे वेळी वायूच्या संघर्षाने ऊष्मा निर्माण होते. म्हणून हे नावही सार्थक आहे.

संयोगपिण्डाचे संबंधात विचार करताना संज्ञा भिन्न होण्यासाठी **करण, स्थान** हे महत्त्वाचे आहेत. यापैकी करणांचा विचार याठिकाणी केला आहे.

**छ. चतुर्विधं करणम् स्पृष्टमस्पृष्टं संवृतं विवृतश्चेति स्पृष्टाः स्पर्शाः, अस्पृष्टा अन्ये, संवृता घोषाः, विवृता अघोषाः, विंशतिर्घोषास्त गजडदबा घझढधभा ङञणनमा, यरलवा हकारश्चेति । त्रयोदशाऽघोषास्ते कचटतपा खछठथफाः शषसाश्चेति ।**

**करण (पाणिनीय परंपरेत यांनाच आभ्यंतर प्रयत्न म्हटले आहे.)**

करण चार प्रकारचे आहेत.स्पृष्ट, अस्पृष्ट, संवृत, विवृत

स्पर्श वर्ण – **स्पृष्ट** करण (प्रयत्न)

अन्य वर्ण (अन्तस्थ, ऊष्म) – **अस्पृष्ट** यत्न

घोषवर्ण – **संवृत** (वर्गीय ३, ४, ५ वर्ण) य्, र्, ल्, व्, ह् = २०) (घोषवर्ण एकूण वीस आहेत.)

अघोषवर्ण – **विवृत** (वर्गीय १,२ वर्ण, श, ष्, स् = १३) (अघोषवर्ण ऐकूण तेरा आहेत.)

**ज. दशधा वर्णा भवन्ति – औरस–कण्ठ्य–मूर्धन्य–दन्त्योष्ठ्य–तालव्य–दन्तमूलीय–जिह्वामूलीय–यमानुस्वारश्चेति ।**

**वर्णांची स्थाने**

स्थानदृष्ट्या १० प्रकारचे वर्ण असतात

१. औरस – उरसिजाता: – उर:स्थानातून निर्माण झालेले

२. कण्ठ्य – कण्ठेजाता:

३. मूर्धन्य – मूर्धनिभवा:

४. तालव्य – तालुनिभवा: तालव्या:

५. दन्त्य – दन्तेषुजाता: दन्त्या:

६. ओष्ठ्य – ओष्ठयोर्भव: ओष्ठ्या:

७. दन्तमूल – दन्तमूलेभवा:

८. जिह्वामूलीय – जिह्वामूलेभव:

९. यम – यम संज्ञक वर्ण }

१०.अनुस्वार – अनुस्वार } व्याख्यास्येते (पृष्ठ १८१ कारिका २.९१)

वर्णांचे आठ भेद त्यांच्या उच्चारण स्थानाच्या आधारावर केले आहेत. परंतु यम, अनुस्वार यांचा निर्देश केवळ वर्णांच्या दृष्टीने केला आहे. यम, अनुस्वार यांचे स्थान नासिका आहे. या स्थानांचा निर्देश येथे केलेला नाही.

**अ. तत्र द्वावौरसौ ह्य इति ह्व इति च ।**

**कोणत्या वर्णांचे कोणते स्थान**

त्या वर्णांमध्ये दोन औरस वर्ण होत. ह्व, ह्व – वर्गपञ्चमै: अन्तस्थाभिश्च युतो द्विविधो हकारो ह्व, सदृश: ह्वसदृश: औरसो ज्ञेय: ।

उदा. सिꣳह्यसि (मा.सं.५.१०)

दुदुहेऽअह्वयः (मा.सं.३.१६)

इत्यादीमध्ये असणारा हकार औरस होय. याचे करण हनुमूल हे आहे.

ह्व, ह्न हे संयुक्त हकाराचे उपलक्षण समजावे.वर्ग पंचम आणि अंतस्थांशी संयुक्त होणारा कोणत्याही ह चे उच्चारण स्थान औरस होय.

याज्ञ. शि. वर्णप्रकरणात (५७) मध्ये सांगितलेले आहे.

हकारं पञ्चमैर्युक्तमन्तस्थाभिश्च संयुतम् ।
**औरसं** तं विजानीयात् कण्ठ्यमाहुरसंयुतम् ।। ५७ ।।

पाणिनीय शिक्षेतही हीच कारिका काही भेदाने आलेली आहे. औरसच्या ऐवजी **उरस्यं** असा पाठ पाणिनीय शिक्षेत (१६) आला आहे.

शिक्षावल्ली टीकाकारांनी औरस **ह्** चे करण हनुमूल मानले आहे. कण्ठ्य वर्णांप्रमाणेच औरस 'ह' चे करण हनुमूल मानणे आवश्यक आहे.

**ञ. त्रयः कण्ठ्याः अ आ आ३ इत्यवर्ण–हकार–विसर्जनीया इति ।**

तीन वर्ण कण्ठातून उत्पन्न होतात. अ, आ, आ३ हे तीन (ह्रस्व, दीर्घ, प्लुत) असणारा 'अ', 'हकार', 'विसर्ग'

विसर्गसहित या सर्व वर्णांचे स्थान कण्ठ हे आहे. त्याच प्रमाणे यांचे करण 'हनुमूल' आहे. असे शिक्षावल्ली चे म्हणणे आहे. परंतु वाजसनेय–प्रातिशाख्यात जिह्वामूलीय आणि अनुस्वार यांचे करण हनुमूल सांगितले आहे. कण्ठ्यवर्णांचे करण हनुमध्य सांगितले आहे.

जिह्वामूलीयानुस्वारौ हनुमूलेन (शु. य. प्रा. १.८३) कण्ठ्याः मध्येन (शु. य. प्रा. १.८४)

**ट. षण्मूर्धन्याः ट ठ ड ढ ण षा इति**



**मूर्धन्य**

ट्, ठ्, ड्, ढ्, ण् आणि ष् हे सहा मूर्धन्य होत.

यांचे उच्चारण स्थान मूर्धा (तालूचा वरील भाग) हे आहे. या स्थानी प्रतिवेष्टित जिह्वाग्राच्या साह्याने उच्चारण होते. म्हणून यांचे करण **प्रतिवेष्टित जिह्वाग्र** हे आहे.

प्रतिवेष्ट्याग्रम् (शु.य.प्रा.१.७८) या सूत्रातही यांचे करण प्रतिवेष्टितजिह्वाग्र सांगितले आहे.

**ठ. नव तालव्याः इ ई ई३ इतीवर्ण च छ ज झ ञ यशा एकारश्चेति ।**

**तालव्य**

इ, ई, ई, उ या तीनकाळाचा इ[१] वर्ण, च्[२], छ्[३], ज्[४], झ्[५], ञ्[६], य्[७], श्[८], ए[९]कार हे नऊवर्ण तालव्य होत.

यांचे उच्चारण तालुस्थानी जिह्वामध्य करणाच्या साह्याने होते. अर्थात यांचे करण जिह्वामध्य आहे.

तालुस्थानानां मध्येन (शु.य.प्रा.१.७९) इचशैयास्तालौ (शु.य.प्रा.१.६६)

या दोन सूत्रांनी एकाराला तालव्य मानले आहे. शिक्षाकारांचे मत देखील हेच स्थान आहे.

**ड. अष्टौ दन्त्याः लृ लॄ लॄ३ इति लृवर्ण त थ द ध न लकारसकारा इति ।**

**दन्त्य**

लृ, लॄ, लॄ३ (हे तीन भेद असणारा) लृ, त्, थ्, द्, ध्, न्, ल कार आणि स् कार हे आठ दन्त्य वर्ण होत.

वाजसनेयशाखेत दीर्घ लृकार नाही परंतु या ठिकाणी याचा उल्लेख आला आहे. अर्थात हे विधान भिन्नशाखेचे समजणे आवश्यक आहे. ''लॄ'' माध्यन्दिन शाखेत नसल्याचे विधान याज्ञवल्क्यशिक्षेत पूर्वीच सांगितले आहे.

'लृकारस्य तु दीर्घत्वं नास्ति वाजसनेयिनः ।' (याज्ञ.शि.व.प्र.२०)

दन्त्य वर्णांचे करण **जिह्वाग्र** हे आहे. दन्त्याः जिह्वाग्रकरणाः (शु.य.प्रा. १.७६)

**ढ. नव ओष्ठ्याः उ ऊ ऊ३ इत्युवर्ण प फ ब भ म वकारोपध्मानीया ओकारश्चेति ।**

उ, ऊ, ऊ३ या तीन प्रकार असणारा उ, प्, फ् , ब्, भ्, म्, व्, उपध्मानीय, ओ हे नऊ वर्ण ओष्ठ स्थानाहून निर्माण झालेले आहेत. या वर्णांचे स्थान आणि करण दोन्हीही 'ओष्ठ' हे आहेत.

उवौपोध्माओष्ठे (शु.य.प्रा. १.७०) समानस्थानकरणाः नासिकयौष्ठ्याः (शु. य. प्रा. १.८०) या सूत्रातही नासिक्य आणि सर्व ओष्ठ्य वर्णांचे समान, स्थान, करण सांगितले आहे.

'ऐ', 'औ' या दोन वर्णांचा निर्देश या ठिकाणी केलेला नाही. म्हणून एकारास ऐकायचे आणि ओकाराला औकारांचे उपलक्षण मानणे आवश्यक आहे असे मानल्याने ए, ऐ तालव्य आणि ओ, औ ओष्ठ्यरूपात स्वीकृत होतील.

हे शाखाभेदाने प्रचलित असू शकतील. सन्ध्यक्षरांची द्विस्थानता सर्वसंमत नाही.

सन्ध्यानि सन्ध्यक्षराण्याहुः द्विस्थानतैतेषु तथोभयेषु (ऋ. प्रा. १३.३८) तसेच

आद्यामात्रा तु कण्ठ्यस्य एकारौकारयोर्भवेत्।
तालव्यस्य तथौष्ठस्य द्वितीया च यथाक्रमात्।। (याज्ञ.शि.२.२०)

**स्पष्टीकरण**– याज्ञवल्क्य शिक्षेत अशा प्रकारे दोन विरुद्ध मतांचा समन्वय शाखाभेदातील भिन्नमत मानून करणे आवश्यक आहे. शुक्लयजुःप्रातिशाख्यात वरील दोनही मतांहून एका अंशाने भिन्न आहे आणि दुसऱ्या अंशाशी समान भाग सांगितला आहे.

त्यानुसार ए – तालव्य परंतु (इचशैयास्तालौ (शु.य.प्रा. १.६६))

ऐ – कण्ठ तालव्य होय

ओ – ओष्ठ्य – उवौपोपध्मा ओष्ठे (शु. य. प्रा. १.७०)
औ – कण्ठोष्ठ्य होय

ऐ आणि औ ची द्विस्थानता **ऐकाररौकारयो: कण्ठ्या पूर्वामात्रा ताल्वोष्ठ्योरुत्तरा** (शु.य.प्रा. १.७३)

ओष्ठ्यवर्णाचे स्थान आणि करण दोन्ही ओष्ठ्य आहेत परंतु वरील ओष्ठ हे स्थान होय, तर अधरोष्ठ करण होय.

हे अथर्व प्रातिशाख्यावरून स्पष्ट होते (१.२५) **ओष्ठ्यानामधरौष्ठम् –** या सूत्राने सुचविलेले आहे.

तै.प्रा. मध्ये (२.३९) ओष्ठाभ्यां पवर्गे – या सूत्रावरील विभाष्यरत्न टीकेत म्हटले आहे –

**''अत्र उत्तरोष्ठ: स्थानम् उत्तरत्वसाम्यात्। एषां स्थानानामधरौष्ठ: करणम्।''**

या नियमाला 'व' वर्ण अपवाद आहे. वो दन्ताग्रै: (शु. य. प्रा. १.८१) या सूत्रानुसार शु. या. प्रा. च्या मतानुसार 'व' काराचे करण दन्ताग्र होय. तै.प्रा. (२.४३) या सूत्रानुसार **ओष्ठान्ताभ्यां दन्तैर्वकारे** 'व' काराचे उच्चारण दन्त किंवा ओष्ठान्त यापैकी कोणते स्थान व कोणते करण आहे हे स्पष्ट होत नाही.

पाणिनीने 'व'कारास दन्तोष्ठ मानले आहे. **दन्त्योष्ठ्यो व: स्मृतो बुधै:।** या वचनानुसार दन्ताचा समावेश करण या अभिप्रायाने आवश्यक आहे.दन्त हे करण तसेच ओष्ठ हे स्थान असल्याने 'व'कारास **दन्त्योष्ठ्य** म्हटले आहे.

**२. अन्य समाधान –** अधरोष्ठ हे करण होय. त्या करणाद्वारा दन्त तसेच उत्तरौष्ठ स्थानाचा स्पर्श होऊन 'व' चे उच्चारण होते, म्हणूनच पाणिनीय शिक्षेत 'व'कारास दन्त्यौष्ठ म्हणणे योग्य ठरते. ''व'' च्या उच्चारणात दन्त आणि उत्तरौष्ठ स्थानी असल्याने त्यांची दन्त्योष्ठता सिद्ध होते.

तै.प्रा. (२.४३) या वरील त्रिभाषारत्न टीकेमध्ये वरील दातांना स्थान आणि खालील ओष्ठांताला करण मनाले आहे.

वकारे कार्ये अधरोष्ठान्ताभ्याम् उत्तरदन्ताग्रैः सह स्पर्शयेत्।
दन्तैः इति स्थाननिर्देशः। ओष्ठान्ताभ्यां इति करणनिर्देशः ।

या सूत्रावरील **वैदिकाभरण** टीकेमध्ये म्हटले आहे. ओष्ठांच्या बाह्य व आभ्यन्तर भाग भिन्न असल्याने ''ओष्ठान्ताभ्याम् ।'' या पदात द्विवचनाचा प्रयोग केला आहे. द्विवचनी प्रयोग असल्याने परंतु एकाचवेळी बाहेरील व आतील भागांचा स्पर्श दातांसोबत कसा होऊ शकेल अशी शंका येते. या शंकेच्या समाधानासाठी टीकाकारांनी सूचित केले आहे की – 'व'काराचे उच्चारण स्वभावतः खालच्या ओठाच्या आतील भागाच्या कडांनी होते. कधी कधी खालच्या ओठाच्या बाहेरील कडांनी सुद्धा होते.

ज्या वेळी 'व'काराचे उच्चारण दोन ओष्ठ्य स्वरांच्या मध्यभागी असताना होते त्यावेळी ते खालील ओठाच्या बाहेरील कडांच्याद्वारा होते.परंतु अन्य अवस्थेत 'व'काराचे उच्चारण खालील ओष्ठाच्या आतील कडांच्या आधारे होते.

''वकारोत्पत्तौ स्वभावतोऽधरोष्ठस्याभ्यन्तरे अन्तःकरणं भवति । यत्र त्वसौ ओष्ठ्योपसंहारयोरोष्ठ्यस्वरयोर्मध्यवर्ती भवति तत्र सामर्थ्यात् बाह्योऽन्तःकरणम्'' (तै. प्रा. २-४३ वरील वैदिकाभरण टीका.)

स्थानभेद आणि कालभेद या भेदांनी वर्णांच्या उच्चारणात भेद पडू शकतो. म्हणूनच वर्णोच्चारांच्या संदर्भात प्रातिशाख्ये आणि शिक्षा यांची विधाने पाहणे आवश्यक आहे.

**ढ. एको दन्तमूलीयो रेफः**

दन्तमूल स्थानातून निर्माण होणारा 'र्' हा एक वर्ण आहे.

**स्पष्टीकरण**–वाजसनेय प्रातिशाख्यानुसार 'र्' चे करण जिह्वाग्र आणि स्थान दन्तमूल आहे. रश्च (१.७७), रोदन्तमूले (१.६८) या सूत्रातून हे स्पष्ट होते. पाणिनीयशिक्षेमध्ये 'र्' ला मूर्धास्थान सांगितले आहे. स्युर्मूर्धन्या ऋटुरषाः (पा. शि. १७)

पाणिनीय सूत्रात्मक शिक्षेत 'र्' च्या एका अन्यस्थानाचा संकेत दिला आहे. ''रेफो दन्तमूलीय एकेषाम् (पा.शि. सू. स्थान प्रकरण १०).

ज्या आचार्यांच्या मते 'र्' चे दन्तमूलस्थान आहे त्यांच्या मते प्रस्तीर्ण जिह्वाग्राचा मध्य हे करण होय, कारण तै.प्रा. मध्ये 'र्' च्या उच्चारणात दन्तमूलांच्या अंतर्भागात जिह्वाग्रामध्याने स्पर्श होण्याचे विधान केले आहे. ''रेफो जिह्वाग्रमध्येन प्रत्यग् दन्तमूलेभ्य: ।'' (तै. प्रा. २.४१) याच प्रमाणे अथर्व प्रातिशाख्यात दन्त्यवर्णांचे करण विस्तीर्ण जिह्वेचा अग्रभाग असल्याचे म्हटले आहे. ''दन्त्यानां जिह्वाग्रं प्रस्तीर्णम्'' (१.२४) रेफस्य दन्तमूलानि - (अथर्व प्रा. १.२८)

या सूत्रांद्वारा दन्तमूलास 'र' चे करण सांगितले आहे. वस्तुत: 'र्' चे स्थान दन्तमूल मानणे आवश्यक आहे.

ऋक्प्रातिशाख्याच्या ''सकाररेफलकारश्च'', रेफं बर्स्व्यमेके (ऋ.प्रा.१.४५, ४६) या सूत्रांमध्ये 'र्' ला दन्तमूलीय तर काही आचार्यांच्या मते बर्स्व्य अर्थात दन्तमूलाच्या वरील स्थानी निष्पन्न होणारा वर्ण मानले आहे.

खरे तर तै. प्रा. मध्ये ''प्रत्यग् दन्तमूल'' असे म्हणून **बर्स्व** स्थानाची स्वीकृती दिली आहे. 'र्' ला बर्स्व स्थानापासून निष्पन्न वर्ण मानल्याने 'र' च्या 'ल्' कारापासून भेद स्पष्ट होतो.

ज्या आचार्यांच्या मते 'र्' आणि 'ल्' दोन्ही वर्ण दन्तमूल आहेत या दोन्ही वर्णांचा प्रयत्नही एक असल्याने दोन्ही वर्णांचा भेद दाखविणारे कोणतेही तत्त्व राहत नाही.

सूत्रात्मक पाणिनीय शिक्षेत ही समस्या येत नाही. कारण 'र' ला मूर्धन्य मानले आहे तर काही आचार्यांच्या मतानुसार दन्तमूल मानले आहे आणि 'ल'काराचे स्थान **दन्त्य** मानले आहे. यामुळे 'र्', 'ल्' यातील भेद स्पष्ट आहे.

ज्या आचार्यांनी ‘र्’ ला मूर्धन्य मानले आहे त्यांच्या मते जिह्वोपाग्र हे याचे करण आहे. ‘‘जिह्वोपाग्रेण मूर्धन्यानाम्, जिह्वाग्राधः करणं वा’’ (पा. शि. करण प्र. ५.८)

या ठिकाणी प्रतिवेष्टित जिह्वाग्राच्या अधोभागाचा स्पर्श मूर्धेस होतो. मूर्धन्य वर्णांचे करण अथर्व प्रातिशाख्यात (१.२२) प्रतिवेष्टित जिह्वाग्र सांगितले आहे.

**मूर्धन्यानां जिह्वाग्रं प्रतिवेष्टितम् ।**

वाजसनेय प्रातिशाख्याचे मत देखील या विषयाला अनुकूल आहे. शिक्षावल्लीकारांनी जिह्वामध्याचे करणाचा स्पर्श मूर्धेला होऊन ‘र्’ ला मूर्धन्य मानले आहे. परंतु बहुतेक सर्व प्रातिशाख्यांनी मूर्धन्य वर्णांचे करण प्रतिवेष्टित जिह्वाग्रच मानले आहे. केवळ तैत्तिरीय प्रातिशाख्यातच ‘र्’ साठी जिह्वाग्र मध्य करण सांगितले आहे. ही जिह्वाग्रमध्य करणता देखील दन्तमूलीय रेफाची होय. मूर्धन्य रेफाची नाही. म्हणून शिक्षावल्लीकारांचे जिह्वामध्य हे करण असल्याचे मत उचित वाटत नाही.

**त. सप्त जिह्वामूलीयाः ऋ , ॠ , ऋ३ इत्यृवर्ण ≍क – क ख ग घ ङइति ।**

ऋकार (ह्रस्व, दीर्घ, प्लुत या भेदांसह), जिह्वामूलीय ≍क, क वर्ग – (क्, ख्, ग, घ, ङ) हे सात वर्ण जिह्वामूलापासून उत्पन्न होतात. यांचे हनुमूल हे करण होय. वाजसनेयप्रातिशाख्यानुसार देखील या वर्णांचे उच्चारण स्थान जिह्वामूल आणि हनुमूल हे करण सांगितले आहे.

**ऋ ≍कौ जिह्वामूले (१.६५)**

**जिह्वाह्मूलीयानुस्वारा हनुमूलेन** (१.८३) पाणिनीय शिक्षेत मात्र **ऋ** वर्णास मूर्धन्य म्हटले आहे. परंतु याचा वरील वचनाशी विरोध नाही. जिह्वाग्र करण असताना मूर्धास्थान उपपन्न होते. प्रकिया लाघवासाठी पाणिनीने ‘रे’फा प्रमाणे ‘ऋ’ ला देखील मूर्धन्य मानले आहे.

असे जाणवते की ऋकाराच्या उच्चारणात ध्वनीच्या दृष्टीने वेळोवेळी आणि स्थान भिन्नतेने भेद होत राहतो.

ऋक्प्रातिशाख्य आणि वाजसनेयिप्रातिशाख्य ऋकाराचे स्थान जिह्वामूल सांगतात. याज्ञवल्क्य शिक्षेतही ऋकाराचे स्थान जिह्वामूल हेच सांगितले आहे.

पाणिनीयशिक्षेत (सूत्रात्मक आणि श्लोकात्मक) दोन्ही ठिकाणी यास मूर्धन्य म्हटले आहे. तै.प्रा. (२.१८) मध्ये ऋकारास बर्स्व्य मानले आहे.

अशाप्रकारे ऋकाराच्या उच्चारणाविषयी तीन मते दिसतात.

१. ऋक्प्रातिशाख्य (१३.३४)<br>
वाजसनेयप्रातिशाख्य (४.१४६) } जिह्वामूल

२. पाणिनीय शिक्षा सूत्रात्मक – सरेफ ऋवर्ण: (स्थान प्रकरण २३) – मूर्धा

३. तै. प्रा. – बर्स्व्य

अथर्वप्रातिशाख्यानुसार (१.३७) ऋकारामध्ये रेफाचा अंश तसेच त्याच्या दोन्ही बाजूंनी स्वराचा अंश स्वीकारला आहे. मूळ स्वर देखील तीनच आहेत. अ, इ, उ. सर्वच ग्रंथांमध्ये रेफाचा निर्देश स्पष्ट केलेला आहे परंतु मागे पुढे असणारे कोणते स्वर असतील याचा निर्देश केलेला नाही.

उच्चारणात अनेक ठिकाणी वैविध्य आहे. त्यानुसार तीनही स्वर संगत वाटतात. ज्यांच्या मध्ये ऋकाराच्या दोन्ही बाजूनी ''अ'' ही स्वर भक्ती आहे.त्यांच्यामते ऋकाराचे उच्चारण स्थान जिह्वामूलीय असू शकेल कारण ''अ'' चे उच्चारण स्थान कंठ आहे.

आणि कंठ आणि जिह्वामूल हे जवळ जवळ आहेत. या मतानुसार ऋकाराचे स्थान मूर्धन्यही संभव आहे कारण ''र'' च्या उच्चारणात जिह्वाग्राचा स्पर्श मूर्धेला होतो.

ज्यांच्या मतानुसार दोन्ही बाजूला 'ई' ही स्वरभक्ती आहे.त्यांच्या मतानुसार ऋकारमूर्धन्य किंवा बर्स्व्य आहे.

ज्यांच्या मतानुसार ऋकाराच्या दोन्ही बाजूंनी 'उ' आहे.त्यांच्या मतानुसार ऋकार बर्स्व्य आहे कारण उ चे उच्चारण स्थान ओष्ठ हे आहे हे बर्स्व्य च्या जवळ आहे.

अशा प्रकारे तीनही उच्चारणाची भिन्नतेचे कारण समजू शकते.

उत्तर भारतात 'ऋ' चे उच्चारण 'रि' होते. महाराष्ट्र, गुजराथ किंवा दक्षिण भारतात 'ऋ' चे उच्चारण 'रु' होते.

**थ. चत्वारो यमा: कुँ खुँ गुँ घुँ।**

वर्गीय व्यंजनां पैकी प्रथम, द्वितीय, तृतीय, चतुर्थ वर्ण अनुनासिक विशिष्ट झाल्यावर चार प्रकारचे यम होतात.

कुँ, खुँ.... इत्यादींमध्ये जो उकार आला आहे तो सादृश्य प्रतिपादनासाठी आला आहे आणि अर्धचंद्र बिंदूसह दाखविला आहे तो अनुनासिक द्योतित करण्यासाठी दिला आहे. यातील क, ख, ग, घ हे वर्ण प्रत्येक वर्गातील प्रथम, द्वितीय, तृतीय, चतुर्थ वर्णांचे उपलक्षण आहे. म्हणून जातिपक्षी चार परंतु व्यक्तिपक्षी २० यम होतात. यांचे उच्चारणस्थान वाजसनेय प्रातिशाख्यानुसार नासिका सांगितले आहे. **''यमानुस्वारनासिक्यानां नासिके'' (वा.प्रा.१.७४)** या यमांचे करण नासिकामूल आहे. नासिकामूलेन यमा: (१.८२) यमां मधील अनुनासिक आणि वर्गीय नासिक्य पंचम वर्ण या मधील भेद केवळ करणाच्या आधारावर आहे.

हुँ चे स्थान आणि करण नासिका आहे तर अनुनासिक आणि वर्गीय पंचमवर्ण यांचे स्थान मुख आणि नासिकामूल आहे.

यमांची स्वतंत्र वर्णांमध्ये गणना होत नाही, परंतु मात्रा काळाचा विलंब असल्याने विच्छेदच यम होत. रुक्ँम इत्यादींमध्ये संयोगादि रुकाराचे उच्चारण करताना निर्माण होणारा प्रयत्न संयोगादि रुकाराचे उच्चारण करून नासिकामूलाशी संपतो आणि पुन्हा तत्सजातीय अन्य अनुनासिक रुकाराच्या उच्चारणात प्रवृत्त झाल्यानंतर ककारतुल्य स्पष्ट श्रुतीचे उत्पादन करीत नाही नासिक आणि त्या त्या स्थानात मात्राकाळापर्यंत थांबून नासिक्यगुणयुक्त होऊन अनुप्रदानादि कारणांनी उत्पन्न धर्माने युक्त होऊन अपश्रम चार वर्णांच्या सदृश मुखात धारण करण्याने विच्छेदरूप **यम** म्हटले जाते. **वर्णस्वरूपाचा अभाव असल्याने वर्णसमाम्नायात यांचा अंतर्भाव होत नाही.**

अनुस्वारयमानां च नासिका स्थानमुच्यते अयोगवाहा विज्ञेया आश्रयस्थान भागिनः ।। (पा.शि.२२)

(यम संबंधी अधिक विवेचन याज्ञवल्क्य शिक्षेच्या वर्ण प्रकरणातील कारिका २.९१ मध्ये दिले आहे.)

**अथ सप्तविधाः संयोगपिण्डाः – अयःपिण्डो दारुपिण्ड ऊर्णापिण्डो ज्वालापिण्डो मृत्पिण्डो वायुपिण्डो वज्र पिण्डश्चेति ।**

(पदोच्चारणाचे वेळी व्यंजनांचे संयोग (संधी) होतात त्यांची उच्चारण वैशिष्ट्ये.)

स्वराचे व्यवधान नसताना व्यंजनांचे जे समूह तयार होतात तेच पिंड होत. सातप्रकारचे संयोग पिंड असतात.

**अय:पिण्ड, दारुपिण्ड, ऊर्णापिण्ड, ज्वालापिण्ड, मृत्पिण्ड, वायुपिण्ड, वज्रपिण्ड**

या पिण्डांचे स्पष्टीकरण व उदाहरणे पुढे दिली आहेत.

स्वरांचे व्यवधान नसणाऱ्या व्यंजनांच्या एकत्र येण्यास संयोगपिण्ड म्हटले आहे.

**१. अयःपिण्ड–** यमसंज्ञक वर्णांचा संयोग अयःपिण्ड होय. लोखंडाच्या गोळ्याप्रमाणे असणारा पिंड अयःपिण्ड होय. लोखंडाप्रमाणे घट्ट असूनही ज्यातील व्यंजने स्वतंत्रपणे स्पष्ट दाखविता येतात असा संयोग पिंड अयःपिण्ड होय.

उदा. **अग्निः** – (मा.सं.२३.१७) या ठिकाणी गकाराचा (अपञ्चमवर्णाचा) न् काराशी (पंचमवर्णाशी) संयोग आहे. या दोन वर्णात अन्य गकाराची उत्पत्ती होते. यासच यम असे म्हटले आहे. हा यम पूर्व अक्षराचे अंग बनतो.

अग्ग्नँः – नकाराच्या पूर्ववर्ती गकार हा यम आहे, आणि हा पूर्ववर्ती अकाराचा अंग आहे. अयःपिण्ड असल्याने ‘न’ पूर्वीचा गकार (यम) आपल्या अगोदरच्या अकाराशी संश्लिष्ट होतो त्यावेळी न् कारापासून विभक्त होतो.

अन्य उदाहरणे– अग्निः (मा.सं. २३.१७), पत्क्नीः (मा.सं. २७.२०), यक्क्ना (मा.सं. ३९.८)

**२. दारुपिण्ड**– अंतःस्थयुक्त संयोग पिंडास दारुपिण्ड म्हणतात. दारुपिण्डातील घटक अवयवांचा संधी काही प्रमाणात शिथिल असतो. या ठिकाणी विलग होऊनही काही अवयवांची स्वतंत्र श्रुती राहते. दारुपिण्ड म्हणजे लाकडी गोळा होय.

उदा. **व्विल्म्मिने**... (मा.सं. १६.३५) या उदाहरणात लकार हा संयोगादी आहे आणि पुढील म् कार हा क्रमज असल्याने दोन्ही वर्ण 'वि' मधील इ चे अंग बनतात आणि विल्म् असे उच्चारण करताना लकारापासून मकाराची स्वतंत्र श्रुती येते.

अन्य उदाहरणे– अश्श्वंः (मा.सं. २४.१), सूर्र्य्यः (मा.सं. ३.९), व्विश्श्वजनस्य (मा.सं. ५.२८), व्वीर्र्यम् (मा.सं. १९.९)

**३. ऊर्णापिण्ड**– अंतःस्थ वर्ण व यम संज्ञक वर्ण यां रहित व्यंजनांच्या संयोगास ऊर्णापिण्ड म्हणतात. ऊर्णा अर्थात लोकरीच्या गोळ्या प्रमाणे असणारा संयोग ऊर्णापिण्ड होय. ऊर्णापिण्डातील अवयव तुटल्यानंतर परत एकत्र येत नाहीत.

ऊष्म वर्णाशी संयोग असताना ऊष्म व स्पर्श वर्णांची स्वतंत्र श्रुती होते.

उदा. **पाशैस्त्मना** (मा.सं. २०.४५) इत्यादि ठिकाणी स्कार हा संयोगादी आहे तसेच त्कार क्रमज आहे या दोहोंचे पूर्वांगत्व होते. 'शैस्त्' यांचे उच्चारण केल्यानंतर स्कार व त्काराची स्वतंत्र श्रुती होते.

यमांच्या संयोगाचे वैशिष्ट्य दिसून येत नाही, अशा प्रकारचा संयोग असेल तर यमाचे उच्चारण होत नाही तसेच त्याचे स्वतंत्र श्रवणही होत नाही.

सम्माज्जिर्म

आ + र् + ज् + ज् + म् + इ



१. म् पंचम वर्ण असल्याने त्याच्या अगोदरचा ज् यम मानणे शक्यआहे. अशा स्थितीत र् आणि ज् चा संयोगपिण्ड दारुपिण्डाप्रमाणे आहे तर ज्, ज् चा संयोग अयःपिण्डाप्रमाणे आहे. या अवस्थेत 'र्' चे श्रवण प्रधानरूपाने होणार आहे.

२. यम हा संयोगपिण्डात न स्वीकारल्यास 'र् ज्' हा दारुपिण्ड व 'ज् ज्' यांचा संयोग अयःपिण्ड होईल.

वरील दोन्ही प्रसंगी 'र्' चे प्राधान्य असणारच आहे म्हणून अंतःस्थ (र्) ला पिण्डनायक म्हटले आहे.

अन्य उदाहरणे– अश्म्मन् (मा.सं.१७.१), कृष्ण्णं÷ (मा.सं.२.१), अमुष्म्मिन् (मा.सं.१७.२),आस्म्मिन् (मा.सं.३.१), कुक्कुटः (मा.सं.१.१६)

४. **ज्वालापिण्ड**– नासिकेने उच्चारित वर्गीय पंचमवर्णांचा (ञ्, म्, ङ्, ण्, न्) हकाराशी संयोग हा ज्वालापिण्ड होय. ब्रह्म (मा.सं. १३.३), वह्नितमम् (मा.सं. १.८) या ठिकाणी ह्कारानंतर नासिक्यवर्णाचे उच्चारण होते तरीही ह्कारातील उष्मताही नासिक्याच्या अनुनादाने अभिहत (खंडित होते) **परिणामी नासिक्य वर्णाचे श्रवण ह् वर्णाच्या पूर्वी होते.**

एखाद्या वस्तूच्या संयोगाने ज्वाला अन्य प्रान्तातही जाते तसेच हकारा सहित नासिक्य वर्णाच्या संयोगाने श्रवणाच्या दृष्टीने नासिक्य वर्ण अन्यदेशी गमन करतो म्हणून यास ज्वालापिण्ड म्हटले आहे.

उदा. ब्रह्मं (मा.सं. १७.२), वह्निंतमम् (मा.सं. १.८), गृह्ण्णामि (मा.सं. ९.२)

५. **मृण्मयपिण्ड**– अनुस्वारयुक्त पिंडास मृण्मयपिण्ड म्हटले आहे. मृत्पिंडात मधे मध्ये गाठी दिसतात तसेच अनुस्वारयुक्त संयोगात मधेमध्ये अन्यांचे ही श्रवण होते.

अनुस्वाराने नासिक्य रंगाचे ग्रहण केले जाते.

उदा. लोकाँ२।। अकल्पयन्... (मा.सं. ३१.१३), ताꣳसवितुः (मा.सं. १७.७४), सꣳस्थाम् (मा.सं. १९.२९), यामैय्यँश्चन्द्रमसि (मा.सं. १.२८)

**६. वायुपिण्ड**– उपध्मानीय वर्णांनी युक्त संयोगास वायुपिण्ड म्हणतात. प्, फ् वर्णांच्या पूर्वी विसर्गाच्या उच्चारणाचे वेळी उपध्मान अर्थात वायूच्या आघाताने गंभीर ध्वनी निर्माण होतो. अशा सर्व स्थलांना सोपध्मान म्हणता येईल.

''सवितः प्रसुव...'' पाणिनीने जो अर्ध विसर्ग सांगितला आहे. या अर्थाने माध्यंदिन संहितेत प्रयोग नाही.

उदा. देवं सवितःप्रसव (मा.सं. ९.१), द्यौष्पिता (मा.सं. २.११), याः फलिनीः (मा.सं. १२.२९)

**७. वज्रपिण्ड**– ज्याप्रमाणे वज्र शत्रूवर जाऊन भिडते संश्लिष्ट होते, त्याप्रमाणे जिह्वामूलीय आणि ऊष्मवर्ण संश्लिष्ट होतात. जिह्वामूलीय युक्त संयोगपिण्डास वज्रपिण्ड असे म्हटले आहे.

उदा. इष्क्कृतिः (मा.सं. १२.८३), दिवःककुत् (मा.सं. ३.१२)

**९१+९२. यमान् विद्यादयः पिण्डान् सान्तस्थान् दारुपिण्डकान्।**
**अन्तस्थयमवर्जं तमूर्णापिण्डं विनिर्दिशेत्।।९१।।**

**अन्तस्थयमसंयोगे विशेषो नोपलभ्यते।**
**अशरीरं यमं विद्यादन्तस्थं पिण्डनायकम्।।९२।।**

यमांच्या संयोग पिण्डास **अयःपिण्ड** जाणावे, अन्तस्थयुक्त संयोगपिण्डास **दारुपिण्ड** जाणावे, अन्तस्थ आणि यम रहित (संयोगपिण्डास) **ऊर्णापिण्ड** म्हणावे.

(विशेष प्रकारे दारुपिण्ड कोठे होतो तर) – अन्तस्थवर्ण (य् र् ल् व्) तसेच यमवर्ण (कुं खुं गुं घुं) यांच्या संयोगात काही विशेषपणा असत नाही कारण यमास शरीररहित जाणायला हवे तसेच अन्तस्थांना वर्णपिण्डांचा नायक समजायला हवे.

**९३अ. ज्वालापिण्डान् सनासिक्यान् सानुस्वाराँस्तु मृण्मयान्।**
**सोपध्मानान् वायुपिण्डान् जिह्वामूले तु वज्रिणः।।९३अ।।**

नासिक्य (ञ् म् ङ् ण् न्) वर्णासोबतचा पिण्ड **ज्वालापिण्ड** होय. अशाच स्थितीत अनुस्वारयुक्त संयोग होतो तो **मृत्पिण्ड** होय. उपध्मानीय वर्णांनी युक्त संयोगास **वायुपिण्ड** तसेच जिह्वामूलीय वर्णांच्या संयोगास **वज्रपिण्ड** असे म्हणतात.

**९३ब. रुक्क्मेति प्रथमो ज्ञेयः सक्त्थ्ना इत्यपरो भवेत् ।**
**व्विद्द्माते तु तृतीयश्च जम्भेदध्मश्चतुर्थकः ।।९३ब।।**

**यमाची उदाहरणे**

प्रथम यम **रुक्क्म** हा होय (मा. सं. १२.१)
दुसरा यम **सक्त्थ्ना** हा होय (मा. सं. २३.२९)
तिसरा यम **विद्माते** हा तर (मा. सं. १२.२९)
चौथा **जम्भे दद्धमः** होय (मा. सं. १६.६४)

**स्पष्टीकरण**– वरील चारही उदाहरणात अनुक्रमे वर्गातील प्रथम, द्वितीय, तृतीय, चतुर्थ वर्णाच्या सदृश यम होत (क्, थ्, द्, ध्)

रुक्क्मः – वर्गीय प्रथम अक्षराचा बोधक
सक्त्थ्ना – वर्गीय द्वितीय अक्षर बोधक
विद्द्माते – वर्गीय तृयीय अक्षर
जम्भे दद्धमः – वर्गीय चतुर्थ अक्षर

कुँ, खुँ, गुँ, घुँ असे म्हणून केवळ क वर्गीय व्यंजनांचेच यम होतात असे वाटू नये यासाठी थ्, द्, ध् या सारख्या श्रुतींचे देखील यम होतात, हे वरील उदाहरणातून सूचित झाले आहे.

म्हणूनच वर्गीय २० वर्णांच्या सदृश अर्थात पाचही वर्गीय व्यंजनांचे पहिल्या चार वर्णसदृश यम होऊ शकतात हे सूचित केले आहे.

या २० वर्णांमध्ये नासिक्यगुण युक्त आणि स्वतंत्र वर्णशरीर रहित हे वर्णच यम होते.

मुखात वायूचे धारण (संयम) केल्याने या यमांचे श्रवण होते. संयमामुळेच यांना यम म्हटले जाते. यम हे विसर्ग, अनुस्वाराप्रमाणे आहेत हे सिद्ध होते.

**९४. अपञ्चमैश्चैकपदे संयुक्तं पञ्चमाक्षरम्।**
**उत्पद्यते यमस्तत्र सोऽङ्गं पूर्वाक्षरस्य हि।।९४।।**

एका पदामध्ये वर्गीय पञ्चम भिन्न व्यंजना पुढे पंचम व्यंजन ज्या ठिकाणी येते त्या ठिकाणी यम उत्पन्न होतो आणि हा यम पूर्वस्वराचे अंग होतो.

वर्गीय पहिल्या चार व्यंजनांपैकी एक + वर्गीय पंचम वर्ण = यम

**९५. पञ्चमाः शषसैर्युक्ता अन्तस्थैर्वापि संयुताः।**
**यमास्तत्र निवर्त्तन्ते श्मशानादिव बान्धवाः।।९५।।**

(''यम'' च्या प्रतिप्रसव (अपवादाचा अपवाद = प्रतिप्रसव) स्थळांचा निर्देश या ठिकाणी केला आहे.)

अपञ्चम वर्ण म्हटल्यानंतर श्, ष्, स्, ह् वर्णांच्या सदृशही यम व्हायला हवेत. परंतु त्यांच्या बाबतीत यम संभवत नाही हे या ठिकाणी सांगितले आहे.

श, ष्, स् किंवा अन्तस्थवर्ण (य्, र्, ल्, व्) यांच्याशी ज्या ठिकाणी पंचमवर्ण संयुक्त होतो. त्या ठिकाणी स्मशानातून बांधव परत फिरतात त्याप्रमाणे ''यम'' परत फिरतो (तिथे यम होत नाही)

ऊष्म आणि अन्तस्थ वर्णांपुढे पंचम स्पर्श वर्ण आल्यास त्या पंचम वर्णाचे द्वित्व होते. याचा निर्देश शु. य. प्रा. मध्ये केला आहे. ऊष्मान्तस्थाभ्यश्च स्पर्शः (शु.य.प्रा.४.१०२) म्हणूनच

अ. आस्म्मिन् (मा.सं.३.१)

**आ.** बिल्म्मिने (मा.सं.१६.३५) या ठिकाणी अनुक्रमे स्, ल् यांच्यानंतर आलेल्या ''म्'' चे द्वित्व झालेले दिसते.

ऊष्म आणि अन्तस्थ यांचा संयोग होण्याने 'यम' उत्पन्न झालेला नाही. म्हणूनच यांचा विच्छेद होत नाही.

आस्म्मिन् या उदाहरणात **ऊर्ण्णापिण्ड** आहे व बिल्म्मिने या मध्ये **दारुपिण्ड** आहे.

शुक्लयजुर्वेदप्रातिशाख्यामध्ये ''ऊष्मान्तस्थाभ्यश्च स्पर्शः'' (४.१०२) या सूत्रामध्ये ऊष्म आणि अन्तस्थ वर्णांसोबत पंचम वर्णांच्या एकाचवेळी उच्चारणाने दोष सांगितला आहे. ''उष्मभ्य: पञ्चमेषु यमापत्तिर्दोष:'' (शु. य. प्रा. ४.१६२)

या सूत्राने अन्तस्थ वर्णांचेही ग्रहण केले आहे. याज्ञवल्क्य शिक्षेचे याला प्रमाण आहे, म्हणून बिल्म्मिने इत्यादी ठिकाणी 'यमापत्ती' होत नाही.

टीकेमध्ये काही श्लोक आलेले आहेत त्यांचे विवेचन

१. (क) आद्या मात्रा तु कण्ठ्यस्य (२.२०) पृष्ठ ९१

२. (ख) यादृशी रत्नवर्णाभा (२.७५) पृष्ठ १५४

३. (ग) लाक्षारक्तं यथा तोयम् (२.७६) पृष्ठ १५५

४. (घ) लुप्ते नकारे यत्स्वारं (२.७७) पृष्ठ १५७

५. (ङ) प्रथमे न षकारेण सकारेण (२.८७) पृष्ठ १६७

६. (च) प्रथमस्थ षकारेण थकारेण च
संयुतम्मध्ये वर्णिलेले आहेत.
प्रथमे न ठकारेण (२.८८) पृष्ठ १६७

**९६. चतुर्थश्च तृतीयेन द्वितीयं प्रथमेन च।**
**आद्यं मध्यं तथान्त्यञ्च स्वरूपेणाभिपीडयेत्।।९६।।**

वर्गीय चतुर्थ वर्णाला तृतीय वर्णाने आणि वर्गीय द्वितीय वर्णाला प्रथम वर्णाने पीडित (दोनदा उच्चारण) करावे. तसेच वर्गीय प्रथम, मध्यम (तृतीय) आणि अन्तिम (पंचम) वर्णांना त्यांच्या स्वरूपानेच पीडित करावे (द्विरुच्चारित) करावे.

**स्पष्टीकरण**– या ठिकाणी यमांच्या विषयी आणि द्वित्वाच्या विषयी व्यवस्था केली आहे. पाणिनीने ''अनचि च....(अष्टा. ८.४.४७)'' या सूत्राने स्वरानंतर ''यर्'' प्रत्याहारातील वर्ण आला असता त्याचे द्वित्व सांगितले आहे. परंतु अशा यर् प्रत्याहारापुढील वर्णापुढे कोणताही स्वर यायला नको.




या पुढे कोणतेही व्यंजन असेल किंवा अवसान असेल तरी द्वित्व होते.

द्वित्व झाल्यानंतर कोणता वर्ण पुढे असताना कोणता वर्ण उपस्थित होतो हे याठिकाणी विवेचन केले आहे, सांगितले आहे.

१. प्रथम वर्ण असेल तर प्रथम वर्णाने पीडित सम्यक्क्स्रवन्ति (मा. सं. १३.३८) करावे. या ठिकाणी दोन ककार स्कार रेफ् यांचा संयोग आहे. यातील पूर्व ककार द्विरुक्तज आहे.

२. तृतीय वर्ण असेल तर तृतीय वर्णाने पीडित करावे.

३. पंचम वर्ण असेल तर पंचम वर्णाने पीडित करावे. अर्थात त्या वर्णाचेच द्विरुच्चारण करावे.

चतुर्थ वर्णाचा 'यम' असताना त्यास तृतीय वर्णाने पीडित करावे.

उदा. जम्भे दद्ध्मः ।

या ठिकाणी 'ध्' या चतुर्थ वर्णाच्या जागी 'द्' या तृतीय वर्णाचे उच्चारण झाले.

१. द्वितीय वर्णाचा यम होताना वर्गातील – प्रथम वर्णाने पीडित करावे. सकृत्थ्ना – (मा. सं. १३.३८) व्विक्ख्याय (मा. सं. ११.२०) या ठिकाणी द्वितीय 'ख्' वर्ण प्रथम वर्णाने पीडित होतो.

२. प्रथम वर्णाच्या ठिकाणी प्रथम वर्णानेच पीडित करावे. सम्यक्क्स्रवन्ति (मा. सं. १३.३८)

३. अग्निः (मा. सं. ३.९) – तृतीय वर्ण तृतीय वर्णाने पीडित होतो.

४. चतुर्थ वर्ण हा तृतीय वर्णाने पीडित होतो. उदा. आजिग्घ्र (मा. सं. ८.४२)

५. पञ्चम वर्ण पञ्चम वर्णानेच पीडित होतो. युङ्ङासि (मा. सं. १०.२४) या ठिकाणी पंचम वर्णाला पञ्चम वर्णानेच पीडित केले आहे.

१. वर्गीय द्वितीय वर्णाच्या द्वित्वाबाबत – खरि च (पा. सू. ८.४.५५) या सूत्राने चर्त्व (च्, ट्, त्, क्, प्) होऊन वर्गीय प्रथम वर्णात परिवर्तन होते.

२. चतुर्थ वर्णाचे द्वित्व होताना झलां जश् झशि... (पा. सू. ८.४.५३) या सूत्राने 'जश्' (होण्याने) तृतीय वर्णात परिवर्तन घडते.

३. प्रथम तसेच तृतीय वर्णांच्या द्वित्वात कोणताही बदल होत नाही.

४. पंचम वर्णाच्या द्वित्वासंबंधी पाणिनीने म्हटले आहे – ङमो ह्रस्वादचिङमुण् नित्यम् (पाणि.८.३३२)

या सूत्राने ङ ला ङुट्

ण् ला णुट्

न् ला नुट् आगम सांगितला आहे.

हा आगम अन्तिम अवयवाच्या रूपात त्याच वर्णाला लागतो. म्हणून पंचम वर्ण पंचम वर्णानेच पीडित होतो.

शु. य. प्रा. मध्ये ''प्रथमैर्द्वितीयास्तृतीयैश्चतुर्थाः । (शु.य.प्रा.४.१०८) असे म्हटले आहे.

पदपाठाचे वेळी पदाच्या शेवटी असणारे व्यंजन पूर्व स्वराचे अंग बनते परंतु संहिते मध्ये ते पुढील स्वराचे अंग बनते.

उदा. समिंद्धोऽअञ्जन् (मा.सं.२९.१)

समिंद्धऽइति सम् । इंद्धः ।

पदपाठात सम् या विग्रहाचे वेळी पूर्व स्वर उदात्त असल्याने 'म्'काराचे उदात्तत्व दिसते परंतु संहिता पाठात 'इ' या स्वरिताच्या योगाने मकाराला पुढील अङ्गता आली असता **स्वरित** मानावे.

व्यञ्जनं स्वरेण सस्वरम् (मा. सं. १.१०७)
व्यंजन हे स्वरामुळे सस्वर ठरते. संधीमध्ये पर स्वरच उच्चरित होतो.

**९७. प्रथमाश्च तृतीयाः स्युः परे घोषवति स्थिते।**
**पञ्चमाः पञ्चमे पाठे द्वितीयाः शषसेषु च।।९७।।**

**अ.** वर्गीय प्रथम वर्णा नंतर घोषवान् वर्ण आल्यास प्रथम वर्णाच्या जागी स्ववर्गीय तृतीय वर्णाचा आगम होतो.

**आ.** पंचम वर्ण पर असताना स्ववर्गीय पंचम वर्णाचा आगम होतो.

**इ.** तसेच श्, ष्, स् वर्ण पुढे असतील तर स्ववर्गीय द्वितीय वर्ण होतो.

१. प्रथमवर्ण + ग् घ् = तृतीय वर्ण

यत् + ग्रामे = द् = यद्ग्रामे

यत् + द् + ग्रामे = यद्द्ग्रामे = द् + द् + ग् + र
(चार वर्णांचा संयोग)

त्यामुळे परत 'द्'काराला द्वित्वाचा प्रसंग आला परंतु ''स्ववर्गीये चानुत्तमे'' (शु. य. प्रा. ३.४५) या सूत्राने द्वित्वाचा निषेध केला आहे.

२. प्रथमवर्ण + पञ्चमवर्ण = त्या वर्गातील पंचम वर्ण

व्वाक् + मात्या = ङ् = व्वाक्ङ्मात्या


वाङ्ङ्मात्या (मा. स. १३.५८)

क् कारानंतर ‘म’ हा पंचम वर्ण पुढे असल्याने द्वित्वाच्या संदर्भात ‘ङ्’ हा वर्ण आला आणि ‘क्’ नंतर ‘ङ्’ असल्याने ‘क’ बद्दलही ‘ङ्’ झाला आणि वाङ्ङ्मात्या हे रूप बनले.

वर्गीय प्रथम वर्णाच्या स्थानी स्ववर्गीय पंचमवर्ण होतो. हा विधि पाणिनीच्या ‘‘यरोऽनुनासिकेऽनुनासिको वा...’’ (पा. सू. ८.५.४५) या सूत्राने होतो. त्याच प्रमाणे द्वित्व अनचि च - (पा. सू. ८.४.४७) या सूत्राने होतो.

३. वर्गीय प्रथम वर्ण + श, ष, स = वर्गीय द्वितीय व्यंजन होते

अनुष्टुप् + शारदी = ‘फ्’ अनुष्टुप्फ्शारदी - हे मत शौनकाचे आहे.

माध्यन्दिन शाखेमध्ये दोन ‘प’कार असणारा पाठ दिसतो. - अनुष्टुप्प्शारदी- (मा.सं.१३.५७)

पाणिनीच्या ‘अनचि च’ (पा.८.४.४७) या सूत्राने द्वित्व आणि ‘खरिच’ (पा.८.४.५५) सूत्राने चर्त्व विधि होतो.

१.स्पर्शोऽपञ्चमः स्वरधौ तृतीयम् (शु.य.मा.प्रा.४.११८)

वर्गीय प्रथम व्यंजनाचा (संहिता पाठ करताना) घोषवान् वर्ण पुढे आला असता ते तृतीय वर्णाचे रूप होते.

## १०. अध्येतृधर्म (कारिका ९८ ते ११६)

**९८. उपांशु त्वरितं चैव योऽधीते वित्रसन्नपि।**
**अपरूपसहस्राणां सन्देहे स प्रवर्तते।।९८।।**

(अशुद्ध उच्चारणाचा त्याग करावा यासाठी आचार्य अध्येतृधर्म सांगतात.)

जो उपांशु (अस्पष्ट), शीघ्र आणि भयग्रस्त होऊन अध्ययन करतो तो प्रयोग करताना अनेक अपशब्दांनी संदेहात पडतो.

**स्पष्टीकरण**- अध्ययनाचेवेळी अस्पष्टपणा, शीघ्रता आणि भयग्रस्तता हे तीन दोष टाळायला हवेत. कारण या दोषांनी पठन करणारा आणि ते ऐकणारा दोघांनाही संदेह निर्माण होतो. योग्य पाठ कोणता आहे याचा निश्चय ते करू शकत नाहीत. त्यामुळे अर्थबोधही होत नाही. त्याच्यापुढे विकल्प निर्माण झाला असतानाही त्यातून एकाचा निर्णय करणे त्याला अवघड जाते.

**९९. पञ्च विद्यां न गृह्णन्ति चण्डाः स्तब्धाश्च ये नराः।**
**अलसा रोगिणश्चैव येषां च विस्मृतं मनः।।९९।।**

विद्याग्रहण करण्यास असमर्थ कोण?

जो अत्यंत १.क्रोधी आहे, २.अहंकारी किंवा जड आहे, ३.जो आळशी आहे, ४.रोगी आहे आणि ५.विस्मरणशील आहे. असे हे पाच विद्याग्रहण करू शकत नाहीत.

अ. क्रोधाच्या मुळाशी द्रोह आहे. ज्यांनी विद्या दिली त्या गुरूंचाच जे द्रोह करतात.

आ. जे काही प्राप्त करावयाचे आहे त्यात जडत्वामुळे ज्यांचे नैपुण्य दिसून येत नाही.

इ. जे मनाच्या चंचलतेने निरुत्साहामुळे, आळशीपणामुळे विद्याग्रहणास तत्पर नसतात.

ई. जे दीर्घ रोगी आहेत.

उ. जी काही विद्या प्राप्त झाली आहे तिची धारणा करण्यात जे असमर्थ आहेत असे हे पाच विद्याग्रहण करू शकत नाहीत. त्यामुळे विद्यार्थ्याने हे दोष टाळायला हवेत.

**१००. अहेरिव गणाद्भीतः सम्मानान्नरकादिव।**
**राक्षसीभ्य इव स्त्रीभ्यः स विद्यामधिगच्छति।।१००।।**

सापापासून जशी भीती वाटते त्याप्रमाणे ज्याला **लोकसमूहा**पासून भीती वाटते, नरकापासून जशी भीती असते तसा **सन्माना**पासून जो भितो, राक्षसींपासून ज्याप्रमाणे भय असते त्याप्रमाणे **स्त्रियां**पासून जो भितो, तोच विद्या प्राप्त करू शकतो.

विद्याप्राप्तीची इच्छा असणाऱ्याने **लोकसमूहात** जास्त काळ राहू नये कारण लोकसमूहात गप्पागोष्टींमध्ये वेळेची हानी होईल विद्यार्थी लोकसमूहात रमण्याची अधिक शक्यता आहे.

**सन्मानाचीही** भीती वाटायला हवी कारण ज्याठिकाणी मान मिळतो तिथेच मन रमते. त्यामुळे गुरूकडे जाण्याची किंवा अध्ययनाकडे मन वळविण्याची इच्छा कमी होते. मान-सन्मानातच तो रमून जातो.

**स्त्रीमध्ये** आसक्त झाल्याने विद्येपासून पूर्णपणेच पराङ्मुख होण्याची शक्यता आहे. विद्यार्थी विद्यार्थिनीमध्ये आसक्त होणे आणि विद्यार्थिनी विद्यार्थ्यांमध्ये आसक्त होणे विद्याग्रहणास बाधकच आहे.

काव्येन हन्यते शास्त्रं तच्च गीतेन नश्यति।
तदपि स्त्रीविनोदेन हतं सर्वं बुभुक्षया।।

हा श्लोक वरील संदर्भात पाहण्यासारखा आहे. कोणतेही ध्येय प्राप्त करण्यासाठी वरील गोष्टींचा त्याग करायला हवा.

## १०१. न भोजनविलम्बी स्यात् न च नारीनिबन्धनः। सुदूरमपि विद्यार्थं व्रजेद् गरुडहंसवत्।।१०१।।

विद्यार्थ्याने भोजनास (अति) विलम्ब करू नये, स्त्रियांमध्ये गुंतून राहू नये, (विद्यार्थ्याने) गरुड आणि हंस यांच्या प्रमाणे विद्या प्राप्त करण्यासाठी खूप दूरवर सुद्धा जावे.

विद्या ग्रहणातील साऱ्या अडचणी पार करून उत्साहाने दूरवर जाऊन सुद्धा विद्याग्रहण करावे.

## १०२. सुखार्थी चेत् त्यजेद्विद्यां विद्यार्थी चेत् त्यजेत् सुखम्। सुखिनस्तु कुतो विद्या विद्यार्थिनि कुतः सुखम्।।१०२।।

(विद्या ग्रहणात अत्यंत परिश्रम आवश्यक आहेत) सुखाची इच्छा करणाऱ्यास विद्येचा त्याग करावा लागतो (आणि) जो विद्येची (ज्ञानप्राप्तीची) इच्छा करतो त्यास सुखाचा

त्याग करावा लागतो. सुखात रमणाऱ्यास विद्या कशी प्राप्त होणार व विद्यार्थ्यास सुख कसे मिळणार?

परिश्रमांची तयारी असणाराच विद्येचा अधिकारी आहे  हे यातून सुचविले आहे.

**१०३. गुणिता शतशो विद्या सहस्रावर्तिता पुनः।**
**आगमिष्यति जिह्वाग्रे स्थलान् निम्नमिवोदकम्।।१०३।।**

(विद्याधारणा कशी करावी) ज्याप्रमाणे जलस्रोत उंच भागाकडून सखलभागाकडे येतो त्याप्रमाणे शंभरवेळा आवृत्ती केल्याने (पठन केल्याने) आणि त्यानंतर परत हजारवेळा आवृत्ती केल्याने विद्या जिह्वाग्रावर येईलच!

विद्याप्राप्ती ही परिश्रमांवर अवलंबून आहे.

**१०४. शतेन गुणिताऽऽयाति सहस्रेण च तिष्ठति।**
**शतानां च सहस्रेण प्रेत्य चेह च तिष्ठति।।१०४।।**

**शंभर**वेळा पठन केलेली विद्या विद्यार्थ्याकडे येते, (पूर्णपणे लक्षात येते) **हजार**वेळा पठन केलेली विद्या (विद्यार्थ्याच्या ठिकाणी) स्थिर होते. **लाख**वेळा म्हटल्यानंतर मात्र याच जन्मात नव्हे तर पुढील जन्मातही स्थिर होते.

शंभरवेळा, हजारवेळा, लाखवेळा असे म्हटले म्हणजे तसा शब्दश: अर्थ न घेता बुद्धीच्याक्षमतेनुसार अनेकवेळा पठन करून विद्या टिकवावी हा या श्लोकाचा आशय आहे.

**१०५. जलमभ्यासयोगेन शैलानां कुरुते क्षयम्।**
**कर्कशानां मृदुस्पर्शं किमभ्यासान्न साध्यते।।१०५।।**

कोमल स्पर्श असणारे जल देखील सातत्याने (आघात करून) कठोरपर्वताला (ठिसूळ बनवून) क्षीण करते, अभ्यासाने काय साध्य होणार नाही (अर्थात सर्वकाही साध्य होईल)

विद्याप्राप्ती होईपर्यंत किंवा ध्येय प्राप्ती पर्यंत न डगमगता अभ्यास करावा, प्रयत्न करावेत. खचून न जाता प्रयत्न चालू ठेवावेत.

या श्लोकात 'मृदुस्पर्शम्' हे जलाचे विशेषण आहे तर 'कर्कशानाम्' हे पर्वतांचे विशेषण आहे.

**१०६. यथा पिपीलिकाभिश्च क्रियते पांसुसञ्चयम्।**
**न चात्र बलसामर्थ्यमुद्यमस्तत्र कारणम्।।१०६।।**

(दुर्बलांना विद्याप्राप्ती होणार नाही असे नाही म्हणूनच प्रयत्नशील राहण्यास सांगितले आहे.)

मुंग्या ज्याप्रमाणे मातीच्या कणांचा ढिगारा असणारे वारुळ तयार करतात. यामध्ये बलाची ताकद महत्त्वाची नाही तर सातत्याने केले जाणारे प्रयत्नच महत्वाचे आहेत.

क्षणाक्षणाने मिळवलेली विद्या/ज्ञान विशाल बनू शकते. ध्येयप्राप्तीसाठी उद्योग, प्रयत्न हेच महत्त्वाचे आहेत हे येथे सांगितले आहे.

या श्लोकात **क्रियते** हे क्रियापद वापरले आहे परंतु **पांसुसञ्चयम्** असे कर्म द्वितीया विभक्तीत वापरलेले दिसते. हा शब्द प्रथमा विभक्तीत वापरला आहे असे म्हटले तर 'सञ्चय' शब्द नपुंसकलिंगीरूपात मानावा लागतो पण हे योग्य नाही म्हणून हे पद सिद्ध करण्यासाठी पांसूनां सञ्चयः अस्ति अस्मिन् तत् पांसुसञ्चयम्। हे वल्मीकम् चे विशेषण घ्यावे लागते.

**१०७. अञ्जनस्य क्षयं दृष्ट्वा वल्मीकस्य तु सञ्चयम्।**
**अवन्ध्यं दिवसं कुर्याद् दानाध्ययनकर्मसु।।१०७।।**

(प्रयत्नांचे महत्त्व दृष्टांत देऊन स्पष्ट केले आहे.) डोळ्यात घातलेले काजळ क्षीण होते हे पाहून आणि वारुळाचा ढिगारा पाहिल्यानंतर आपला दिवस दान, अध्ययन आणि अन्य कर्तव्यकर्मांमध्ये सफल बनवावा (हेच कळते).

डोळ्यात घातलेले काजळ हळुहळू क्षीण होते. कणाकणाने मोठे वारुळ तयार होते हे पाहून प्रत्येक क्षणाचा उपयोग केल्यास यशस्वितेचा ढिगारा समोर उभा राहील. आपल्यामध्ये कितीही दोष असले तरी ते हळुहळू क्षीण होतील आणि गुणांची वाढ करता येईल हे यात सांगायचे आहे.

वेळेचा (क्षणाक्षणाचा) उपयोग न केल्यास विद्या नष्ट होईल आणि वेळेचा उपयोग केल्यास विद्या प्राप्त होईल.

**१०८. हयानामिव जात्यानामर्धरात्रार्धशायिनाम्।**
**न हि विद्यार्थिनां निद्रा चिरं नेत्रेषु तिष्ठति।।१०८।।**

अर्ध्या रात्रीचाही अर्धाभाग (फारच थोडावेळ) झोपणाऱ्या उत्तम जातीच्या घोड्याप्रमाणे विद्यार्थ्यांच्या डोळ्यांवर झोप अधिककाळ राहात नाही. विद्यार्थ्याने अधिककाळ झोपू नये, झोपल्यास अभ्यासाची हानी होईल.

घोडा उभा राहून काही क्षण झोपतो. त्याचे झोपेवरील नियंत्रण, सावधपणा यातून व्यक्त केला आहे. त्याप्रमाणे विद्यार्थ्याने असावे हेही सूचित केले आहे.

**१०९. अन्नव्यञ्जनयोर्भागौ तृतीयमुदकस्य च।**
**वायोः सञ्चरणार्थाय चतुर्थमुपकल्पयेत्।।१०९।।**

(भोजन करताना) दोन भाग अन्न आणि तोंडी लावणे यांचा (भाज्या, कोशिंबीर इत्यादी), तिसरा भाग जलाचा आणि चौथा भाग वायु संचरणासाठी (अनुमानाने) ठेवावा.

अर्थात (विद्यार्थ्याने) भोजन करताना तृप्तता ज्यामुळे होणार आहे त्याच्या निम्मेच जेवण करावे, अर्थात चार भागांपैकी दोन भागच जेवण करावे. या दोन भागांपैकी एक भाग अन्नाचा व एक भाग भाज्या इत्यादींचा असावा. तिसरा भाग पाण्याचा व चौथा भाग वायु संचारासाठी मोकळा ठेवावा. आरोग्याच्या दृष्टीने हे हितकारक आहे त्याच सोबत आहार कमी असल्याने आळस येणार नाही आणि अभ्यास व्यवस्थित होईल.

**११०. यथा खनन् खनित्रेण नरो वार्यधिगच्छति।**
**तथा गुरुगतां विद्यां शुश्रूषुरधिगच्छति।।११०।।**

कुदळीने (विहीर) खोदत खोदत माणूस जल प्राप्त करतो. त्याचप्रमाणे गुरूंजवळ असणारी विद्या त्यांच्याकडून ऐकण्याची इच्छा करणारा (त्यांची सेवा करणारा विद्यार्थी) प्राप्त करतो.

पाणी लागेपर्यंत माणूस खणत राहतो त्याप्रमाणे विद्याप्राप्तीपर्यंत विद्यार्थ्याने गुरुशुश्रूषा करावी हे या ठिकाणी सांगितले आहे. शुश्रूषु याचा अर्थ ऐकण्याची इच्छा करणारा. वक्त्याची अनुमती असेल तरच ऐकण्याची इच्छा पूर्ण होते. गुरूंकडून विद्या ऐकण्यासाठी त्यांना प्रसन्न करायला हवे.

**१११. शुश्रूषारहिता विद्या अपि मेधागुणैर्युता।**
**वन्ध्येव युवती तस्य न विद्या फलिनी भवेत्।।१११।।**

वन्ध्या स्त्री ज्याप्रमाणे पुत्राला जन्म देऊ शकत नाही त्याचप्रमाणे गुरुसेवेशिवाय विद्यार्थ्याने प्राप्त केलेली, मेधा गुणांनी (व्याख्यान, चातुर्य, ऊहापोह इत्यादींनी) युक्त असूनही विद्या फलद्रूप होत नाही.

गुरुसेवा महत्त्वाची असल्याने ती अवश्य करावी. धन, दान किंवा अन्य उपायाने विद्या प्राप्त होऊ शकते. या द्वारा चातुर्यही प्राप्त होऊ शकते परंतु नम्रभाव, त्याग, सेवाभाव त्यात नसल्याने ती विद्या केवळ शब्दाचे अवडंबर बनते.

**११२. गुरुशुश्रूषया विद्या पुष्कलेन धनेन वा।**
**अथवा विद्यया विद्या चतुर्थं नोपलभ्यते।।११२।।**

गुरूंच्या सेवेने विद्या प्राप्त होते किंवा विपुल धन देऊन किंवा आपल्याकडील विद्या दुसऱ्याला देऊन व दुसऱ्याकडील विद्या स्वत: घेऊन विद्या प्राप्त करता येते. यांना सोडून विद्याप्राप्तीचा अन्य कोणताही चौथा मार्ग नाही.

विद्या प्राप्तीसाठी वरीलपैकी कोणत्यातरी एका मार्गाचा स्वीकार करावा लागतो हे निश्चित.

**११३. बह्वीर्जिह्वा यथा गृह्णात्यह्ना वह्निस्तथैव च।**
**ब्रह्मरूपं विजानीयाद् गुरुमेवात्मनः सदा।।११३।।**

(गुरूंचे सामर्थ्य) ज्याप्रमाणे अग्नी आपल्या अनेक जिह्वांना (ज्वाळांना) लगेच ग्रहण करतो (आत्मसात करतो) (अग्निप्रमाणे असणाऱ्या) आपल्या गुरूला नेहमीच ब्रह्मरूप जाणावे.

अग्नीचे उदाहरण **रागावलेल्या** गुरूंसाठी आहे तर ब्रह्माची उपमा **प्रसन्न** गुरूसाठी आहे. अग्नी ज्याप्रमाणे आपल्या ज्वाळांना शीघ्र आत्मसात करतो त्याप्रमाणे रागावलेले गुरु शिष्यापासून आपण दिलेली विद्या परत घेऊ शकतात. या उलट प्रसन्न गुरु ब्रह्माप्रमाणे सारी विद्या शिष्यापुढे साकार करतो. ब्रह्मतत्त्व संकल्पाने सारे जग निर्माण करते त्याचप्रमाणे प्रसन्न गुरु संकल्पाने सारी विद्या शिष्यास देऊ शकतो.

**११४. यत्किञ्चिद्वाङ्मयं लोके सर्वमत्र प्रतिष्ठितम्।**
**करोति तत्प्रदानं यत् तस्माद् ब्रह्ममयो गुरुः।।११४।।**

**गुरु ब्रह्ममय होय.**

या विश्वात जे काही वाङ्मयाचे जाळे आहे ते सारे वेदांमध्ये प्रतिष्ठित आहे. गुरु याचे (वेदांचे) योग्यप्रकारे दान (अध्यापन) करतो म्हणून गुरु ब्रह्ममय आहे.

गुरु ब्रह्मरूप आहे कारण सर्व वाङ्मयाचे मूळ वेद आहेत. वेद हेच ब्रह्म आहेत आणि हे वेद ब्रह्म ज्यांच्यामध्ये प्रतिष्ठित आहे ते गुरु देखील **ब्रह्मच** आहेत.

**११५. विधिनाऽप्यविधिज्ञानमविधानान्न लभ्यते।**
**अविधानपरो नित्यं प्रायश्चित्तीयते नरः।।११५।।**

**अयोग्य गुरु करू नये.**

वेदज्ञ ब्रह्म्याला सुद्धा विधिपूर्वक आचरण न करण्याने निष्फलत्व प्राप्त होत नाही का? (निष्फलत्व प्राप्त होते.) मग अयोग्य गुरु केल्याने (अज्ञानी) माणूस नेहमीच प्रायश्चित्ताला कारण ठरतो.

संपूर्ण वेदांना जाणणारा ब्रह्मा सुद्धा विधिपूर्वक आचरण करणार नाही तर त्याचे ज्ञान निष्फळ ठरते.

अशा अवस्थेत नेहमीच विधिनियमांचा परित्याग करण्यात रमलेल्या माणसाच्या निष्फळतेबद्दल काय सांगावे? अशा माणसाला निश्चितच प्रायश्चित्त करावे लागेल. ज्ञानसंपन्न गुरूच विद्यार्थ्यास घडवू शकतो.

**११६. युक्तियुक्तं वचो ग्राह्यं न ग्राह्यङ्गुरुगौरवात्।**
**सर्वशास्त्ररहस्यं तद् याज्ञवल्क्येन भाषितम्।।११६।।**

(योग्य गुरु करावा. युक्तियुक्त त्याचे वचन स्वीकारावे. अन्यथा त्याचा स्वीकार करू नये.)

गुरूंची युक्तियुक्त वाणी स्वीकारावी, केवळ गुरूंच्या गौरवाने (मोठेपणामुळे) वाक्याचा स्वीकार करू नये. जे साऱ्या शास्त्रांचे रहस्य आहे ते याज्ञवल्क्यांनी सांगितले आहे.

# परिशिष्टे

## १. पारिभाषिक शब्दकोष

(कंसातील संदर्भ याज्ञवल्क्य शिक्षेतील कारिकांचे आहेत.)

**अक्षर**– (syllable) व्यंजन/ अयोगवाहांनी युक्त स्वर/ स्वर

**अघोष**– (Voiceless) नादरहित श्वासवायूने उच्चारित होणारे खर् प्रत्याहारातील वर्ण–

वर्गातील प्रथम, द्वितीय – क्, ख्, च्, छ्, ट्, ठ्, त्, थ्, प्,फ्,
श्, ष्, स्, अः, ≍क, ≍प, अं

**अङ्ग**– (Part) व्यंजन, अयोगवाह हे स्वरवर्णाचे भाग असतात म्हणून यांस अंग म्हणतात.

**अणुत्व**– ($^1/_4$ Matra) एका मात्रेचा $^१/_४$ भाग

**अतिलीढ**– (ḥ in the form of ṣ followed by ṣ) मूर्धन्य षकारापूर्वी असलेल्या विसर्गाचे षकाररूपात उच्चारण. **(२.४८–५०)**

**अनुदात्त**– (Grave) उदात्तादि स्वरांपैकी एक स्वर. तालु इत्यादि उच्चारणावयवांतील मृदुतेमुळे विस्तीर्ण मुख विवरातून किंवा उच्चारण अवयवांच्या अधोभागातून उच्चारित स्वर. **(१.१–६)**

**अनुनासिक**– (A person whose pronounciation is faulty, uttering non-nasal sounds as nasals.) (नासारोगी) अननुनासिक वर्णांचे उच्चारण सुद्धा अनुनासिकाप्रमाणे करणारा. सर्व स्वरांचा व अंतःस्थांचा एक भेद.

**अनुनासिक्य**– (Consonant pronounced from nose with mouth.) ज्या वर्णांचा उच्चार मुखसहित नासिकेद्वारा केला जातो. ङ्, ञ्, ण्, न्, म्,

सर्वस्वर, य्, व्, ल्, यांचा एक अनुनासिक हा भेद आहे.

**अनुस्वार**– (Pure nasal.) केवल नासिकेद्वारा उच्चारित अयोगवाह वर्ण **(अं)**

**अन्तस्थ**– (Semi vowels.) स्वर आणि स्पर्श वर्णांच्या मध्ये उच्चारित केले जाणारे य्, र्, ल्, व् हे वर्ण.

**अभिनिहित**–(A kinda of dependent circumflex.) उदात्त एकार किंवा ओकार यांमध्ये अनुदात्त ह्रस्व अकार पूर्वरूप संधीने विलीन झाल्यानंतर निष्पन्न झालेले ए, ओ अभिनिहित स्वरित होत. **(१.७६–८६)**

**अभिपीडन**– (Doubling of sounds.) चतुर्थ वर्णाच्या ठिकाणी तृतीय, द्वितीय वर्णाच्या जागी प्रथम रूपात द्वित्व होणे. या द्वित्वास अभिपीडन म्हणतात.

तसेच प्रथ, तृतीय, पंचम या वर्णांच्या ठिकाणी त्याच वर्णाचे द्वित्व होणे अभिपीडन होय. उदा. अग्नि:

**अय:पिण्ड**– (A kind of Saṃyoga Piṇḍa) अपञ्चम स्पर्श वर्णांपुढे पञ्चम स्पर्श वर्ण आल्यास यांच्या संयोगाने उत्पन्न ककारादीचा अनुनासिक यम वर्णांशी संयोग अयःपिण्ड होय. **(२.९१–९३)**

**अर्धमात्रा**– (Half of one matra.) एका मात्रेचा अर्धाभाग, व्यंजनांची मात्रा अर्धी असते.

**अवग्रह**– (Gap in pronoumciation.) **संहितापाठात** पूर्वरूप किंवा दीर्घसंधी जोडणारे दोन वर्ण, **पदपाठात** सामासिकपद किंवा प्रकृति प्रत्यय यांमध्ये वृत्तिच्छेद करणारा विराम **अवग्रह** होय. या अवग्रहाचे ऽ हे चिह्न होय.

**अवसान**– (Pause) ऋचेच्या मध्ये किंवा अंती उच्चारण्यातील विराम किंवा वर्णांचा अभाव म्हणजे अवसान होय.

**अव्यक्त**– (Unmanifest pronounciation.) स्पष्ट उच्चारणाचा अभाव रूप उच्चारण दोष.

**अस्पृष्ट**– (Non contact.) मुखातील वर्णोच्चारण्याच्या स्थानांना जिह्वाग्र इत्यादी करणांचा स्पर्श न होणे म्हणजे अस्पृष्ट होय. स्वर, अन्तस्थ, ऊष्मवर्ण यांच्या उच्चारणासाठी केला जाणारा प्रयत्न आभ्यन्तर प्रयत्न.

**अह्णि**– (A kind of nasal colouring.) ऋ वर्ण पुढे असताना **न्** काराच्या जागी होणाऱ्या रङ्गाचा हा भेद होय. उदा. अमित्रा२अँ।। ऽऋतुभिः **(२.७८)**

**आख्यात**– (Verbal form.) क्रियावाचक तिङन्तपद, करोति, गच्छति इत्यादी.

**आम्रेडित**– (Doubling of a word.) शब्दाचे द्वित्व. उदा. धाम्ने धाम्ने **(२.८५)**

**ईषत्स्पृष्ट**– (Semi contact.) आभ्यन्तर प्रयत्नाचा एक भेद. उच्चारण स्थानांचा करणाशी थोडा स्पर्श. य्, र्, ल्, व् यांच्या उच्चारणांचा हा प्रयत्न होय.

**ईषद्विवृत**– (Half open.) आभ्यन्तर प्रयत्नांचा एक भेद. श्, ष्, स्, ह् यांच्या उच्चारणासाठीचा हा प्रयत्न होय.

**उदात्त**– (Acute, Rising tone.) उच्चारण स्थानांचा विस्तार केल्यानंतर मुखविवर संकुचित होऊन अकारादींमध्ये उत्पन्न होणारा एक विशेष वर्णधर्माने युक्त कोणताही स्वर. **(१.१–६)**

**उद्धृष्ट**– क्रोधाच्या अवस्थेत, अपेक्षित कालापेक्षा वर्णाच्या अधिक काळ उच्चारणाचा दोष.

**उपचार**– जे पद क्षीण होते, वाढते किंवा संकुचित होते यास उपचार म्हणतात. **(२.८६–९०)**

**उपधानिक**– (Name of nasal colouring in certain conditions.) नकार, मकार + अन्तस्थ किंवा ऊष्म वर्णांच्या संयोगाने नकार किंवा मकाराचे सर्वनासिक्य उच्चारण म्हणजे उपधानिक होय. उदा. अर्हाँश्च याठिकाणी रंग न म्हणता उपधानिका म्हणायचे. **(२.७२–७३)**

**उपधानिन्**– अन्तस्थ तसेच ऊष्म यांच्या संयोगाने न्कार किंवा मकार यांचे सर्वनासिक्य उच्चारण होते. **(२.७३)**

**उपध्मानीय**– (Half visarga- like sound before P and Ph.) प् आणि फ् यांच्यापूर्वी असणाऱ्या विसर्गाचे केलेले उच्चारण. (ᳲ)

**उपांशु**– (Murmering, unclear recitation.) अस्फुट उच्चारण.

**ऊर्णापिण्ड**– (A kind of Saṃyoga Piṇḍa of specific sounds.) ऊष्म वर्णांशी, यम भिन्न स्पर्श वर्णांच्या संयोगाची विशेष संज्ञा. **(२.९१–९३)**

**ऊष्मन्**– (Sibilant.) श्, ष्, स्, ह्

**ऊष्मा**– (Sibilant.) विसर्ग. विसर्गाचे प्रचिता, बलका, तरा हे तीन प्रकार सांगितले आहेत. **(१.७१–७३)**

**ऋषभ**– (One of the seven accents used in Sāma chanting.) सामवेदाच्या गायनाचे वेळी प्रयुक्त सात स्वरांपैकी एक स्वर. नाभीस्थानावरून उठून कंठ आणि शिरस् स्थानी संघर्ष होऊन उत्पन्न झालेला वायु ऋषभाप्रमाणे उच्चारित होत असल्याने यास ऋषभ म्हणतात.

**ओष्ठ्य**– (Labial.) उत्तरोष्ठ स्थानाचा अधरोष्ठ करणांशी स्पर्श झाल्यानंतर निष्पन्न उ, पवर्ग, ⤫ प, ⤫ फ वर्ण.

**औरस**– (Born of heart.) उर:स्थानापासून निर्माण होणारे वर्ण.

**कण्ठ्य**– (Gutturals.) कण्ठस्थान आणि जिह्वामूल करणद्वारा उच्चारित अ, क वर्ग, असंयुक्त ह, अ: हे वर्ण कण्ठ्य होत.

**करिणी**– (A kind of anaptyxis.) स्वरभक्तीचा एक प्रकार. रेफ तसेच हकार यांच्या संयोगाने निर्माण होणारी स्वरभक्ती– देवं बर्हि: **(२.१३–१६)**

**कुर्विणी**– (A kind of anaptyxis.) स्वरभक्तीचा एक प्रकार. लकार आणि हकार यांच्या संयोगाने होणारी स्वरभक्ती. उदा.– उपबह्ल. **(२.१३–१६)**

**केलि**– विसर्गाची एक अवस्था **(२.४८–५०)**

**क्रम**– (Modifed recitation of Vedic Mantras.) क्रमपाठ. मंत्रोच्चाराचा एक विकृतिपाठ. संहितेतील पदांपैकी पहिलेपद–दुसरेपद, दुसरेपद–तिसरेपद, तिसरेपद–चौथेपद अशाप्रकारे पाठ करणे.

**क्षैप्र**– (A kind of Dependent Circumflex.) संधीने निर्माण होणाऱ्या स्वरिताचा एक भेद. इ, उ या स्वरांनंतर अनुदात्त असा विजातीय स्वर आल्यानंतर इ, उ च्या जागी अनुक्रमे य्, व् होणे हा क्षैप्र संधी होय. या क्षैप्र संधीमुळे जे य्, व् झाले आहेत त्यापुढील अनुदात्त स्वरित बनतो. हा सन्धिज क्षैप्रस्वरित होय. **(१.७६–८६)**

**गद्गद**– (A person pronounces sounds with choked voice.) सामर्थ्य कमी पडल्याने वर्णांचे निर्धारित स्थान आणि प्रयत्न यांच्यापेक्षा अन्य स्थान प्रयत्नांनी सदोष उच्चारण करणारा.

**गान्धर्ववेद**– (Sāma chant) सामवेद.

**गान्धार**– (A note of Sāman.) सामगानातील षड्ज इत्यादी सात स्वरांपैकी एक स्वर. नाभीपासून उठून कण्ठ आणि मूर्धा यांच्याशी घर्षण करणाऱ्या वायुमुळे गांधार स्वर निर्माण होतो.

**घात**– (A kind of nasal colouring.) रङ्गाचा एक प्रकार. पदादि आकार याच्यापूर्वी असणाऱ्या पदान्ती असणाऱ्या नकाराच्या विकाराने उत्पन्न रंग घात संज्ञा होय. **(२.७८)**

**घोष**– (Voiced.) वर्णोच्चारणाचा एक बाह्य प्रयत्न. तृतीय, चतुर्थ, पंचम, य् ,र्, ल्, व्, ह् आणि सर्व स्वर (अच्) घोष वर्ण होत.

**जात्यस्वरित**– (Independent Circumffedx.) असन्धिज, स्वतंत्र स्वरिताचा एक प्रकार. स्वभावत: एकाच पदात संयुक्त य् किंवा व् या नंतर पुढे येणाऱ्या स्वराचे स्वरितत्व जात्य स्वरित होय. हा स्वरित अपूर्व किंवा अनुदात्त पूर्व असतो.

उदा.– अपूर्व– स्वः ; अनुदात्त पूर्वी– धान्यम् **(१.७६–८६)**

**जिह्वामूलीय**– (Sounds produced at the root of the tongue.) जिह्वामूलाने उच्चरित क्, ख्, पूर्वीचा अर्ध विसर्ग सदृश वर्ण.– ᳵक ᳵख

**ज्वालापिण्ड**– (A kind of consonent cluster.) हकार आणि नासिक्य यांचा संयोग ज्वालापिंड होय. **(२.९१–९३)**

**तरा**– ऊष्म्याचा प्रकार. **(१.७१–७३)**

**ताथाभाव्य**– (A kind of dependent.) दोन उदात्त अक्षरांमध्ये असणाऱ्या अनुदात्ताच्यापुढे अवगृहित उदात्तापूर्वी असण्यामुळे निर्माण होणारे स्वरितत्व ताथाभाव्य स्वरित होय. उदा.– तनूऽनप्त्रे॑ **(१.७६–८६)**

**तालव्य**– (Palatal.) तालुस्थानापासून उच्चारित वर्ण–च वर्ग, इ, य्, श् वर्ण तालव्य होत.

**तैरोविराम**– (A kind of dependent circumflex.) (स्वरिताचा एक प्रकार) अवग्रहीत उदात्तानंतर असणाऱ्या एकमात्रिक विराम लक्षण असणाऱ्या अवग्रहानंतर लगोलग स्थित स्वरित तैरोविराम होय. गोपताविति गो । प॑तौ । **(१.७६–८६)**

**तैरोव्यञ्जन**– जात्यस्वरिताचा एक प्रकार. उदात्त स्वरानंतर व्यंजनाचे व्यवधान असताना देखील स्वरित बनलेला स्वर. स्वरितांत + उदात्तादि शब्दांच्या समूहामध्ये निघातरूपात अंतर्धान पावलेला स्वर तैरोव्यंजन होय. **(१.७६–८६)**

उदा. – इडे॑ + रन्ते॑ + हव्ये॑ = इडे॒रन्ते॒हव्ये॒ इत्यादी.

**दन्त्य**– (Dental.) दन्तमूलस्थानी जिह्वाग्राच्या स्पर्शाने उच्चारित लृ, तवर्ग, ल्, स् वर्ण दन्त्य होत.

**दारुपिण्ड**– (A kind of contiguity of specific sound.) अन्तस्थ य्, र्, ल्, व् या वर्णांचा अन्य एखाद्या वर्णाशी संयोग होणे म्हणजे दारुपिण्ड होय. उदा. ब्बिल्मिने. **(२.९१–९३)**

**धैवत**– (A note of Sāman.) षड्ज, ऋषभ, गान्धार, मध्यम, पंचम या सर्वस्वरांचे अतिसंधान (अतिक्रमण) धैवत स्वराचे लक्षण होय.

**नाम**– (Nominal words.) क्रियांच्या संदर्भात गुणीभूत होणारे सुबन्त शब्द नाम होत.

**नासिक्य**– (Nasal.) नासिकामात्र स्थानापासून उच्चारित अनुस्वार वर्ण नासिक्य होय. उपधा स्वरातील प्रान्त भागाचे उच्चारण देखील नासिक्य होय.

**निपात**– (Particle.) चार प्रकारच्या पदां पैकी एक पद निपात होय. विविध संबंधाच्या अर्थाचे वाचक परंतु द्रव्यांचा वाचक न होणे. उदा. च वा अह

**निर्घात**– (A kind of nasal colouring.) पदान्ती असणाऱ्या नकारा नंतर इकार असताना नकाराचे विकाररूप अशा रंगास निर्घात ही संज्ञा येते. उदा. देवाँ२।।ऽइदेषि **(२.७८)**

**पञ्चम**– (A note of Sāman) नाभीपासून निर्माण होऊन उरस्, हृदय, कंठ तसेच शिरस् यांना स्पर्श करणाऱ्या वायूपासून निर्माण होणारा स्वर पञ्चम होय.

**पदपाठ**– (Word-wise recitation of vedic continuous text.) संहितापाठाचा संधिविच्छेद, पदच्छेद, अवग्रह इतिकरण करणे हाच पदपाठ होय.

**पाकवती**– (A kind of hitus.) विवृत्तीचा एक प्रकार. दोन ह्रस्व स्वरांच्या परस्पर संहिता होताना सन्ध्यभाव होणारी विवृत्ती पाकवती होय. उदा. व्विनऽइन्द्र **(२.१०–१२)**

**पाठकाचे गुण**– वेद पठन करणाऱ्याचे सहा गुण सांगितले आहेत. **(२.८३)**

**पाठकाधम**– वेद पठन करणाऱ्याचे सहा दुर्गुण सांगितले आहेत. **(२.८२)**

**पाठदोष**– संहिता पठनातील चौदा दोष सांगितले आहेत. **(१.१८, १९)**

**पादवृत्त**– (A kind of dependent circumflex.) दोन स्वरांच्या मध्ये सन्ध्यभाव लक्षण विवृत्ती झाल्यानंतर सुद्धा उदात्त अच् + विराम या पुढे असणारा स्वर स्वरित बनणे पादवृत्त होय. उदा. स्वित्रऽआदित्य. **(१.७६–८६)**

**पिपीलिका**– (Ant-shaped hiatus.) दोन दीर्घ स्वरांचा परस्पर संधी होताना दोहों मधला सन्ध्यभाव अशी विवृत्ती. **(२.१०–१२)**

**पुष्पिणी**– (A modified form of ḥ.) विसर्गाचे उपध्मानीय रूपात परिवर्तन. **(२.४८–५०)**

**प्रचय**– (Monotone.) स्वरित स्वरानंतर येणारे अनुदात्त प्रचय होत. यांनाच एकश्रुती असे म्हणतात. यांच्या उच्चरणात उदात्ताचे आधिक्य तसेच अनुदात्ताची न्यूनता असते.

**प्रचिता**– (ḥ after short or long circumflex.) ह्रस्व स्वरित अथवा सवकार दीर्घ स्वरितानंतर ऊष्मा प्रचिता संज्ञक होय. **(१.७१–७३)**

**प्रणव**– (The synonym of Oṃkār.) ओंकार.

**प्रश्लिष्ट**– (A kind of dependent circumflex.) उदात्त + अनुदात्त या रूपातील दोन ह्रस्व इकारांचा संहितेमध्ये दीर्घ करून निर्माण झालेला स्वरित. **(१.७६–८६)**

उदा. अभि + इन्धताम् = अभीन्धताम् ।

**प्रहिण**– (A kind of nasal colouring.) ओकारापूर्वी असणारे पदान्ती असणाऱ्या नकाराच्या विकाराने उत्पन्न रङ्ग. उदा. अमित्राँ२।।ऽओषतात् **(२.७८)**

**प्लुत**– (Prolated Vowel.) केकाच्या (मोराचा आवाज) प्रमाणात उच्चारित तीन मात्रांचा स्वर (अच्) उदा. ॐ३म्प्रतिष्ठ

**बलका**– (Sibilant ḥ preceded by falling tone.) अनुदात्त निपात तसेच स्वरितत्व विशिष्ट वकारहित दीर्घस्वर यांच्या पुढे असणारा ऊष्मा बलका संज्ञक होय. **(१.७१–७३)**

**मध्यम**– (A note of Sāman.) नाभीस्थानापासून उठून हृदयाला आघात होऊन पुनः नाभी मध्ये उच्चारित वायूचा महानाद!

**महाव्याहृती**– भूः, भुवः, स्वः या महाव्याहृती होत.

**मूर्धन्य**– (Cerebral.) मुखातील मूर्धास्थानी आणि प्रतिवेष्टितजिह्वाग्र करणाने उच्चारित ट वर्ग, ष वर्ण हे मूर्धन्य होत.

**मृत्पिण्ड**– (A kind of contiguity of specific sound.) अनुस्वार किंवा अनुनसिक यांच्या द्वारा संयोगपिंड– मृत्पिण्ड होय. उदा. त्रिꣳशौ । यामैरयँश्चन्द्रमसिं **(२.९१–९३)**

**यम**– एकाच पदामध्ये अपञ्चम स्पर्श वर्णाचा पञ्चम वर्णाबरोबर संयोग असताना त्या दोहोंच्यामध्ये उत्पन्न झालेला अपञ्चम सदृश वर्ण यम होय. उदा. रुक्कम **(२.९३–९५)**

**रङ्ग**–(Nasal colouring.) पदान्ती असणाऱ्या न् काराच्या विकारामुळे उपधा स्वराचे आनुनासिक्य होणे! उदा. वृष्टिमाँ२ इव **(२.७४–७६)** प्रकार **(२.७८)** घात, निर्घात, वज्रि, अहिण, प्रहिण हे पाच प्रकार होत.

**लीढ**– (Pronounciation of modified ḥ.) श पूर्वी असणाऱ्या विसर्गाचे श् रूपात उच्चारण होण्याचा विशेष प्रकार. **(२.४८–५०)**

**वज्रपिण्ड**– (A kind of contiguity of specific sounds.) जिह्वामूलीय ऊष्मा तसेच कण्ठ्य असणाऱ्या जिह्वामूलीय ककारादि यांचा संयोग. **(२.९१–९३)**

**वज्रि**– (A kind of nasal colouring.) उकारापूर्वी असणाऱ्या पदान्तीय न् च्या विकाराने उत्पन्न रङ्ग. उदा. देवाँ२ उपागा **(२.७८)**

**वत्सानुसारिणी**– (A kind of hiatus.) पूर्वी असणारा दीर्घ आणि ह्रस्व स्वराच्या संधी होताना दोन्ही स्वरांच्या मध्ये सन्ध्यभावलक्षण अशी विवृत्ती. उदा. ताऽअस्य. **(२.१०–१२)**

**वत्सानुसृजिताः**– (A kind of hiatus.) पूर्वी ह्रस्वस्वर नंतर दीर्घ स्वर यांच्या संधीच्यावेळी दोहोंमध्ये सन्ध्यभाव लक्षण विवृत्ति. उदा. ता नऽआवोढम्। **(२.१०–१२)**

**वायुपिण्ड**– (A kind of contiguity of specific sounds.) प वर्गीय व्यंजनापूर्वी विसर्ग किंवा ऊष्म वर्ण असताना यांचा संयोग वायुपिण्ड होय. उदा. द्यौष्पिता, सवितःप्प्रसुव. **(२.९१–९३)**

**विकटा**– (A modification of ḥ.) पदान्ती असणाऱ्या ऊष्म्याचा जिह्वामूलीय होणे. **(२.४८–५०)**

**विकटानना**– (A modification of ḥ.) अ + ह्रस्व – अकाराहून भिन्न स्वर (अच्) तसेच आ + अच् या दोहोंमध्ये येणाऱ्या ऊष्म्याचा लोप झाल्यानतर वरील दोनही

ठिकाणी दोन स्वरांच्या संहितांमध्ये सन्ध्यभावलक्षण विवृत्ति म्हणजे विकटानना होय. **(२.४८–५०)**

**विद्युत्**– (A modification of ḥ.) दन्त्य सकाराच्यापूर्वी विसर्ग असताना त्याचे दन्त्य अकारात उच्चारण होणे म्हणजे विद्युत् होय. **(२.४८–५०)**

**विवृत**– (Open.) १. उच्चारण अवयवांमध्ये स्थान आणि करण यांचे परस्परांच्या जवळ न येणे. ऊष्म तसेच स्वरांच्या उच्चारणाचा आभ्यंतर प्रयत्न.

२. खर् प्रत्याहारातील वर्ण– तसेच श्, ष्, स् वर्णांचा बाह्य प्रयत्न विवृत होय.

**विवृत्ति**– दोनस्वर–अ + ह्रस्व अकार भिन्न स्वर (अच्)

आ + अच् यां मध्ये आलेला किंवा पदान्तीय ऊष्मा किंवा पदान्तीय य्, व् चा लोप झाला असताना दोन स्वरांच्या संधीचे अभाव सूचक विराम चिह्न. विवृत्तीचे लक्षण **(२.९)**, प्रकार **(२.१०–१२)**. पिपीलिका, पाकवती, वत्सानुसारिणी, वत्सानुसृजिता या चार विवृत्ती होत.

**विसर्जनीय**– (पहा–ऊष्मा) – विसर्गाच्या आठ अवस्था होतात त्यांची नावे– केलि, विकटानना, लीढा, अतिलीढा, विद्युत्, विकटा, शठा, पुष्पिणी. **(२.४८–५०)**

**व्यंजन**– (Consonants.) स्पर्श, ऊष्म, अन्तस्थ, अयोगवाह वर्ण व्यंजने होत.

**शठा**– (A modification of ḥ.) पदान्ती असणाऱ्या विसर्गाचा र् भाव होणे. तसेच हनुमूल स्थान आणि प्रतिवेष्टित जिह्वाग्र करण यांद्वारा उच्चारण. **(२.४८–५०)**

**षड्ज**– (A note of Sāman.) नासिका, कण्ठ, उरस्, तालु, जिह्वा आणि दात यांच्या आश्रयाने सहा स्थानांपासून निष्पन्न स्वर षड्ज होय.

**संयोग**– (Consonant cluster.) स्वररहित व्यंजनांचे एकत्र येणे म्हणजे संयोग होय.

**संयोगपिण्ड–** (Contiguity of specific sounds.) व्यंजनांचे विशिष्ट प्रकारांचे संयोग. अयःपिण्ड, दारुपिण्ड, ऊर्णापिण्ड, ज्वालापिण्ड, मृत्पिण्ड, वायुपिण्ड, वज्रपिण्ड हे पिंडांचे प्रकार सांगितले आहेत. **(२.९१–९३)**

**संवृत–** १. **बाह्यप्रयत्न–** कंठाच्या जवळ असणारे दोन पडदे यांच्या सामीप्याने उत्पन्न घोष वर्ण, प्रत्येक वर्गातील तृतीय, चतुर्थ, पंचम तसेच ह्, य्, व्, र्, ल् मिळून २० व्यंजने आणि सर्वस्वर संवृत या बाह्य प्रयत्नातून निर्माण होतात.

२. **आभ्यंतर प्रयत्न–** करणांचा तालु इत्यादी स्थानांच्याजवळ राहणे. ह्रस्व अ चे उच्चारण याच प्रयत्नाने होते.

**संहिता–** (Continuous Vedic text.) वैदिक मंत्रांचा संहितारूपातील पाठ, पदपाठाची प्रकृति.

**सन्धि–** १. संहितेच्यावेळी होणारा वर्णविकार. संधी चार प्रकारच्या असतात. लोप, आगम, विकार आणि प्रकृतिभाव.

२. उदात्त आणि अनुदात्त यांच्या ऐक्याने जो संधी होतो. व्यंजनाचे पुढील स्वराशी मिळणे देखील संधी होय.

**साम–** (Sāmaveda.) सामवेद.

**सावित्री–** (Sacred Gāyatrī mantra.) ॐ भूर्भुवः स्वः तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि धियो यो नः प्रचोदयात्। हा गायत्री मंत्र यासच सावित्री असेही म्हणतात.

**सुलभा–** (Unchanged ḥ.) ऊष्म्याचा ओ भाव किंवा विवृत्ति इत्यादी न होता विसर्गरूपात राहणे. **(२.५०)**

**सुस्पृष्ट–** (Lose contact.) पादादि किंवा पदादि मध्ये सामान्य मात्रेपेक्षा अधिक काळापर्यंत उच्चारित वकार किंवा पादादि किंवा पदादि यांमध्ये असणारा रेफ, यकार, हकार यांनी संयुक्त किंवा अवगृहीत य सुस्पृष्ट होय. **(२.५१–५६)**

**स्पर्श–** (Stops, Explosives.) क् ते म् पर्यंत पंचवीस वर्ण स्पर्श होत.

**स्पृष्ट**– (Contact.) स्पर्श व्यंजन वर्णांच्या उच्चारणामध्ये जिह्वाग्रोपाग्रादि करणांनी निर्धारित स्थानांच्या स्पर्शाने होणारा आभ्यन्तर प्रयत्न.

**स्वर**– (Accent, Vowel.) उदात्तादि स्वर तसेच अकारादि अच् वर्ण.

**स्वरभक्ती**– (Anaptyxis.) रेफ + हकार, रेफ + शकार, रेफ + षकार तसेच लकार + हकार, लकार + शकार यांचा योग असताना दोन वर्णांमध्ये एकाररूप स्वराचा आगम होणे. करिणी, कुर्विणी, हरिणी, हरिता, हंसपदा हे पाच स्वरभक्तीचे प्रकार आहेत. **(२.१३–१६)**

**स्वरसन्धि**– (Vowel Euphony.) स्वरांची पारस्परिक संहिता होताना एक किंवा दोन स्वरांच्या स्थानी होणारा विकार.

**स्वरित**– (Circumflex.) उदात्त तसेच अनुदात्त यांच्या समाहाराने निष्पन्न स्वर स्वरित होय. **(१.१–६)** स्वरितचे आठ प्रकार– जात्य, अभिहित, क्षैप्र, प्रश्लिष्ट, तैरोव्यंजन, तैरोविराम, पादवृत्त, तथाभाव्य. **(१.७६–८६)**

**स्वार**– हाही शब्द स्वरितासाठीच वापरला आहे.

**हंसपदा**– (A kind of anaptyxis.) रेफ तसेच षकार यांच्या योगाने दोहोंच्या मध्ये प्रयुक्त स्वरभक्तीचे नाव हंसपदा होय. **(२.१३–१६)**

**हरिणी**– (A kind of anaptyxis.) रेफ तसेच शकार यांच्या योगाने दोहोंच्या मध्ये प्रयुक्त स्वरभक्तीचे नाव हरिणी होय. **(२.१३–१६)**

**हरिता**– स्वरभक्तीचा प्रकार **(२.१३–१६)**

**हस्तदोष**– हस्तस्वर देताना सात हस्तदोष सांगितले आहेत. **(१.४४–४५)**

# २. पादसूची

# ३. याज्ञवल्क्यशिक्षा व इतर ग्रंथ तुलना

## याज्ञवल्क्यशिक्षा
## वैदिक स्वरचिह्ने
## आणि
## माध्यन्दिनसंहिता – स्वरोच्चारण वैशिष्ट्य
## यांमधील स्पष्टीकरणे

**१. वैदिक स्वरचिह्ने** – (लेखक रवींद्र मुळे) या पुस्तकात वैदिक स्वरचिह्नांचा परिचय दिला आहे तसेच वेदशाखांतील वैशिष्ट्यांचा परिचय विस्तृतपणे दिला आहे.

**२. माध्यंदिन संहिता – स्वरोच्चारण वैशिष्ट्य** – (लेखक रवींद्र मुळे) या हिंदी पुस्तिकेत माध्यंदिन संहितेतील स्वर, उच्चारण पद्धती, उच्चारण वैशिष्ट्ये यांचे विवेचन छायाचित्रांसह दिलेले आहे. या पुस्तिकेची D.V.D. देखील बनवलेली आहे. त्यामुळे या वैशिष्ट्यांची उदाहरणेही D.V.D. द्वारा प्रत्यक्ष पाहणे व ऐकणे शक्य आहे. त्यामुळे या परिशिष्टात याज्ञवल्क्य शिक्षेतील काही विषय दिले आहेत त्यांचे विवेचन वैदिकस्वरचिह्ने व माध्यंदिन संहिता स्वरोच्चारण वैशिष्ट्ये या पुस्तकांमध्ये कोठे आले आहे ते संदर्भ दिले आहेत. अभ्यासकांना याचा निश्चित उपयोग होईल असे वाटते.

**विषय –**

**१. स्वरिताचे भेद** – या.शि.१.७६–८६; मा.सं.स्व.वै. पृ.१५–१६; वै.स्व.चि. पृ.४०, १७–२२.

**२. वेदाध्ययन करण्यापूर्वीची प्रारंभिक स्थिती** – या.शि.१.१९–२५, ४७–४८, ५२–५६; वै.स्व.चि. पृ. ८०–८२; मा.सं.स्व.वै.२१–२३.

**३. उदात्तस्वर दाखविण्याच्या दोन पद्धती** – या.शि.१.५५, २.२७ नंतरचे श्लोक; वै.स्व.चि. पृ.८३–८५; मा.सं.स्व.वै. पृ.२४–२६.

**४. अनुदात्तस्वर दाखविण्याच्या पाच पद्धती** - या.शि.१.५७, ५८; वै.स्व.चि. पृ.८५; मा.सं.स्व.वै. पृ.२६-२७.

**५. स्वरितस्वर दाखविण्याच्या पाच पद्धती** - या.शि.१.६१; वै.स्व.चि. पृ.८५-८९; मा.सं.स्व.वै. पृ.२७-२९.

**६. प्रचयस्वर दाखविण्याच्या पाच पद्धती** - या.शि.१.५९-६०, ८९-९०; वै.स्व.चि. पृ.१६; मा.सं.स्व.वै. पृ.३०.

**७. व्यंजने दाखविताना पाच मुद्रा** - या.शि.१.६१-६२; वै.स्व.चि. पृ.८९-९१; मा.सं.स्व.वै. पृ.३०-३३.

**८. विसर्ग संबंधी तीन हस्तमुद्रा** - या.शि.१.६३, ६९-७१, ७३-७५; वै.स्व.चि. पृ.९१-९६; मा.सं.स्व.वै. पृ.३३-३६.

**९. अनुस्वार संबंधी दोन हस्तमुद्रा** - या.शि.१.६४-६७, २.४३-४५; वै.स्व.चि. पृ.९६-१००; मा.सं.स्व.वै. पृ.३६-३९.

**१0. वर्जित आठ हस्तमुद्रा** - या.शि.१.४४; वै.स्व.चि. पृ.१००-१०२; मा.सं.स्व.वै. पृ.३९-४१.

**११. य चे ज उच्चारण** - या.शि.२.५१-५२, ५६; मा.सं.स्व.वै. पृ.४२-४५.

**१२. ष चे ख उच्चारण** - याज्ञवल्क्य शिक्षेत षकाराचे ख उच्चारण होते या संबंधात स्वतंत्र विचार आलेला नाही परंतु माध्यंदिन शाखेसंबंधी इतर शिक्षाग्रंथात याचे विवेचन आहे. मा.सं.स्व.वै. पृ.४५-४७.

**१३. वकाराचे उच्चारण** - या.शि.२.५३-५५; मा.सं.स्व.वै. पृ.४७-४८.

**१४. वर्णांचे द्वित्व उच्चारण** - या.शि.२.९६-९७; मा.सं.स्व.वै. पृ.४८-४९.

## ४. संदर्भ ग्रंथ

१. **ऋग्वेद-प्रातिशाख्य**, वीरेंद्रकुमार वर्मा, चौखंबा संस्कृत प्रतिष्ठान, दिल्ली, १९९९.

२. **कल्पसूत्र, कुन्दनलाल शर्मा**, विश्वेश्वरानंद-भारत-भारती-ग्रंथमाला ७४, होश्यारपुर, १९८१.

३. **माध्यन्दिन संहिता स्वरोच्चारण वैशिष्ट्य**, रवींद्र मुळे, श्री संत ज्ञानेश्वर वेदविद्या प्रतिष्ठान, औरंगाबाद, २०१३.

४. **याज्ञवल्क्यशिक्षा**, हरिराममिश्र, विद्यानिधि प्रकाशन, दिल्ली, २०१५. (अमरनाथशास्त्री कृत शिक्षावल्ली व्याख्येसह हिंदी अनुवाद)

५. **याज्ञवल्क्यशिक्षा**, नरेश झा, चौखंबा सुरभारती प्रकाशन, वाराणसी, २००३. (संस्कृत व हिंदी टीका)

६. **याज्ञवल्क्यशिक्षा**, केदारनाथ शर्मा, निर्णयसागर प्रेस, १९९४.

७. **वैदिकस्वरचिह्ने**, रवींद्र मुळे, श्री संत ज्ञानेश्वर वेदविद्या प्रतिष्ठान, औरंगाबाद, २०१०.

८. **शुक्लयजुर्वेद माध्यन्दिन संहिता**, चौखंबा विद्याभवन, वाराणसी, २००५.

९. **शुक्लयजुर्वेद-प्रातिशाख्यम् अथवा वाजसनेयि प्रातिशाख्यम्**, वीरेंद्रकुमार वर्मा, चौखंबा संस्कृत प्रतिष्ठान, दिल्ली, १९८७.

१०. **संस्कृत साहित्य का बृहद् इतिहास**, द्वितीयखण्ड, ओमप्रकाश पाण्डेय, उत्तरप्रदेश संस्कृत संस्थान, लखनऊ, १९९७.

# डॉ. रवींद्र मुळे यांची प्रकाशित पुस्तके

**‘वेददर्शन’** श्री संत ज्ञानेश्वर वेदविद्या प्रतिष्ठान, सिडको, औरंगाबाद २००/-
ऋग्वेदापासून उपनिषदांपर्यंत निवडक भागांचे संकलन, अनुवाद आणि विवरण (जून २००३)

**‘श्रौतप्रायश्चित्तिकोशः’** प्रतिभा प्रकाशन, शक्तिनगर, दिल्ली ८५०/-
श्रौतप्रायश्चित्तींचा संग्रह, विषयानुसार वर्गीकरण (जाने. २००४)

**‘संस्कृत-व्याकरणशास्त्र-प्रवेश’** श्रीराम प्रकाशन, संगमनेर १००/-
संज्ञा, परिभाषा, सन्धि, कारक, समास प्रकरणातील पाणिनीयसूत्रांचे स्पष्टीकरण (ऑगस्ट २००४)

**‘स्तोत्राञ्जलिः’** संस्कृत-संवर्धन-मंडळ, संगमनेर १००/-
(द्वितीयावृत्ती- संपादन) अनेक स्तोत्रांचे संकलन, त्यांची वृत्ते, कवि इ. माहिती (डिसे. २००८)

**‘वैदिक स्वरचिह्ने’** संत ज्ञानेश्वर वेदविद्या औरंगाबाद १५०/-
वैदिक वाङ्मयातील स्वरचिह्ने देण्याच्या विविध पद्धती आणि हस्तस्वर (जूलै २०१०) (सांस्कृतिक मंत्रालय, भारत सरकार यांचे अनुदानातून प्रकाशनासाठी अनुदान)

**‘नित्यकर्मदीपिका’** संत ज्ञानेश्वर वेदविद्या प्रतिष्ठान, औरंगाबाद २५/-
(वैदिक मंगल, संध्यावंदन, सूर्यनमस्कार, देवपूजाविधी, भोजनविधी, वेदवाणी, स्तोत्रांजली, भावांजली व त्यांचा आशय स्पष्ट करणारी पुस्तिका (जाने. २०११)

**‘माध्यन्दिनसंहिता-स्वरोच्चारण वैशिष्ट्ये’** संत ज्ञानेश्वर वेदविद्या प्रतिष्ठान, औरंगाबाद २००/-
शुक्लयजुर्वेद माध्यन्दिन संहितेतील स्वरचिह्ने, स्वर देण्याची पद्धती आणि यांची दृक्श्राव्य चित्रफिती (D.V.D.) सह हिंदी व इंग्रजी भाषेत माहिती देणाऱ्या स्वतंत्र पुस्तिका (जानेवारी २०१३)

**‘शुक्लयजुर्वेद दर्शन’** संस्कृत प्रगत अध्ययन केंद्र, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे २००/-
शुक्लयजुर्वेद दशग्रंथ आणि अष्टविकृतींची दृक्‌श्राव्य चित्रफिती (D.V.D.) सह माहिती देणारी पुस्तिका (डिसें. २०१४)

**‘महर्षियास्कप्रणीतं निरुक्तम्’** विद्यानंद प्रकाशन, पुणे १४०/-
अध्याय १, २, ७ यांचा मराठी अनुवाद आणि उपयुक्त विस्तृत प्रस्तावना (मार्च २००७) द्वितीयावृत्ती (ऑगस्ट २०१५)

**‘अर्थसंग्रहसार’** विद्यानंद प्रकाशन, पुणे ६०/-
(लौगाक्षिभास्कर कृत अर्थसंग्रह या मीमांसा विषयक ग्रंथातील विषयांवर एक दृष्टिक्षेप) (मार्च २००७) द्वितीयावृत्ती (ऑगस्ट २०१५)

**‘श्रीविष्णुसहस्रनामस्तोत्रम्’ (सार्थ)** मंदार प्रिंटर्स, पुणे १२०/-
(शांकरभाष्याच्या आधारे दिलेला मराठी भावार्थ, अकारानुक्रमे नामे, नामांची चतुर्थी विभक्तीतील रूपे आणि इतर परिशिष्टांसह) (नोव्हे. २०१६)

**‘शब्दरूपावली’** विद्यानंद प्रकाशन, पुणे १००/-
(संस्कृत मधील शब्दांच्या निर्मितिप्रक्रियेचे मर्म जाणून शब्दांची रूपे लक्षात ठेवण्याची सोपी पद्धत) (ऑगस्ट २०१७)